516



# योगवासिष्ठप्रारंभः

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥
अथ योगवासिष्ठप्रारंभः ॥ जय श्रीआदिगुरु परब्रह्ममूर्ती ॥ तुझे
इच्छेनें उत्पत्तिस्थितिलय होती ॥ सकळविश्वाचा तूं अधिपती ॥
तैं तुज नमितों लीन होऊनियां ॥१॥ तुझे गुण वर्णितां शिणले ॥
सहस्रमुखांचे शेष भागले ॥ चार सहा अठरा मौनावले ॥ तेथें मी
काय पामर ॥ २ ॥ तुझेनि सत्तावळें चाले सर्व ॥ मूढ तो ज्ञानी
होय अपूर्व ॥ रंक तो होय राव ॥ ऐशी गती तुझी विचित्र ॥
॥ ३ ॥ आतां तूंचि कृपा करशील जरी ॥ तरीच तुझे गुण वदे
ला वैखरी ॥ येरवीं अज्ञान मी अवधारीं ॥ हे सर्व जगद्गुरू ॥४॥
उनिराकार तूं सगुण आलासि व्यापकत्वा ॥ पंचतत्त्वें भरूनि उर-
उभासि दशांगुलत्वा ॥ सत्वासत्व विवर्जितत्वा ॥ अनादित्वा आ
॥ तेतूं ॥ ५ ॥ तुझेनि सर्वदेशीपणें ॥ व्यापकत्वा आलें जणें ॥ तेथें

निर्देशार्चीं भूषणें ॥ केउनीं म्यां ल्यवावीं ॥ ६ ॥ असो आतां हे उपपत्ती ॥ तूं आनंदैकरस सन्मूर्ती ॥ ह्मणोनि शरण तुजप्रती ॥ आलों निश्चिती अहंत्यागें ॥७॥ अहंतेचेनि अभावें ॥ सोहं तुरची स्वभावें ॥ अहंसोहं अतीत बरवें ॥ भाग्यजोडिलें तवदास्यें ॥८॥ तुझिया सेवें चोग्वाळलों ॥ हे निजानुभवसुखें सुखावलों ॥ ह्मणोनि बोलावया अर्ह झालों ॥ हे लघुवासिष्ठ टीका ॥ ९ ॥ गणेश सरस्वती वंदूं जातां ॥ तूंचि दिससी सद्गुरुनाता ॥ ह्मणोनि बोलों काय आतां ॥ तूंचि तत्वता सर्वरूप ॥ १० ॥ एकं सतं बहुधाकल्पयंति ॥ ऐसें प्रगट बोले श्रुति ॥ यालागीं तूंचि तूं यथानिगुनि॥ बहुविद्यारूपें भाससी ॥ ११ ॥ जो भासे लक्षांशु ॥ तोचि उठे वाच्यांशु ॥ ये खुणेचा सौरस्य ॥ स्वानुभवचि जाणती ॥ १२ ॥ गणेश सरस्वतिरूपें जाण ॥ भासे तुझेंचि स्वरूपभान ॥ यालागीं स्तवितां गजवदन ॥ तुझेंचि स्तवन आलेंवाचे ॥१३॥ असो कृपा कटाक्षें सर्वथा ॥ अवलोकुनि अनाथनाथा ॥ मज करवीं निजसत्कथा ॥ बोलवावी हेंचि प्रार्थि ॥ १४ ॥ ऐशी सद्गुरुनारायणा॥ प्रति केलीविज्ञापना ॥ आतां नमस्कारूं संतचरणा ॥ हेचि प्रार्थना करितसें ॥ १५ ॥ जें आपुलिये कृपें बरवें ॥ माजें हृदय अलंकारावें ॥ आणि वासिष्ठ टीकेतें बोलवावें ॥ तें परिसावें तुमचें तुह्मीं ॥ १६ ॥ तुमाचिया अवधान जीवनें निश्चित ॥ मम वाग्वल्लीस पोषण अमृत ॥ यालागीं सादर तुह्मीं महंत ॥ व्हावें हेंचि तात्प र्य

॥ १७ ॥ असो हेहि विज्ञप्ती ॥ वैसे अनुचिताचिये पंक्ती ॥ कमळें जेंवि रविप्रती ॥ काय प्रार्थना केली ॥ १८ ॥ तोस्वभावेंचि प्रकाशे ॥ स्वभावेंचि कमळ विकासे ॥ हा योग अनायासें ॥ असे सहज सिद्धपें ॥ १९ ॥ अथवा लोहेंकाय परिसासि विनवावें ॥ जे मातें तुह्मीं सुवर्ण करावें ॥ परिस सन्निधानस्वभावें ॥ लोह होय कांचन ॥ २० ॥ दुग्धस्राव करावा मातें ॥ ह्मणऊनि वत्स काय प्रार्थीधेनुतें ॥ मुख लागलिया स्तनातें ॥ स्वभावें तेथें स्रवे दुग्ध ॥ ॥ २१ ॥ तैसेंच तुह्मीं कृपामूर्ती ॥ दीनदयाळस्वभावस्थिती ॥ मज कृपाकरणें हे विज्ञप्ती ॥ करितों तुह्मांलागीं ॥ २२ ॥ दीनें तुह्मांपासीं यावें ॥ त्यासीं तुह्मीं कृपेनें बोलावें ॥ हें लक्षण स्वभावें ॥ नैसर्गिक तुमचेंचि ॥ २३ ॥ स्वयें निरूपण बोलावें ॥ अथवा सादर एकावें ॥ हें लक्षण स्वभावें ॥ नैसर्गिक तुमचेंचि ॥ २४ ॥ तरी मज करवीं बोलवावें ॥ आणि साकूर परिसावें ॥ हे प्रार्थना स्वभावें ॥ साउवस्ती वाव झाली ॥ २५ ॥ तस्मात् अध्यात्मनिरोपणीं ॥ तुह्मी स्वभावें आर्तभूत ह्मणोनि ॥ मी बोलतसें आर्तत्राणि ॥ हे लघुवासिष्ठटीका ॥ २६ ॥ येथें कोण ह्मणेल वक्ता ॥ वासिष्ठ ब्रह्मरूपी तत्वता ॥ ह्मणोनिया ग्रंथासि यथार्थता ॥ वासिष्ठ हें अभिधान ॥ २७ ॥ जया वसिष्ठाचा सामर्थ्यभावो ॥ तुळितां उपमे अभावो ॥ समस्त ऋषिसमुदावो ॥ तयांमाजी अग्रगण्य ॥ ॥ २८ ॥ बहिर्दृष्टीं विचारितां ॥ तरी केवळ तपोबळें सविता ॥

ईश्वर सामर्थ्यसत्ता ॥ वश्य जया तपबळें ॥ २९ ॥ पाहातां अंतर्दृ
ष्टिमहिमान ॥ तरीं ब्रह्मसुखासि तोचि अधिष्ठान ॥ विरोनि जाय
देहाभिमान ॥ जयाचेनि कृपावलोकनें ॥ ३० ॥ एवं ऐसा वसिष्ठ
महामती॥निरोपण करी श्रीरामाप्रती॥ तो श्रीराम कैसा हें संतीं ॥
क्षणयेक अवधान द्यावें ॥ ३१ ॥ जो सकळवेत्ता सुखाभिराम ॥
जो जगव्यापक सकळकाम ॥ जो योगियाहृदयीं विश्रामधाम ॥
निर्विकार निरामय ॥ ३२ ॥ जो अनादिसिद्ध आद्य ॥ जो नि-
गमागम प्रतिपाद्य ॥ जो चतुर्दश भुवनैकवंद्य ॥ चिद्रूप ह्मणवूनि
चाळक ॥ ३३ ॥ जो निदर्शन स्थितीचें दर्शन ॥ जो निःशब्द-
स्थानींचें श्रवण॥जो स्तब्धावस्थेचें गमन॥जो मन उन्मनीचें॥३४॥
जो विरक्ताचें पूर्णऐश्वर्य ॥ जो सकळ वर्यांमाजि वर्य ॥ तोचि
प्राणविसावा रघुवर्य ॥ दशरथात्मजपणें ॥ ३५ ॥ उपासकाहृदयीं
उपासनामिसें ॥ प्रकटे ध्येयरूपजैसें ॥ आत्मारामस्वरूप तैसें ॥ उ-
दित जहालें रघुकुळीं ॥ ३६ ॥ जयाचेनि नामसंकीर्त्तन श्रवण ॥
पाववी इंद्रियां उपशमन ॥ जें बोधा आलिया मन ॥ उन्मन होऊ-
नियां ठाके ॥ ३७ ॥ जो निरोपणाचें फळ ॥ जो बोधाधिष्ठान
केवळ ॥ तो ऐके निरोपण प्रांजळ ॥ प्राकृताचियेपरि ॥ ३८ ॥
येथें असे उपपत्ती ॥ जीवासि लावावया सत्प्रवृत्ती ॥ गुरुसंप्रदाय
पाळणार्थ जगीं निगुती ॥ हें अनुष्ठिलें श्रीरामें ॥ ३९ ॥ येरव्हीं
जो सकळक्रियेची सार्थकता॥सकळ साधनाची सिद्धता ॥ तो केंवि

घडेल श्रोता ॥ वसिष्ठनिरोपणाचा ॥ ४० ॥ परंतु मर्यादा परिपाळणालागीं ॥ सप्तवृत्तिरूटि व्हावयालागीं ॥ निरोपण श्रवणप्रसंगीं पोशिलें प्रेमें श्रीरामें ॥ ४१ ॥ असो श्रीराम जेथें श्रोता ॥ आणि वसिष्ठ जेथें वक्ता ॥ त्या निरोपणाची उत्कृष्टता ॥ सर्वथा अनिर्वचनीय ॥४२॥ असो श्रीरामवसिष्ठ संवादाचें ॥ निरोपण जें कांहीं साचें ॥ वसिष्ठ नाम जयाचें ॥ विख्यात जगीं जाणपां ॥ ४३ ॥ तया वसिष्ठाचें सार ॥ जें गुरुगम्यैकदेव्हार ॥ जें निज सुखाचें भांडार ॥ लघुवासिष्ठ बोलिजे ॥४४॥ जेंवि दधि मथुनि जयेपरी॥ नवनीत काढिजे ऊपरी ॥ तैसेंचि जाण सारोद्धारीं ॥ वासिष्ठींचा लघुवासिष्ठ ॥ ४५ ॥ या लघुवासिष्ठाची टीका ॥ पदपदाभिप्राय निका ॥ निरोपिजेल ऐका ॥ महाराष्ट्रशब्दीं पैं ॥४६॥ जो अनश्रुत सर्वदेशीं ॥ जो अपरिमित मर्यादेसी ॥ तोचि प्रतिष्ठोनि निवासी ॥ भक्तानुग्रहकामनें ॥ ४७ ॥ तया नारायणा श्रीगुरूचें ॥ पदद्वय मज सेव्यसाचें ॥ सामर्थ्यतये सेवेचें ॥ वसिष्ठ अर्थ बोलवी ॥ ॥ ४८ ॥ अन्यथा मज टीकास्फुरण ॥ हें वाटे अति अप्रमाण ॥ बघूं मेरूचें अवसान ॥ केंवि पावे पिपीलिका ॥४९॥ परिधन्यतो सद्गुरू सुखरासी ॥ जेणें सरतें केलें संतसभेसी ॥ हें निरोपण बोलावयासी ॥ म्हणोनि झालों अधिकारी ॥ ५० ॥ आतां येथूनि निरोपण ॥ वासिष्ठार्थ अतिगहन ॥ परिसोत सज्ञान पंडितजन ॥ माधवदास प्रार्थितसे ॥ ५१ ॥ गुरुमर्यादेकरूनि ॥ वसिष्ठ उपपीठ

सिंहासनीं ॥ शिष्यमर्यादा चापपाणी ॥ श्रीराम तयासन्मुख ॥ ॥ ५२ ॥ करूनि मंगलाचरण ॥ वसिष्ठें आरंभिलें निरोपण ॥ निरुपाधिवस्तूसी नमन ॥ प्रथम केलें तें परिसावें ॥ ५३ ॥

## दिक्कालाद्यनवच्छिन्नानंतचिन्मात्रमूर्त्तये ॥ स्वानुभूत्यैकसाराय नमः शांताय तेजसे ॥ १ ॥

देशकालादिभावें ॥ जें अनवच्छिन्न स्वभावें ॥ शोधितां जयाचें अवसान नपावे ॥ ह्मणोनि अनंत बोलिजे ॥ ५४ ॥ जें चिद् चिद्विलक्षण ॥ परि चिद्रूपत्वें परिपूर्ण ॥ ह्मणोनि चिन्मूर्त्तिसंज्ञा जाण ॥ तेथें बोलतां आली ॥ ५५ ॥ जयाच्यागीं स्वानुभूती ॥ प्रवर्त्तली अनन्यगती ॥ ह्मणोनि बोलतां आली निश्चिती ॥ स्वानुभूत्यैकसार ॥ ५६ ॥ जे आत्मोपशमन शांतीं ॥ करी विवर्त्ता उपशांती ॥ ह्मणोनि शांत हे युक्ती ॥ बोलतां आलि सुंदर ॥ ५७ ॥ चंद्रसूर्यादितेजासी ॥ आपुलेनि तेजें प्रकाशी ॥ म्हणोनि तेजोरूप ऐसी ॥ संज्ञा आली बोलतां ॥ ५८ ॥ एवं दिक्कालाद्य नवच्छिन्न ॥ अनंत तथा चिद्धन ॥ स्वानुभूत्यैकरस जाण ॥ शांत आणि तेजोरूप ॥ ५९ ॥ ऐसें निरुपाधिस्वरूप गहन ॥ वसिष्ठ करी त्यासि नमन ॥ त्या नमनाचें लक्षण ॥ विशद करूनि सांगिजेल ॥ ६० ॥ निडारुनि माझें मन ॥ ज्ञेयरूप होय ज्ञान ॥ ऐसें जें संधिचें संधान ॥ हेचि खुण मनाची ॥ ६१ ॥ हें जरि

गमेल दुर्बोधरूपें ॥ तरि ऐकावें बोलिजे सोपें ॥ जडाजडामाजि वृत्ती तळपे ॥ त्यासि बोलिजे नमन माझें ॥ ६२ ॥ यापरी करून नमन ॥ वसिष्ठ आरंभी निरूपण ॥ ऐक श्रीरामा सावधान ॥ बोले वचन मधुरागिरा ॥ ६३ ॥

## अहं बद्धो विमुक्तश्च इति यस्यास्ति निश्चयः ॥ नात्यंतमज्ञानोतज्ञः सोस्मिन् शास्त्रेधिकारवान्॥२॥

जे अध्यात्मशास्त्रीं अधिकारी ॥ तोचि येकुगा अवधारी ॥ जो बंधमोक्षसंधि माझारी ॥ मुमुक्षुपणें वर्त्तत ॥ ६४ ॥ स्वस्वरूपाची आस्तिकता ॥ उपजोनि विवेकारूढ होता ॥ मीचि बद्ध म्हणोनि चिंता ॥ करिता होय मुक्तचि ॥ ६५ ॥ एवं निश्चिय आर्त्तवंत भला ॥ मुक्तिसाधनीं प्रवर्त्तला ॥ या कारणास्तव बोलिला ॥ अत्यंत अज्ञान नाज्ञानी ॥ ६६ ॥ आत्मस्थिती अवघेपणें ॥ असो तो अत्यंत ज्ञानी म्हणे ॥ आणि मी जीव ऐसें जो जाणे ॥ तो अत्यंत अज्ञानी ॥ ६७ ॥ जो मीपणीं विराला ॥ आणि अवघेपणीं उरला ॥ तो कैंचि घडे वेगळाच याला ॥ शास्त्रीं श्रवण करावें ॥ ६८ ॥ त्यासि श्राव्य जेंजें श्रवणीं ॥ जो निजविलास म्हणोनी ॥ नलगे त्याठाईं करणी ॥ ती चाले सर्वथा ॥ ६९ ॥ आणि निबिड जो अज्ञान ॥ तेथें जीवोहं हेंचि स्फुरण ॥ नोळखे आपलें बंधन ॥ तो मुक्तिसाधन काय जाणे ॥ ७० ॥ जो नेणे

मुक्तिसाधन ॥ तो केंवि प्रवर्ते शास्त्राधीन ॥ यालागीं केवळ अज्ञान ॥ नघडे शास्त्राधिकारी ॥ ७१ ॥ एवं अज्ञान अथवा ज्ञानदशा ॥ तो शास्त्राधिकारि नव्हे सहसा ॥ तरि अधिकारी पाहिजे ऐसा ॥ जो अज्ञानी ना ज्ञानी ॥ ७२ ॥ नव्हे दिवसा निशी ॥ अरुणोदय संधि जैसी ॥ स्थिति अनुगमेल जेथें तैसी ॥ तोचि जाण शास्त्राधिकारी ॥ ७३ ॥ आपुलिया बंधत्वें जाणे ॥ तो नदेखे वेगळेपणें ॥ म्हणोनि ज्ञानि देही नसणें ॥ न्यायसिद्ध याशास्त्रीं ॥ ७४ ॥ तरीज्ञानाज्ञानामाझारी ॥ संधीसि जो वस्ती करी ॥ आणि विवेकारूढ अंतरीं ॥ होऊनि वाहे इच्छा मोक्षाची ॥ ७५ ॥ केवळ आस्तिकबुद्धि आथिला ॥ तो या अध्यात्मशास्त्रिं भला ॥ अधिकारवंत बोलिला ॥ नित्य मुमुक्षु सर्वथा ॥ ७६ ॥ नसतां पूर्वजन्मसंस्कार ॥ नघडे सर्वथा शास्त्राधिकार ॥ जैं कृपा करील जगदीश्वर ॥ तैंच जोडे सच्छास्त्र ॥ ७७ ॥

**यावन्नानुग्रहः साक्षाज्जायते परमेश्वरात् ॥**
**तावन्न सद्गुरुः कश्चित्सच्छास्त्रमपि नोलभेत् ॥ ३ ॥**

जंव जगदीश्वर अनुग्रहें पाही ॥ साक्षात्कार जाहाला नाहीं ॥ तंव प्राप्त नव्हे कोणासही ॥ सच्छास्त्र आणि सद्गुरू ॥ ७८ ॥ जगाचा नियंता ईश्वर ॥ म्हणोनि बोलिले जगदीश्वर ॥ तयाचा सगुण साक्षात्कार ॥ सुंदर स्वरूप तो ऐसा ॥ ७९ ॥ घन

श्यामपीतांबरधारी ॥ शंखचक्रादिचिन्हें करीं ॥ गरुडारूढ रमा सुंदरी ॥ वामभागीं मिरवित ॥८०॥ दाखवी श्रीवत्सलांछनासी ॥ कौस्तुभ मिरवे कंठदेशीं ॥ भुवन कमनीय मूर्ती ऐशी ॥ विष्णु नामें विलसित ॥ ८१ ॥ अथवा कर्पूरगौर चर्मधारी ॥ दशायुधें दाही करीं ॥ नंदिरूढ उमा सुंदरी ॥ वामभागीं मिरवित ॥ ८२॥ शोभवि भस्मोत्धूलनासी ॥ सर्पभूषण कंठदेशीं ॥ भुवनकमनीय मूर्त्ती ऐशी ॥ शंकरनामें विलासित ॥ ८३ ॥ एवं उभय स्वरूपा माजि निरुतें ॥ येकहोका भलतें ॥ येऊनि विश्वासि प्राणियातें ॥ नाभी शब्दें करूनी ॥ ८४ ॥ मस्तकीं ठेवूनि अभयकरू ॥ करीतसे अनुग्रह थोरू ॥ पुढिले जन्मीं सद्गुरू ॥ आणि सच्छास्त्र लाभेल ॥८५॥ जन्मसंस्कारें शुद्धी ऐसी ॥ घडली असेल प्राणियासि ॥ सच्छास्त्रसद्गुरुदर्शनासि ॥ तरीच होय अधिकारी ॥८६॥ सद्वस्तु प्रतिपादक ॥ तेंचि सच्छास्त्र सम्यक ॥ केवळसत्सुखदायक ॥ तोची सद्गुरू बोलिजे ॥ ८७ ॥ नुगवतां पैं चंडांश ॥ नघडे दृष्टीचा प्रकाश ॥ तैसा सद्गुरुविण शास्त्राभ्यास ॥ उपयुक्त नव्हे सर्वथा ॥८८ ॥ सद्गुरुविण शास्त्रश्रवण ॥ तें केवळ कोरडें जाण ॥ जैसें कां रंडामंडण ॥ किंवा भूषण शवा वरिलें ॥ ८९ ॥ आधीं सद्गुरुचरण सेवावे ॥ मग सच्छास्त्र अवलोकावें ॥ म्हणोनि परस्पर सिद्धता स्वभावें ॥ सद्गुरु आणि सच्छास्त्रेंसि ॥ ९० ॥ तें सच्छास्त्र आणि सद्गुरुदर्शन ॥ न घडे ईश्वरकृपेविण जाण ॥

यालागीं जन्मसंस्कारवि पूर्ण ॥ येथें सूचिला येणें श्लोकें ॥ ९१ ॥ जन्मांतर संस्काराचें हेंचि लक्षण ॥ जो सत्संग जोडे प्रयत्नेंविण ॥ सत्संगें होय शास्त्रश्रवण ॥ श्रवणें पाविजे सदामुक्ती ॥ ९२ ॥ म्हणोनि सद्युक्तीचें अधिष्ठान ॥ सत्संगचि केवळ जाण ॥ येचि अर्थी निरूपण ॥ पुढिले श्लोकीं बोलवीतसे ॥ ९३ ॥

## महानुभावसंपर्कात्संसारार्णवलंघने ॥
## युक्तिः संप्राप्यते राम दृढा नौरिव नाविकात् ॥ ५ ॥

थोर आहे सामर्थ्य जयाचें ॥ ह्मणोनि महानुभाव आख्यान साचें ॥ फळ तयाचिया दर्शनाचें ॥ उत्कृष्ट असे अपरोक्ष ॥ ९४ ॥ गंगास्नानें पातक हरे ॥ चंद्रोदयें ताप निवारे ॥ दरिद्र ऐसी वार्ता नुरे ॥ कल्पतरूचिये प्राप्ती ॥ ९५ ॥ तैसें नव्हे महानुभावदर्शन ॥ पाववी अतिशय कल्याण ॥ पाप ताप दैन्य जाण ॥ एकेचि काळें नासती ॥ ९६ ॥ महानुभावदर्शन आर्तीची प्राप्ति ॥ उपजतांचि तिन्ही पळती ॥ महादर्शनानंतरें नासती ॥ येथें कवण अपूर्व ॥ ॥ ९७ ॥ दर्शनमहिमा जयाचा ॥ एवं सिद्ध उत्कृष्ट साचा ॥ तेथें स्पर्श संभाषणाचा ॥ प्रभाव कैंवि बोलिजे ॥ ९८ ॥ थोर सामर्थ्य बोलावया ॥ हेंचि कारण रघुराया ॥ महानुभाव नाम तया ॥ येणें विचारें सार्थक ॥ ९९ ॥ ऐसे महानुभाव असती ॥ त्यांचा संपर्क ह्मणिजे संगती ॥ तेणें पाविजे॥ सद्युक्ती संसारार्णव लंघिजे ॥

॥ १०० ॥ ते सद्युक्ती कवण ॥ जे करिती सद्वस्तूचें विवरण ॥ बळी होऊनि आपण ॥ स्वरूपनिधान साधितसे ॥१॥ मग स्वरूपानुभवानंतरें ॥ विलासरूपें तेंचि उरे ॥ एवं सरली कांहिंच नसरे॥ ह्मणोनि बोले सद्युक्ती ॥ २ ॥ जैसें ताम्रभस्म जहालिया ॥ उरे मौल्याधिक्य सत्वाआलिया ॥ तैसी सद्युक्ती उरे मुरोनियां ॥ स्वरूपानुभवविलासि ॥ ३ ॥ सत्संगें तत्वतां ॥ सद्युक्ती आलिया ज्ञाता ॥ मग संसार हे वार्त्ता ॥ श्रवणें न ऐकिजे ॥ ४ ॥ जैसें जिणें नेणे मरणातें ॥ कीं मरण नेणे जिणियातें ॥ तैसी संसारवार्त्ता ते ॥ नेणे सद्युक्तिवंत ॥ ५ ॥ तस्मात्संसारार्णवलंघन ॥ न घडे सद्युक्तीविण ॥ कैंचि रात्रीचें होय निरसन ॥ सूर्योदया वेगळें ॥ ६ ॥ यालागीं सद्युक्तीची प्राप्ती ॥ भवसमुद्र तरिजे निश्चितीं ॥ ते पावावया सद्युक्ती ॥ सत्संगचि कारण ॥ ७ ॥ उतरावया महानदीसी ॥ नावाडियापासून जैसी ॥ नौका पाविजे तैसी ॥ सत्संगें सद्युक्ती ॥ ८ ॥ संसार हाचि सागरू ॥ सद्युक्ती होंचि तारू ॥ कर्णधार श्रीगुरू ॥ हा प्रकार तरायाचा ॥ ९ ॥ अगा श्रीरामा जाण ॥ सद्युक्ती पाहतां भवभान ॥ न भासे म्हणोनि लंघन ॥ सहजचि झालें तयाचें ॥ १० ॥ मागुतेनि ते सद्युक्ती कैसी ॥ बोलिजेल उत्कृष्ट महिमेसी ॥ वसिष्ठ म्हणे श्रीरामासी ॥ सावधान परिसावें ॥ ११ ॥

संसारदीर्घरोगस्य सुविचारो महौषधम् ॥
कोहं कस्य च संसारो विवेकेन विलीयते ॥ ६ ॥

उल्लेखाचेनि अपकारें ॥ अहंकाराचेनि संसारें ॥ हा संसार निर्धारें ॥ रोगरूप बोलिजे ॥ १२ ॥ जेथें त्रिविधतापाचें फळ ॥ विषय अपेक्षाची तळमळ ॥ नरुचे परमार्थ अमळ ॥ नलगे क्षुधा म्हणोनि ॥ १३ ॥ असंभावना विपरीत भावना ॥ हेचि फांटे तया असमाधाना ॥ कदा निज नयना ॥ नये द्वंद्वदुःख म्हणोनि ॥ १४ ॥ ऐशिया दीर्घरोगाचिये निवृत्ती ॥ यालागीं सुविचार म्हणिजे सद्युक्ती ॥ हेंचि औषध थोर निगुती ॥ अवश्य केलें पाहिजे ॥ १५ ॥ तेणें औषधें सद्युक्तीप्रती ॥ होय संसाररोगा प्रशांती ॥ तापत्रय जाऊनि अंतीं ॥ आरोग्य होय तात्काळ ॥ ॥ १६ ॥ मी कोण संसार कोणाचा ॥ म्हणे सद्विवेक साचा ॥ विलय होय संसाराचा ॥ नाश तमाचा सूर्य जैसा ॥ १७ ॥ मी माझें याचा निऱ्हास ॥ करितां उरे स्वप्रकाश ॥ स्वप्रकाशें विनाश ॥ सहज होय संसाराचा ॥ १८ ॥ एवं संसारदीर्घरोगासी ॥ सुवि चार औषध निश्चयेंसी ॥ तो सुविचार परियेसीं ॥ सज्जनसंगें पाविजे ॥ १९ ॥

यस्मिन्देशेऽभरस्तज्ञो नास्ति सज्जनपादपः ॥
सफलः शीतलच्छायो न तत्र दिवसं वसेत् ॥ ७ ॥

सद्वस्तूतें जाणता ॥ सदाचारें अतिपुरता ॥ जाणता॥ त्यासि सज्जन बोलिजे ॥ २० ॥ तो सज्जन ऐ. याचं लक्षण ॥ तज्ञ म्हणिजे ज्ञानें परिपूर्ण ॥ ज्ञानस्वरूपी म्हणोनि जाण ॥ अमर ऐसी संज्ञा पैं ॥ २१ ॥ एवं ऐसा तो तज्ञ आणि अमर ॥ नाना निजबीजाचा अंकुर ॥ अत्रेव पैं गा साचार ॥ वृक्षरूपें अवगमला ॥ २२ ॥ मोक्षफळें अति सफळ ॥ चित्तोपशम छाया शीतळ ॥ सबाह्य निववी तात्काळ ॥ शरणागता अनाश्रितातें ॥ ॥२३॥ ऐसे सज्जन ते तरुवर ॥ हें त्रैलोक्य ज्यांपासि अलंकार ॥ जे देतीं नसतां तो शून्याकार ॥ हें सर्वथा जाणावें ॥ २४ ॥ नसतां प्राणासि सहवास ॥ वृथा जेंवि शरीरभास ॥ तेंवि सज्जनें विण देश ॥ केवळ जाण शून्यपें ॥ २५ ॥ तेथें एक दिवस वस्ती ॥ करूं नये अविचारवंति ॥ तो देशू नव्हे अप्राप्ति ॥ अधोगतीचें कारण निश्चयें ॥ २६ ॥ सज्जनवृक्षेंवीण जें स्थळ ॥ तें तंव तापदायक केवळ ॥ म्हणोनि विचारवंत अमळ ॥ तेणें त्याग करावा ॥ २७ ॥

## सदा संतोभिगंतव्या यद्यप्युपदिशंति न ॥
## या हि स्वैरकथास्तेषामुपदेशाभवंतिताः॥ ८॥

म्हणोनि संत असती जये देशीं ॥ तो देश धन्य निर्धारेंसि ॥ सदा जावें तयांपासि ॥ महत्प्रयत्नें करूनी ॥ २८ ॥ क्षुधा

लागलिया भोजना ॥ प्रवृत्तितसी संतदर्शना ॥ यालागीं उत्कंठा मना ॥ उपजों द्यावी पोटरतें ॥ २९ ॥ संतदर्शनाची आर्ती ॥ जंव उपजों नपुरे चित्तीं ॥ यमयातनेपासून मुक्ती ॥ पितरांसह ते तात्काळ ॥ ३० ॥ संतदर्शनासि वाटे कोडें ॥ जातां तेथें पाउल पडे ॥ तेथें पुण्याची खाणी उघडे ॥ ऐसें पुढें महिमान ॥ ३१ ॥ संत दर्शनाकारणें ॥ जावेंचि महत्प्रयत्नें ॥ जाऊनि प्रणिपात करणें ॥ करुणावचनें प्रार्थावें ॥ ३२ ॥ संसारछेदीं सद्युक्ती ॥ कृपा उपजोन प्रेम यावें चित्तीं ॥ ऐसे शब्द संतांप्रति॥ कारुण्ययुक्त बोलावे ॥ ३३ ॥ प्रश्न केलियानंतर ॥ जरी तात्काळ नेदी उत्तर ॥ तरी तेथें कांहीं विकार ॥ सहसा उपजों न द्यावा ॥ ॥३४ ॥ उपदेश न करिती तरी ॥ चिरकाळ सेवा बरवेपरी ॥ करून राहावें निर्धारी ॥ संतचरणांजवळी पैं ॥ ३५ ॥ संतसंगें राहातां निजविश्वासें ॥ ते बोलती हरिकथा स्वविलासें ॥ त्याचि कथा अनायासें ॥ उपदेशरूप होऊनि येती ॥ ३६ ॥ सहज संतांचा वाग्विलास ॥ तोचि आपणा उपदेश ॥ यालागीं धरूनि विश्वास ॥ संतसंग सेवावा ॥ ३७ ॥ संतसंगाची तत्वतां ॥ आणिक एक असे अपूर्व वार्ता ॥ ते निरोपिजेल आतां ॥ पुढिले श्लोकीं सारस ॥ ३८ ॥

**शून्यमापूर्णतामेति मृत्युरप्युत्सवायते ॥**
**आपत्संपदिवाभाति विद्वज्जनसमागमात्॥९॥**

संतस्वरूप परिज्ञान ॥ ह्मणऊनि ह्मणिजेति विद्वज्जन ॥ त्यांचे निसमागमें करून ॥ शून्य पावे पूर्ण पूर्णता ॥ ३९ ॥ जेंवि जीव भ्रमाचेनि गुणें ॥ वेगळावले एकदेशिपणें ॥ त्यासी अंबर ऐसें ह्मणणें ॥ चित्स्वरूप वियोगें ॥ ४० ॥ विद्वत्समागमें तें अंबर ॥ चिद्रूप मिळणियें साचार ॥ मग होऊनि ठाके चिदंबर ॥ शून्य तें पूर्ण होऊनि राहे ॥ ४१ ॥ जे नास्तिकाची नास्तिकता॥ तेचि होऊनि ठाके आस्तिकता ॥ यापरी शून्य पावे पूर्णता ॥ विद्वज्जनसमागमें ॥ ४२ ॥ परब्रह्माचिये आस्तिकते ॥ प्रपंच शून्य केंवि घडे रितें ॥ अथवा ब्रह्म शून्य ये पूर्णतें ॥ प्रपंचअभावें करूनी ॥४३॥ एवं उभयविचारें अवलोकितां॥ शून्य पावे पूर्णता ॥ विद्वज्जनसमागमें असतां ॥ ऐसें होय आश्चर्य ॥ ४४ ॥ आणि जडभाग जो सकळ ॥ तो अनंतरूप होय केवळ ॥ ह्मणोनि श्लोकीं बोलिले अमळ ॥ मृत्युरप्युत्सवायते ॥ ४५ ॥ नेति नेति निरसितां आलें ॥ जें असार ह्मणऊनि त्यागिलें ॥ तेंचि सार होऊनि बोलिलें ॥ परमानंद परिपूर्ण ॥ ४६ ॥ नानाजयासि बोलिजे विषाद ॥ तोचि होऊनि ठाके आनंद ॥ पाहतां केवळ विनोद ॥ होय विद्वज्जनसंगें ॥ ४७ ॥ प्रपंच आलिया आनंदपदा ॥ आपत्ती भासती संपदा॥ अतएव आलें श्लोकपदा ॥ आपत्संपदा भाविती ॥ ॥ ४८ ॥ जेंसें स्वप्नांतील अमंगळ ॥ तेंचि प्रबोधीं होय मंगळ ॥ तेंसा सत्संगें आपदा सकळ ॥ संपदारूप भासती ॥ ४९ ॥ जल

धरोदर सन्निधान ॥ करी क्षाराचें गोड जीवन ॥ तैसें सत्संगमहिमान ॥ आपदा करी संपदा ॥ ५० ॥ जीवदशायोगें एकदेशिपण॥ तेंचि व्यापकत्वा आलें पूर्ण ॥ जयाशीं बोलिजे निष्कांचन ॥ तेंचि जाहलें परमभाग्यें ॥ ५१ ॥ एवं शून्य पावे पूर्णता ॥ निरानंद होय आनंद देखता ॥ आपत्ती भासती संपदा समस्ता॥मंगळरूप निर्धारें ॥ ५२ ॥ निज विश्वासें अनन्यगती ॥ जें जोडे विद्वज्जनसंगती ॥ तें नवलाव निश्चिती ॥ ऐसा होऊनि ठाके ॥ ५३ ॥ म्हणोनि दीनोद्धारालागीं साचे ॥ संत अवतार ईश्वराचे ॥ चरण सेवाव त्यांचे ॥ निजपदप्राप्तीकारणें ॥ ५४ ॥ आणि दीनकृपेंकारणें ॥ महानुभावें निरोपण करणें ॥ अन्यथा ते जरी उगेपणें ॥ तरी नघडे दीनोद्धार ॥ ५५ ॥

## ज्ञानिनामपि चित्तं चेत्केवलात्मसुखोद्यतं ॥ संसारदुःखदुःखार्ता कं यांति शरणं वद ॥१०॥

ज्ञानी जे त्यांचें चित्त ॥ केवळ आत्मसुखोद्यत ॥ होत्साते ते अखंडित ॥ राहाती तटस्थ उगेपणें ॥ ५६ ॥ लोक विषयें करून ॥ लोभियें निक्षेपिजे धन ॥ तैसें तिहीं निजज्ञान ॥ लपवूनि ठेविलें अंतरीं ॥ ५७ ॥ भाग्य भोगूं स्वयेंचि जाणती ॥ परी उदारपणें दाते होती ॥ असो येणेंवाणिपणें असती ॥ ते न शोभती संतपंक्ती ॥५८॥ एवं ज्ञानी ऐसे होती जरी ॥ तरी काय करावें जीवीं इतरीं ॥

जे मोक्षचाड वाहती अंतरीं ॥ संसारदुःख निरंतर ॥ ५९ ॥ मोक्षा लागीं आवर्तभूत ॥ ह्मणोनि आर्त ऐसें बोलिजेत ॥ अर्थ द्वंद्वव्यथें पीडित ॥ यालागीं आवर्त ऐशी संज्ञा ॥ ६० ॥ ऐसा संसार बिभेतें ॥ तिहीं शरण जावें कवणातें ॥ अंतरीं आत्मसुखोद्यत चित्तें ॥ उगे असती निजज्ञानी ॥ ६१ ॥ मोकळे निर्मन नव्हेति उदार ॥ न बोलती सदसद्विचार ॥ तरी तरुणोपाय प्रकार ॥ कवण असे दीनातें ॥ ६२ ॥ पृथ्वीवरील सरितानीर ॥ त्यासि जरी उपेक्षिजे सागर ॥ तरी आणिके कोण विचार ॥ त्यागीं गत्यंतर असे ॥ ६३ ॥ बाळकासि जवळि येतां ॥ जरी स्तन नदे माता ॥ तरी त्यासि विचारितां ॥ आणिक गत्यंतर काय आहे ॥ ६४ ॥ दीर्घरोगें पिडितां रोगी ॥ जरी धन्वंतरी उपेक्षी तयालागीं ॥ तरी त्यासि काय विचारितां जगीं ॥ आणिक गत्यंतर आहे ॥ ६५ ॥ तैसें संसारदुःखार्त्त प्राणी ॥ त्यांचें शरणस्थान संतज्ञानी ॥ आणि ते जरी पाहती उगेपणीं ॥ आत्मसुखोद्यत मर्यादा ॥६६ ॥ जरी त्या अनन्यगतीचा जाण ॥ कवण शरण असे अन्य ॥ यालागीं प्रकट निरोपावें ज्ञान ॥ अपूर्व अनुभविक महंतें ॥ ६७ ॥

## तज्ज्ञानं सच शास्त्रार्थः शुद्धज्ञानमखंडितम् ॥ सच्छिष्याय विरक्ताय साधुर्यदुपदिश्यति ॥११॥

अनुभवेंसि यथा निगुति ॥ तेंचि ज्ञान साधुचें यथा निश्चिती ॥ जें सच्छिष्या विरक्तामनी ॥ उपदेशिता होय पैं ॥ ६८ ॥ तोचि

साधूचा शास्त्रार्थ अंतीं ॥ सार्थकें पैं गा रघुपती ॥ जो सच्छिष्या विरक्ताप्रती ॥ उपदेशिता होय पैं ॥ ६९ ॥ अनुभवपूर्वक अखंड स्थिती ॥ तेचि साधूची व्युत्पत्ती ॥ जे सच्छिष्या विरक्ताप्रती ॥ उपदेशिता होय पैं ॥ ७० ॥ अन्यथा तें निरर्थक ज्ञान ॥ तें निरर्थक शास्त्रश्रवण ॥ जरी नसांगती निरोपण ॥ विरक्त सच्छिष्याप्रति ॥ ७१ ॥ तो विरक्त सच्छिष्य कैसा ॥ अपूर्व बोलिलों तैसा ॥ अत्यंत तज्ञ अज्ञान ऐसा ॥ जन्मसंस्कारी पूर्ण ॥ ७२ ॥ जो जगदीश्वर अनुग्रहें अथिला ॥ शम दमादि संपत्ती स्थिरावला ॥ विषयफळभोगीं जो विटला ॥ ह्मणोनि बोलिलो विरक्त ॥ ७३ ॥ जो नित्यानित्य विचारवंत ॥ मोक्षाची इच्छा वाहत ॥ तोचि सच्छिष्य निश्चित ॥ संस्कारवंत पूर्णत्वें ॥ ७४ ॥ त्याप्रति जें निरोपण ॥ तें मर्यादामात्रपाळण ॥ कां जे संस्कारशुद्धीकरून ॥ तो पूर्वीच सिद्ध असे ॥ ७५ ॥

**उपदेशक्रमो राम व्यवस्थामात्रपालनं ॥**
**मुक्तेस्तु कारणं सिद्धः शिष्यः प्रज्ञैव केवलं ॥ १२ ॥**

उपदेशक्रम शिष्याप्रति ॥ तो मर्यादा पाळणार्थ निश्चिति ॥ अहो श्रीरामा हे युक्ति ॥ सदृढ चित्तीं धरावी ॥ ७६ ॥ काष्ठीं वन्हीं सिद्धचि असे ॥ परि तो प्रकटे मंथनमिसें ॥ तैसा गुरु संप्रदायवशें ॥ होय सच्छिष्यां प्रबोध ॥ ७७ ॥ उपदेशक्रमावे-गळें ॥ सत्प्रवृत्तीचें रूप नकळे ॥ जे असच्छिष्य आंधळे ॥

ते सच्छिष्य होती कैसे ॥ ७८ ॥ ह्मणऊनि सत्प्रवृत्तीची वृद्धी ॥ व्हावयालागीं त्रिशुद्धी ॥ उपदेशक्रम बुद्धी ॥ अनुष्ठिलीयाचि प्रयत्नें ॥ ७९ ॥ सत्प्रवृत्तीचें निजअभावें ॥ ह्मणि निज अज्ञान भ्रंश पावे ॥ ह्मणोनि उपदेशक्रम भावें ॥ सत्प्रवृत्ती संस्थापिली ॥ ८० ॥ परंतु सच्छिष्याप्रति उपदेश जो कांहीं ॥ ते मर्यादा पाळनाचि पाहिं ॥ गुरुसंप्रदायप्रवाहि ॥ खंडन नसावें ह्मणोनि ॥ ॥ ८१ ॥ तेथें शिष्य प्रज्ञाचि केवळ ॥ भासे ज्ञानप्राप्तीचें मूळ ॥ जे प्रज्ञा अति निष्फळ जन्मसंस्कारशुद्ध ॥ ८२ ॥ जें अति आदर्श अमळ प्रकाश ॥ तें प्रतिबिंबदर्शना कोण प्रयास ॥ तैसा सच्छिष्याप्रति उपदेश ॥ बिंबतां कोणपां दुर्घट ॥ ८३ ॥ यालागीं सच्छिष्य प्राज्ञचि कारण ॥ होउनि ठाके स्वरूपनिर्वाण ॥ व्यवहारमात्र संरक्षण ॥ करावयाउपदेशक्रम ॥ ८४ ॥ जरी प्राप्त आपणा आपण ॥ तरि आणिक कैंचे बोलावें कारण ॥ यादृष्टिं पाहतां जाण ॥ निमित्तमात्र उपदेश ॥ ८५ ॥ आपलें करून आपण दर्शन ॥ ह्मणोनि लागे निज साधन ॥ येचि अर्थी निरूपण ॥ पुढिले श्लोकीं सांगतसे ॥ ८६ ॥

**न शास्त्रैर्नापि गुरुणा दृश्यते परमेश्वरः ॥**
**दृश्यते स्वात्मनैवात्मा स्वया सत्वस्थया धिया॥१३**

जन्मसंस्कार बुद्धी ॥ स्वयें नसतां सत्वस्थबुद्धी ॥ परमेश्वरदर्शन त्रिशुद्धी ॥ नघडे केवळ शास्त्रश्रवणें ॥ ८७ ॥ द्विवार वाचा-

वीं गुरुवाक्यें सत्वस्थ प्रज्ञेकरून ॥ आपणा आपण सावधान ॥ तेणें सावधानत्वें दर्शन ॥ होय परमेश्वराचें ॥ ८८ ॥ तरी आपुले असावधानतें ॥ नघडे दर्शन परमेश्वराचें पां निरुतें ॥ शास्त्र अथवा गुरुवाक्य त्यातें ॥ सहसा नये उपयोगा ॥ ८९ ॥ अंधासि दावितां आरसा ॥ तो उपयुक्त नव्हे सहसा॥शास्त्र अथवा गुरूपदेश तसा ॥ असावधानासि न फळे ॥ ९० ॥ यालागीं शास्त्र अथवा गुरू ॥ येणें नव्हे आत्मसाक्षात्कारू ॥ पाहिजे पूर्ण संस्कारू ॥ तेणें होय सत्वस्थ बुद्धी ॥ ९१ ॥ तये सत्वस्थबुद्धी करून ॥ आपण होय प्रकाशमान ॥ तेंचि निश्चय दर्शन ॥ आत्मरूप परमेश्वराचें ॥ ९२ ॥ तस्मात्परमेश्वरप्राप्तीचें कारण ॥ मुख्य तें निजात्मज्ञान ॥ त्या ज्ञानाचें महिमान ॥ पुढिले श्लोकीं अवधारीं ॥ ९३ ॥

**सर्वैव हि कला जंतोरनभ्यासेन नश्यति ॥**
**सा वै ज्ञानकला राम सकृज्जातापि वर्धते ॥ १४ ॥**

प्राणियाच्याठायीं ॥ जया बहिरंग कळा पाहीं ॥ त्या नाश पावति सर्वही ॥ अभ्यासाविण सर्वथा ॥ ९४ ॥ बहिरंगकळांसी मूळ मन ॥ त्या मनाचें मूळ विस्मरण ॥ यालागीं अभ्यासेंविण॥ त्या पावती नाशातें ॥ ९५ ॥ जें सिद्ध केलें अभ्यासें ॥ तें रूपा येउनि झालें अविनाशें ॥ हा निर्णयो प्रकट असे ॥ कृत्रिम कैसें स्थिर राहे ॥ ९६ ॥ ह्मणोनि अभ्यासें जें संभवे ॥ तें अभ्यास

नसतां नाश पावे ॥ कारणाचिये अभावें ॥ काय कोंवि राहों शके ॥ ९७ ॥ ही यस्मातत्कारणाद्रघुपति ॥ प्राणियाच्या सर्व कळा निश्चिति ॥ अभ्यास जन्य ह्मणोनि नासती ॥ अभ्यासाचेनि अभावें ॥ ९८ ॥ जे हे ज्ञानकळा अत्यंत ॥ शाश्वत असे अखंडित ॥ इंद्रिया मनातीत ॥ अभ्यासा आधीं सिद्ध असे ॥ ९९ ॥ इचेनि सकळ कळा रूपसा ॥ परि कळानाश हे नये नाशा ॥ याल्यागीं कोसल्लेशा ॥ अत्यंत प्रज्ञा देहीं व्हावी ॥ २०० ॥ सावधानस्थिति अंतरीं ॥ एक वेळ ठसावे जरी ॥ स्वप्रकाश वरवेपरी ॥ तरि कदा नये विस्मरण ॥ १ ॥ विस्मरणाचें स्मरण॥ तें इचेनि भासे भासमान ॥ याकारणें अविनाशपण ॥ इये ज्ञानकळेच्या ठाईं ॥ २ ॥ मनादि इंद्रियां नातळती ॥ ह्मणोनि अभ्यासेंवीण इची प्राप्ती ॥ विना अभ्यासें होय वाढती ॥ एकवेळ स्थिति बाणलिया ॥ ३ ॥ इतर ज्या बहिरंग कळा॥ त्या अभ्यासेंविण नासती सकळा ॥ तसी नव्हे हे अमळा ॥ अभ्यासेंविण वृद्धि पावे ॥ ४ ॥ येथें आशंका ऐसी ॥ ह्मणि श्रीरामा तूं घेसी ॥ जे अभ्यासेंविण प्राप्ति कैसी ॥ ये ज्ञानकळेची ॥ ५ ॥ गुरुवाक्य सावधानत्वें जोडे ॥ तोचि काय अभ्यास न घडे ॥ ऐसें जरी ह्मणसील पुढें ॥ दृष्टांतासि करीं श्रवण ॥ ६ ॥

**स्वकंठेपि स्थितं वस्तु यथा न प्राप्यते भ्रमात् ॥**
**भ्रमांते प्राप्यते तद्वदात्मापि गुरुवाक्यतः ॥१५॥**

जैसा आपुले कंठीं हार आपुला ॥ असोनि भ्रमें भावी हरपला ॥ मग तोचि कोणें दाखविला ॥ त्याचा त्याचेचि कंठीं॥७॥ दावी तेणें काढूनि आणिला ॥ अथवा देखतयासि नवा प्राप्त जाहला ॥ हें न घडे या बोला ॥ असे कंठींचा कंठीं ॥ ८ ॥ दावि त्याचें दाखवणें ॥ तत्पूर्वींच वस्तूचें असणें ॥ अगा श्रीरामा दृष्टांतें येणें ॥ दृष्टांत जाणोनि जाणावा ॥ ९ ॥ स्वकंठींची वस्तुप्राप्ती ॥ जैसी भासे भ्रमाच्या अंतीं ॥ तैसें गुरुवाक्य सावधान स्थिति ॥ आत्मयाचें परिज्ञान ॥ १० ॥ परि सद्गुरुवचन प्रमाणें ॥ योजलें जें कांहीं जाणणें ॥ तत्पूर्वींच असणें ॥ आत्मयाचें स्वतःसिद्ध ॥ ११ ॥ प्राप्तितें ही प्रकाशिलें ॥ ऐसें जें आत्मरूप संचलें ॥ तें साधनें सिद्ध जालें ॥ ऐसें कोंवि वदों शके ॥ १२ ॥ प्रकाश प्रकाशासीं प्रकाशकातें ॥ हें तंव असंबद्ध निरुतें ॥ साधन सिद्ध करी आत्मयातें ॥ ह्मणोनि वाटे अघटित ॥ १३ ॥ यालागीं ज्ञान नकळेचि जाण ॥ प्राप्ती बोलली अभ्यासेंविण ॥ आशंकापरिहार निरोपण ॥ ये श्लोकीं इतुकें जाहलें ॥ १४ ॥ स्वरूपपरिज्ञान प्राप्ती ॥ निरोपिली यथा निगुती ॥ आतां बोलिजेल स्थिति ॥ स्वपरिज्ञानाची ॥ १५ ॥

**स्वस्वरूपमजानन्तो जनोयं दैववर्जितः ॥**
**विषयेपि सुखं वेत्ति पश्चात्पाके विषान्नवत्॥ १६ ॥**

वेदवेदांगपारंगत ॥ मुखीं षट्शास्त्रें पठित ॥ उपशास्त्रेंहि

आलोडित ॥ अनेक कळा प्रवीण ॥ १६ ॥ एवं नाना विद्या जाणे ॥ आणि स्वस्वरूपातें नेणें ॥ ह्मणोनि हा जन अवश्य बोलणें ॥ दैववर्जित मूर्ख पैं ॥ १७ ॥ सभाग्य तोचि बोलिजे तत्वता ॥ जो स्वस्वरूपातें जाणता ॥ आणि अभाग्य तो निरुता ॥ जो नेणें स्वस्वरूपातें ॥ १८ ॥ समस्त ये पृथ्वीचें राज्य कीजे ॥ अथवा इंद्रब्रह्मादि पदीं बैसिजे ॥ तरि तें अभाग्याचि बोलिजे ॥ स्वस्वरूप ज्ञानेंविण ॥ १९ ॥ ऐसा अभाग्य हा जन ॥ तेणें विषयाचि मानिले निर्वाण ॥ ज्यासि स्वस्वरूपाचें अपरिज्ञान ॥ व्यर्थ त्याचा जन्म गेला ॥ २० ॥ जैसा व्याळडंखी प्राणियासी ॥ मग देहासि यातना होय विशेषीं ॥ तेसें ब्रह्म सुख टाकून सेवी विषयासी ॥ परि अंतीं दुःख भोगितसे ॥ २१ ॥ पण जो या विषयांचा कोंहीं परिपाक ॥ तो तंव केवळ मरणदायक ॥ हें न कळोन कोणी एक ॥ सेवी विपाभ्र हें ऐसें ॥ २२ ॥ तेणें न्यायें करूनि ॥ अज्ञान जन जो कोणी ॥ हा विषय विष नेणोनि ॥ सुख मानुनी करी सेवन ॥ २३ मृगजळाचें परि दर्शन ॥ होतां भासे सूर्यकिरण ज्ञान ॥ तैसे विषयांचें परिज्ञान भान ॥ सेवितां अंतीं दुःख पावे ॥ २४ ॥ याळागीं स्वस्वरूपातें नेणती ॥ ह्मणोनि विषयपरिणाम न देखती ॥ परिपाक अभावें मानिती ॥ सुख विषयांचे ठाईं ॥ २५ ॥ ब्रह्म सुख तें कडू वाटे निश्चयेंसी ॥ विषयसुख हें गोड मानी विशेषीं ॥

तसें अज्ञानी सारासार न मानुनि मानसीं ॥ विषय सेविती सुखरूप ॥ २६ ॥

## बुधोप्याद्यंतवैरेषु यः पदार्थेषु मूढधीः ॥
## बध्नाति वासनां भूयो नरो नासौ स गर्दभः १७

आतां आणिक येक दृष्टी पाहतां ॥ आलिकडेचि विचार करितां ॥ विषयाची नश्वरता ॥ अपरोक्ष ज्ञान दिसतसे ॥ २७ ॥ आतां आहे क्षण एक नाहीं ॥ तें तरी मकळ न दिसे पाहीं ॥ जाणोनियां ऐसेंही ॥ आदि अंतीं वैर असे ॥ २८ ॥ अतिमूढधी जो कांहीं ॥ तो मागुतोनि पदार्थाच्या ठाईं ॥ वासना लक्षण रज्जुनें पाहीं ॥ बांधिलासे हा सदृढ ॥ २९ ॥ जसी मैंदाच्या भ्रमाची मोठी ॥ घातकता कळे परि संग न सोडी ॥ तसी विषयविपाची अगोडी ॥ कळोनि प्राणी बद्ध होती ॥ ३० ॥ जैसी इंद्रजाळींची करणी ॥ देखतांचि दृष्टिबंध नयनीं ॥ तसा देखताचि न देखे प्राणी ॥ पदार्थी ब्रह्मरहस्य ॥ ३१ ॥ क्लेशींचि करूनि साध्य होती ॥ क्लेशेंचि करूनि भोगा येती ॥ भोग सरलिया अंतीं ॥ क्लेश पावती विषयी हे ॥ ३२ ॥ एवं आदि मध्य अवसानीं ॥ विषयसुखांत डुलतो प्राणी ॥ नदेखेही दुःखाची खाणी ॥ या जन्ममृत्युपासोनि लवकर मुक्त व्हावें ॥ ३३ ॥ वासनेनें बांधला दृढतर ॥ कल्पांतींहीं नसुटे साचार ॥ तो मनुष्य नव्हे हा निर्धार ॥ गर्दभ रूपें अनुगमला ॥ ३४ ॥ गाढवी-

मागें धावतां ॥ मुखावरी पावे लत्ता ॥ तरी विषय लंपटता ॥ नटाकूनि धांवे मागें ॥ ३५ ॥ विषययोगें प्राणी तैसा ॥ अघात पावोनि दुर्दशा पावे आशा ॥ परि वैर सुटोनि न उमजे सहसा ॥ ह्मणोनि गर्दभ बोलिला ॥ ३६ ॥ संकल्प न सुटे अंतरींचा ॥ ह्मणोनि संयोग नतुटे विषयाचा ॥ यालागीं दुःखमूळ संकल्पाचा॥ ये अर्थि निरोपण ॥ ३७ ॥

## यत्किंचिदपि संकल्पान्नरो दुःखे निमज्जति ॥
## न किंचिदपि संकल्पात्सुखमक्षय्यमश्नुते ॥ १८ ॥

यत्किंचित् ह्मणजे जें कांहीं ॥ जितका संकल्पमात्र पाहीं ॥ तेणें करून दुःखाचे डोहीं ॥ प्राणि होय निमग्न ॥ ३८ ॥ शिळा बांधोनि उदरीं ॥ बुडिजे जैसें सागरीं ॥ संकल्पाचेनि जडत्वें जरी ॥ तेच परी होय जीव ॥ ३९ ॥ जन्ममरण अनेक ॥ दुःखसमुद्र दायक ॥ उदरीं संकल्पशिळा सम्यक ॥ तेणें योगें बुडे प्राणी ॥ ४० ॥ एवं संकल्प अणुमात्र तिहिं ॥ दुःखदायक येथें संदेह नाहीं ॥ जैसें कंटकाग्र किंचित तेंहीं ॥ क्लेश पाववी देहातें ॥ ४१ ॥ आणिकांचें मनीं संकल्प नसे ॥ त्यास हृदयीं विश्रांति असे ॥ निजसुख ये अनायासें ॥ भेटीलागीं तयाच्या ॥ ॥ ४२ ॥ तें सुख कैसें ह्मणसी ॥ तरि तें नपालटे निश्चयेंसी ॥ आणि परिणामीं नये दुःखासी ॥ ह्मणोनि अक्षय बोलिजे ॥ ॥ ४३ ॥ जो निःशेष संकल्पत्यागी ॥ तो हें अक्षयसुख भोगी ॥

आणि परमात्मा सुखयोगी ॥ तोचि एक निर्धारें ॥ ४४ ॥ आत्मया चित्ता पडे मिठी ॥ तेव्हां संकल्पकांहीं तुटी ॥ निःसंकल्प करून भेटी ॥ होय अक्षय सुखाची ॥ ४५ ॥ आत्मसुखाचिया ज्ञाना ॥ अंतरीं संकल्प उठती नाना ॥ संकल्पें करूनि दुःखया तना ॥ जन्ममरणा पात्र होय ॥ ४६ ॥

**यथा स्वप्ने मुहूर्त्तं स्यात्संवत्सरशतं भ्रमः ॥**
**तथा मायाविलासोयं जायते जाग्रति भ्रमात्॥१९॥**

जसें सुषुप्तीमाझारीं ॥ देखिजे स्वप्न मुहूर्तवरी ॥ त्या स्वप्नाच्या व्यवहारीं ॥ संवत्सरशत होय भोग ॥ ४७ ॥ तैसेंच क्षणभरि विस्मरण आत्मयाचें ॥ तेंचि जागृतीं भ्रमसाचें ॥ जेणें दाविलें भान स्वप्नाचें ॥ तो हा मायाविलास ॥ ४८ ॥ विस्मरण तरी क्षणभरी ॥ परि कल्पना कोटी भासल्या व्यवहारीं ॥ जन्म मृत्यू भरोवरि ॥ अनेकापरी यातायाती ॥ ४९ ॥ तोचि सुषुप्ति जे जागृतितें पावे ॥ तें तात्काळ होय प्रभावें ॥ स्वाव होय स्वभावें ॥ संकल्परसभोग ॥ ५० ॥ जग जागृत होऊन पुरें निश्चित ॥ तंव लटिकें संवत्सरशत ॥ लटिकी भरोवरी अनंत ॥ उरे यथार्थ आपण ॥ ५१ ॥ तैसा होत स्वरूपरमू ॥ तोचि मानिला हे जगभ्रमू ॥ मग नदिसे संसारआगमू ॥ विलासभ्रमूमायेचा॥५२॥ कल्पकोटीजे जीवदशा ॥ भोगिली ते नभासे सहसा ॥ भ्रम निरस होय नवलाव ऐसा ॥ गुरुवाक्य प्रमाण उमजतां ॥ ५३ ॥

तेंव्हा यथार्थ आपुला आपण ॥ असत्य झालें भवभान ॥ कल्प-कोटी जीवपण ॥ भोगिलें तें मिथ्या वाटे ॥ ५४ ॥ ऐसें स्वरूप उमजे निश्चिती ॥ जोपुरुष गा रघुपती ॥ तो असे कवणे स्थिती ॥ तेंचि सांगों आतां निर्धारीं ॥ ५५ ॥

**योंतःशीतलया बुद्ध्या रागद्वेषविमुक्तया ॥**
**साक्षित्वात्पश्यते देही जीवितं तस्य शोभते ॥२०॥**

संकल्प येनि अभावें ॥ अंतरीं शीतळ होय स्वभावें ॥ तेथें बुद्धी शीतळ हें बोलावें ॥ काय लागे वेगळें ॥ ५६ ॥ ऐशी अंतरिंची शीतळ बुद्धी झाली ब्रम्हरसीं ॥ जे सोडिली रागद्वेषीं ॥ ते बुद्धी करून निश्चयेंसी ॥ जो द्रष्टा होय अखंड ॥ ५७ ॥ पिंडब्रह्मांड जगद्जाळ ॥ हे साक्षत्वें पावे सकळ ॥ हे येणें पदें केवळ ॥ निर्धारूचि सूचिला ॥ ५८ ॥ पृथ्वी बुडो हो प्रळयजळें ॥ अथवा आकाश तुटोनि पडो सगळें ॥ परि तो कदापि न ढळे ॥ साक्षित्वें मर्यादशीळ जाहला ॥ ५९ ॥ स्फुरणा-च्या शिरीं बैसोनि ॥ त्या अवलोकी साक्षी होवोनि ॥ धन्य त्याचें जीवित्व जनीं ॥ परब्रह्म स्वयें होऊनि ठेला ॥ ६० ॥ तोचि सकळांसि आद्य ॥ तो ब्रह्मादिदेवांस वंद्य ॥ त्याचा महिमा अभेद ॥ प्राणियांसि तारक तो ॥ ६१ ॥ धन्य त्याची कुळखा-णी ॥ धन्य कृतार्थ त्याची जननी ॥ धन्य ते अवनी पवित्र होय त्याचेनी ॥ जेथें पाऊल पडे त्याचें ॥ ६२ ॥ जिकडे तो पाहे

दृष्टीं ॥ तिकडे कृतार्थ होय सृष्टी ॥ तयाच्या मधुर गोष्टी ॥ बोधेंसि उठती तात्काळ ॥ ६३ ॥ मरोनिजयाचें जिणें ॥ कीं जी निजयाचें मरणें ॥ असो आतां हेंहि बोलणें ॥ अखंडरूप त्याचे ठाई ॥ ६४ ॥ जो आत्मोपपत्ती अमळा ॥ भोगी चिद्घनसुखाचा सोहळा ॥ तेचि आत्मोपपत्ती भूपाळा ॥ ऐक आतां रघुवीरा ॥ ६५ ॥

**हृदयाकाशमात्रस्य विनाशे देहनाशतः ॥**
**व्यर्थं भूतानि शोचंति नष्ट आत्मेति संशयात् ॥२१॥**

देहसी आत्मस्वरूप जाण ॥ परि देहपातें न पावे खंडण ॥ हृदयाकाशाचें नाशन ॥ होय देहविनाशें ॥ ६६ ॥ हृदयें आवरिलें आकाश ॥ तेंचि बोलिलें हृदयाकाश ॥ देह नाशें त्याचा अविनाश ॥ तोचि स्वरूपीं यथास्थित ॥ ६७ ॥ देहनाशाचें ज्यासि ज्ञान ॥ तो केवि देहनाशें पावे मरण ॥ शाश्वतरूप ह्मणोनि जाण ॥ नघडे खंडण तयाचें ॥ ६८ ॥ अज्ञानें बापुडीं भूतें ॥ पामरें नेणती परमार्थातें ॥ नाश जाहला आत्मयातें ॥ ह्मणोनी व्यर्थ शोचती ॥ ६९ ॥ आहाहो ह्या आरशाचें हरपलें वदन ॥ ह्मणोनि कोणीएक करी रुदन ॥ तसीं भूतें अति अज्ञान ॥ आत्मनाशें शोचती ॥ ७० ॥ किं स्वप्नींचा मीन दिसे ॥ ह्मणोनि कोणाएका लागलें पिसें ॥ अज्ञानी भाविती तसें ॥ मरण आत्मयाचे ठाई ॥ ७१ ॥ परी इतुकें नकळे मूढातें ॥ कीं आपण जाणता देहनाशातें ॥ तरी नाश केवि घडे आत्मयातें ॥ व्यर्थ

शोकातें कां करावें ॥ ७२ ॥ एवं जाहलिया देहपातू ॥ अवि-
नाश संचली आत्मवस्तू ॥ हा निर्णय परम सिद्धांतू ॥ आतां
दृष्टांतू येचि अर्थीं ॥ ७३ ॥

**घटादिषु प्रनष्टेषु यथाकाशमखंडितम् ॥**
**तथा देहेषु नष्टेषु देही नित्यमलेपकः ॥ २२ ॥**

घटादिकां जाहालिया नाश ॥ न नासे अंतरींचा अवकाश ॥ तो
अखंडित अविनाश ॥ तैसाचि न्यायें श्रीरामा ॥ ७४ ॥ पांचभौतिक
देहासी ॥ नाश जाहलिया परियेसी ॥ देही जो आत्मा त्यासी ॥
न घडे नाश सर्वथा ॥ ७५ ॥ देहपात जरी प्रकाशे ॥ तरी आत्मा केंवि
नासे ॥ जैसा तैसाचि नित्य असे ॥ अलिप्त अबाध शाश्वत ॥ ७६ ॥
आतां ब्रह्मांडप्रळयें नासला ॥ तरी उत्पत्तिभाव कोठूनि झाला ॥
आणि मागें ऐसा प्रळय वर्तला ॥ तो सांगितला कोणें आह्मा
॥ ७७ ॥ तस्मात् पिंडब्रह्मांडभावें ॥ आत्मा अलेपक स्वभावें ॥
हें जाणूनि निजानुभवें ॥ सुखी रहावें सर्वदा ॥ ७८ ॥ परमात्मा
परम निर्वाण ॥ अलेप अखंड सनातन ॥ याचअर्थींचें निरूपण ॥
पुढिले श्लोकीं कथितसे ॥ ७९ ॥

**जायते म्रियते नैव कचित्किंचित्कदाचन ॥**
**जगद्विवर्त्तरूपेण केवलं ब्रह्म जृंभते ॥ २३ ॥**

कोणेहिकाळें कांहीं ॥ होणें जाणें जया नाहीं ॥ जेंवि सवितयाचे

ठाईं ॥ उदयास्ताचा अभाव ॥ ८० ॥ त्यासि कल्पावें जनन ॥ तरी उपजविता ह्मणावा कवण ॥ उपजविल्याचें उत्पत्तिस्थान ॥ स्वयें आपण तो मदून ॥ ८१ ॥ एवं संभवप्रकारें न संभवे ॥ तरी नाश ऐसें कैंचि बोलावें ॥ ह्मणोनि बोलिलें येणें भावें ॥ जायतेम्रियते नेव ॥ ८२ ॥ शाश्वत त्याची आस्तिकता ॥ अभाव निजभाव स्फुरविना ॥ कांहीं न मांटे प्रकाशता ॥ जो जाणता सकळांचा ॥ ८३ ॥ सकळांसि वेगळेपणें ॥ जाणे ऐसें न घडे सांगणें ॥ जगद्विवर्त्तरूप येणें ॥ तो केवळ ब्रह्मरूप ॥ ८४ ॥ उरगपणें दृश्यमान ॥ त्यासि रज्जुचि कीं अधिष्ठान ॥ कारणाहून विलक्षण ॥ कार्य कैसें बोलावें ॥ ८५ ॥ तैसें विवर्त्ताचें जें कारण ॥ त्या भ्रमासि प्रकाश अधिष्ठान ॥ तरी भ्रमुच प्रकाशरूप ह्मणून ॥ विवर्त्त अन्य बोलोंनये ॥ ८६ ॥ याल्यागीं जगद्विवर्त्तरूपें विश्रुत ॥ केवळ ब्रह्मचि निश्चित ॥ ज्ञाना ज्ञेय ज्ञानें सहित ॥ प्रकाश सतत सर्वदा ॥ ८७ ॥

**आकाशादपि विस्तीर्णः शुद्धःसूक्ष्मोऽव्ययःशिवः॥**
**य आत्मा स कथं राम जायते म्रियतेऽथवा ॥२४॥**

पदार्थरूपें भासमान ॥ ह्मणोनि आकाश पूर्ण ॥ आकाशाहूनि विस्तीर्ण ॥ स्वप्रकाश परमात्मा ॥ ८८ ॥ आकाशआरोपीं रंग बसले ॥ ह्मणोनि शुद्धत्वा मुकलें ॥ स्वरूप आकाशाहूनि शुद्धत्वा आलें ॥ अरूपातीत ह्मणोनी ॥ ८९ ॥ निराभास

तरी भासे ॥ म्हणोनि गगनीं जडत्व वसे ॥ स्वरूप निराभास परी न भासे ॥ यालागीं गगनाहूनि सूक्ष्म ॥ ९० ॥ नभरूप रूपा आलें ॥ म्हणोनि प्रळयासि सांपडलें ॥ स्वरूपीं प्रळयासि प्रकाशिलें ॥ यालागीं तें नभाहूनि अव्यय ॥ ९१ ॥ पदार्थसर्गाभावें ॥ व्योमीं अकल्याण पावावें ॥ यालागीं परमात्मस्वरूपभावें॥ व्योमाहूनि शिवरूप ॥ ९२ ॥ एवं विषयो नव्हे शद्वासी ॥ म्हणोनि उल्लंघिलें आकाशासी ॥ अगा श्रीरामा ऐसा जो आत्मा त्यासी ॥ उत्पत्तिनाश केवि घडे ॥ ९३ ॥

**सर्वमेकमिदं शांतमादिमध्यांतवर्जितम् ॥**
**भावाभावविनिर्मुक्तमिति मत्वा सुखीभव ॥ २५ ॥**

हे सर्व जिनके असती जीव मागे ॥ तितुके आत्माचि जाण निर्धारें ॥ जो एकानेकरूप नटला वारे ॥ परी न भ्रंशे एकरूपपण ॥ ९४ ॥ तयाचें अक्षोभ्यपण कैसें ॥ जें स्फुरणामाजि न गवसे ॥ म्हणोनि शांत ऐसें ॥ अभिधान बोलिले बोलतां ॥ ९५ ॥ शद्वापैलिकडे असे ॥ म्हणोनि तया आदि नसे ॥ आदि नसतां कैसें ॥ मध्यस्थान कल्पावें ॥ ९६ ॥ हें प्रेम ऐसें म्हणों जातां ॥ तें होऊनि ठाके प्रमाणता ॥ एवं अनिर्देश्य यालागीं तत्वतां ॥ न ये हाता तें वस्तु ॥ ९७ ॥ तस्मात्सर्वात्मक आणि शांत ॥ आदिमध्यांतवर्जित ॥ आतां भावाभावविनिर्मुक्त ॥ कैसें म्हणसी तरी अवधारीं ॥ ९८ ॥ द्रव्य निहारितां गमे अभावो ॥ सता

दृष्टी तरि गमे भावो ॥ एवं निर्णय पाहतां अभिप्रावो ॥ ऐस गमे येथिंचा ॥ ९९ ॥ दृश्यादृश्य सर्वांग याचें ॥ तरी भावाभावरूप कैंचें ॥ यालागीं बोलिलें साचें ॥ भावाभावनिर्मुक्त ॥ २०० ॥ एतल्लक्षणस्वरूपस्थिती ॥ जाणोनियां यथा निगुती ॥ सुखी व्हावे त्वां रघुपती ॥ जाणणें हें ग्रासूनि ॥ १ ॥ जाणूनि जाणणें याच ग्रास ॥ तेथोंचि सुख हा निर्दोष ॥ जाणोनि सुखें होई सुरस ॥ शब्द बोलिला याचकारणें ॥ २ ॥ आतां स्वरूपअज्ञान जयासी ॥ नीचत्व आणूनि तयासी ॥ पुढीलश्लोकोक्ती कैसी ॥ ऐक सावधान श्रीरामा ॥ ३ ॥

## वरं शरावहस्तस्य चंडालागारवीथीषु ॥
## भिक्षार्थमटनं सम्यङ् न मौर्ख्यधृतजीवितम् ॥ २६ ॥

हस्तीं खर्पर घेऊनियां ॥ बिदीं चांडाळगृहाचिया ॥ तेथें भिक्षेलागुनियां ॥ अटण करावें हें भलें ॥ ४ ॥ परी स्वरूपज्ञानेंविण मूर्खपणें ॥ असे त्याचें जळो जिणें ॥ जन्मा येऊनि जेणें ॥ विषयसुखचि साधिलें ॥ ५ ॥ प्रपंचचक्रीं सुखें अलंकारिला ॥ महदैश्वर्यें दिसे आथिला ॥ आणि येकें परमार्थ जरी वोसांडिला ॥ तरी तो नीचाहूनि नीच ॥ ६ ॥ खापर घेऊनि हस्तावरी ॥ चांडाळगृहीं तो भिक्षा करी ॥ आणि स्वरूपज्ञाने उज्वळ करी ॥ तरी श्रेष्ठाहुनि श्रेष्ट ॥ ७ ॥ म्हणोनि स्वरूपज्ञानेंविण ऐसेंजे ॥ त्याहुनि आणिक दुःख न देखिजें ॥ येचि अर्थी निरोपिजे ॥ पुढिले श्लोकीं सुललित ॥ ८

# न व्याधिर्न विषं राम तथान्यदपि भूतले ॥
# दुःखं यस्य शरीरस्थं मौर्ख्यमेतद्यथानृणाम्॥२७॥

शरीरस्थ मौर्ख्य जें जाण ॥ तें जैसें दुःखासि कारण ॥ तैसें व्याधींकरून ॥ दुःख नव्हे प्राणियासी ॥ ९ ॥ श्रीरामा आणि-कहि पाहतां भूतळ ॥ न दिसे ऐसें दुःख सबळ ॥ ऐसें हें अंतर्बाह्य दाहक केवळ ॥ होय अज्ञानजनमौर्ख्य ॥ १० ॥ रोगासि प्रयत्न चाले औषधाचा ॥ विषासि उतार असे साचा ॥ परि मूर्खअज्ञानजनाचा ॥ दुःखप्रवाह अनिवार ॥ ११ ॥ अंतरींच मौर्ख्य तळख ॥ तें निरसावया सेविजे विषयसुख ॥ तरी तेणें अधिक पाविजे दुःख ॥ एक दृष्टांत ये अर्थी ॥ १२ ॥ विझवावया हुताशन ॥ स्नेहें जरी कीजे सिंचन ॥ तरी केंवि घडे उपशमन ॥ अधिकाधिक वाढेच किं ॥ १३ ॥ उदरशूळाचें निरसन ॥ व्हावया शर्करा कीजे सेवन ॥ तरी केंवि घडे उपशमन ॥ अधिकाधिक वाढेच कीं ॥ १४ ॥ व्हावया तृषा निवारण ॥ सिंधुजळ कीजे प्राशन ॥ तरी न घडे उपशमन ॥ अधिकाधिक वाढेच कीं ॥ १५ ॥ तैसें मौर्ख्य तळखी निरसन ॥ करावया कीजे विषय-सेवन ॥ तेणें केंवि घडे उपशमन ॥ अधिकाधिक वाढेचकिं ॥ १६ ॥ वेषयसेवन नये उपयोगा ॥ यालागीं प्रयत्नें राहें सहजचि उगा ॥ एवं वा हे प्रयत्नें विषय नये भंगा ॥ मूर्खपणाचें हें दुःख ॥ १७ ॥

स्थिरता ॥ क्षीरमहार्णवीं पैं ॥ १३ ॥ तैसें तीरासूनि मुरडतां ॥ मन संयमें पावे स्थिरता ॥ तैं स्वरूपीं स्वरूपनिश्चलता ॥ भ्रम सर्वथा बोलूं नये ॥ १४ ॥ तस्मात् मनाचें जें स्थिरपण ॥ तेंचि भ्रमाचें निरसन ॥ आणि भ्रमाचें जें अदर्शन ॥ तेंचि दर्शन स्वरूपाचें ॥ १५ ॥ एवं ऐश्वर्य चांचल्यभाव मनाचा ॥ तोचि उदय लय संसाराचा ॥ पुढील श्लोकीं तयाचा ॥ हाचि-अन्वय जाणावा ॥ १६ ॥

## चित्तोन्मेषनिमेषाभ्यां संसारस्योदयक्षयौ ॥
## वासनाप्राणसंरोधादनिमेषं मनः कुरु ॥ २ ॥

विचारितां चित्त न्यासें ॥ मनासी बोलिजे चित्त ऐसें ॥ त्या चित्ताचेनि निमिषें ॥ संसाराचा उदय पैं ॥ १७ ॥ कल्पना मात्र स्फुरण ॥ तोचि चित्ताचा उदय जाण ॥ तेणें उदयें भवभान ॥ भासे नाथिलें स्वरूपीं ॥ १८ ॥ दृष्टी व्याप जैं कवळे ॥ तैं शुभ्रवस्त्र दिसे पिंवळें ॥ तैसें चित्तोद्भवमळें ॥ स्वरूप भासलें भवरूप ॥ १९ ॥ तोचि कवळ जाय दृष्टीचा ॥ तैं यथार्थ भास शुभ्रवस्त्राचा ॥ तैसा उन्मेष चित्ताचा ॥ जाहलिया संसार नदिसे ॥ २० ॥ तस्मात् चित्तोदयें संसारउदयो ॥ चित्तनाशें संसारलयो ॥ एवं चित्ताचा जो जयो ॥ तेचि संसारनिवृत्ती ॥ २१ ॥ त्या मनोजयाचें साधन ॥ ऐक श्रीरामा सावधान ॥ मनाचें चंचळपण ॥

होय वासनायोगें ॥ २२ ॥ सहायता अथी प्राणाची ॥ ते वासनेसि भेटी विषयांची ॥ म्हणोनि जें कांहीं धांव वासनेची ॥ तेप्राणाधीन ॥ २३ ॥ एवं प्राणयोगें उठे वासना ॥ वासनायोगें उद्भव मना ॥ मनाचे उद्भवें जाणा ॥ या भवभाना उदयो ॥ २४ ॥ तरी वासना प्राण निरोध करून ॥ अनिमेष करीं मन ॥ तरी तें करितें लक्षण ॥ सांगों विशद आतां ॥ २५ ॥ विषयांपासून वासना वळवावी ॥ ते मागुती अधिष्ठाना नाणावी ॥ मध्येंचि स्थिरता करावी ॥ निरालंबीं तियेची ॥ २६ ॥ निरालंबीं वासना ठेवितां ॥ घडे प्राणाची निरोधता ॥ प्राणनिरोध जाहला असतां॥ वासना वितळोनि जाय ॥ २७ ॥ वासना जेथें नाहीं ॥ तेथें मन बोलोंचि नये कांहीं ॥ मनाचेनि अभावें पाहीं ॥ हें भवभान न दिसे ॥ २८ ॥ भवभान जैं न भासे ॥ तैं सर्वत्र स्वरूपचि असे ॥ तेणें करावें साधन ऐसें ॥ प्राणनिरोधापासूनि ॥ २९ ॥ हा एक प्रकार तुजप्रति ॥ निरूपिला गा रघुपति ॥ आतां सांगूं यथानिगुति ॥ दुसरा एक प्रकारू ॥ ३० ॥

यथाऽयं स्वविकल्पोत्थः स्वविकल्पपरिक्षयात् ॥
क्षीयते दग्धसंसारो निःसार इति निश्चयः ॥३॥

माझी हे कल्पना ऐसें जाणणें ॥ ते स्वविकल्पपरिक्षयो म्हणणें ॥ परी क्षयाचें जन्मणें ॥ स्वविकल्पापासूनि ॥ ३१ ॥

स्वरूपोन्मुख जें स्फुरण ॥ त्यासीच स्वविकल्प ऐसें अभिधान ॥ असो त्या स्वविकल्पापासून ॥ होय स्वविकल्प परीक्षा ॥ ३२ ॥ येपरिक्षयेंकरूनि आपणा ॥ वेगळी पडे कल्पना ॥ मक्षय मीन जैसा जीवना ॥ वेगळा होतांचि मरे ॥ ३३ ॥ तैसी आपणा-वेगळी कल्पना ॥ होतांचि मरे रघुनंदना ॥ केंवि बोलवे मना ॥ कल्पनेचेनी अभावें ॥ ३४ ॥ भव नाहीं जरी मनातें ॥ तरी संसार सहजाचि आला क्षयातें ॥ मग दग्धपटाचेनि दृष्टांतें ॥ नुरोनियां उरे संसार हा ॥ ३५ ॥ संसार ऐसें दिसे ॥ परी निःसारपणेंचि असे ॥ एवं नुरोनियां उरणें ऐसें ॥ निश्चयें जाण संसाराचें ॥ ३६ ॥ तस्मात् ऐसी निःसार संसारस्थिती ॥ हेचि पुढें उपपत्ती ॥ सांगों श्रीरामा तुजप्रती ॥ दृष्टांतें सहवर्त-मान ॥ ३७ ॥

**परिज्ञाते हि सर्पत्वे चित्रत्वं तु विनश्यति ॥**
**यथा तथैव संसारे स्थित एवोपशाम्यति ॥ ४ ॥**

चित्रसर्पाचें सर्पपण ॥ नासे रंगपरिज्ञानेंकरून ॥ तेथ आका-राचें नाशन ॥ कवणा कार्या बोलावें ॥ ३८ ॥ सर्प जैसा तैसाचि असे ॥ परि सर्पपण रंग दृष्टीनसे ॥ संसारभान तैसें ॥ असतचि नदिसे सर्वथा ॥ ३९ ॥ संसाराचे संसारपण ॥ नासीस्वरूपपरिज्ञान ॥ परंतु जें कांहीं भान ॥ तें यथावस्थित

असे ॥ ४० ॥ एवं असतचि उपशमातें ॥ पावला संसार जाण निरुतें ॥ संसारपण जें मायाकृत होतें ॥ तें मायानाशें नासलें ॥ ॥ ४१ ॥ ते माया किंलक्षण ॥ करीं गा रघुनाथा श्रवण ॥ पुढिले श्लोकीं निरोपण ॥ ऐसेंचि अन्वयें चालिलें ॥ ४२ ॥

**ईदृशी राम मायेति यास्वनाशेन हर्षदा ॥**
**न लभ्यते स्वभावोस्याः प्रेक्ष्यमाणैव नश्यति ॥५॥**

रामा हे माया ऐसी जाण ॥ जें नसतें दावी भवभान ॥ जें पूर्वी बोलिलें मन ॥ तेंचि रूप इयेचें ॥ ४३ ॥ जैसें आटे कुरंगनीर ॥ कीं उद्वस होय गंधर्वनगर ॥ कीं निवर्ते वंध्याकुमर ॥ तैसा नाशु इयेचा ॥ ४४ ॥ स्वप्नीं शत्रु जो जाहला ॥ तो प्रबोधीं न मरोनीचि मेला ॥ तयेपरि नाश जाहला ॥ स्वरूपज्ञानें मायेचा ॥ ४५ ॥ परि स्वयें वळी होऊन ॥ साधूनि देहरूपें निधान ॥ हा इयेचा सम्यक्गुण ॥ स्वनाशें हर्षदायक ॥ ४६ ॥ त्या हर्षाची व्यक्ती ऐक कैसी ॥ जरी हर्षाविषाद माया ग्रासी ॥ मग आपणहि ये नाशासी ॥ कर्पूरदहनीं अग्नि जैसा ॥ ४७ ॥ एवं हर्षविषादें नासे माया ॥ मग जे स्थिति उरे रघुराया ॥ जे विषयो नव्हे स्फुरावया ॥ हर्ष ऐसें बोलिजे तयासी ॥ ४८ ॥ सुखमस्यात्मनोरूपं हें वचन ॥ श्रुति असेंचि जाण ॥ आनंदं ब्रह्मणो रूपं म्हणोन ॥ दुसरें बोले उपनिषद ॥ ४९ ॥ याळागीं

निर्वाणस्थितीतें ॥ हर्ष ऐसें बोलिजे निरुतें ॥ एवंविधरूप हर्षातें ॥ स्वयें नाशोनि दे माया ॥ ५० ॥ आणीकही अपूर्वता ॥ ये मायेचें क्षोभ्यपण पाहतां ॥ थाकूं नपाविजे तत्वतां ॥ अनिर्देश्य ह्मणोनि ॥ ५१ ॥ मृगजळ निधीचें प्रमाण ॥ करी ऐसा आहे कवण ॥ तैसें मायेचें निर्वचन ॥ केलेंचि नवचे सर्वथा ॥ ५२ ॥ हे दृश्यभावें धरूं जातां ॥ नाहींचि होय तत्वतां ॥ आणि अदृश्य ह्मणोनि उगें राहतां ॥ दृश्याकारें विस्फुरे ॥ ५३ ॥ इचें मूळ हेंचि निश्चित ॥ ह्मणोनि केवळ आदिवंत ॥ अनादि ह्मणों तरी नाशवंत ॥ अपरोक्षभावें गमतसे ॥ ५४ ॥ आतां नाश बोला तरी नव्हे वेगळी ॥ अविनाश ह्मणों तरि नसे मुळीं ॥ जड ह्मणों तरि व्यापक सकळीं ॥ अजड ह्मणों तरि निरसतसे ॥ ॥ ५५ ॥ स्थूळ ह्मणों तरि महत्त्वा पलिकडे ॥ सूक्ष्म ह्मणों तरि महाभूतां ऐलिकडे ॥ एवं विचारासि कानडें ॥ इचें रूप सर्वथा ॥ ५६ ॥ ह्मणोनि निश्चयो हाचि आतां ॥ इयेचा स्वभाव विचारितां ॥ विचाराचेनि नये हाता ॥ अविचारें ततोपि न घडे ॥ ५७ ॥ तम दृश्य असावें प्रकाशा ॥ तरि तम प्रकाशें येईल नाशा ॥ अथवा तमें तम नासे हाहि ऐसा ॥ शब्द न घडे सर्वात्मना ॥ ५८ ॥ तैसा विचारें अथवा अविचारें ॥ मायेचा स्वभाव न निर्धारे ॥ परंतु विवर्त्ताचेनि आधारें ॥ इतुकें दावी लाघव ॥ ५९ ॥ इचें एक असे अभिनवपण ॥ जैं आपणासी

पाहे परतोन ॥ तैं तात्काळ इचें अहेवपण ॥ नासोनि जाय निःशेष ॥ ६० ॥ आपुलाचि आपुले माथां कर ॥ ठेवितां भस्म होय भस्मासुर ॥ तैसाचि येथें असे विचार ॥ जाणे चतुर अनुभवी ॥ ६१ ॥ जैसें दृष्टीचें पैं दर्शन ॥ दवडी दृष्टीचें तरळपण ॥ तैसें मायेचें अवलोकन ॥ आपणा आपण नाशक ॥ ६२ ॥ नाशासी यावया हेंचि कारण ॥ जें कल्पनारूप ह्मणोन ॥ कल्पित नाशे येथें अपूर्व कोण ॥ येचि अर्थी पुढिल श्लोक॥६३॥

पुंसो निजमनोमोहः कल्पितोऽनल्पदुःखदः ॥
तस्मात्संसारभावोऽयं विचारेणैव लीयते ॥ ६ ॥

देहपुरीं वर्तमान ॥ ह्मणोनि देहवंतासि पुरुष हें अभिधान ॥ तेणें निजमनें करून ॥ मायामोह कल्पिला ॥ ६४ ॥ त्या कल्पितमोहें देख ॥ गिळिलें जें काहीं निजसुख ॥ आणि उगळिलें महादुःख ॥ अनल्प ह्मणिजे बहुसाल ॥ ६५ ॥ जें दुःख पूर्वप्रकरणीं बोलिलें ॥ जें बाह्यप्रयत्नें न जाय निरसिलें ॥ दुःखदान जेणेंचि दिधलें ॥ तें कल्पितमोहाचें लक्षण ॥ ६६ ॥ जैं संधीसि विक्षेप असे ॥ तेथेंचि जं विचार वसे ॥ तेणें विचारें अपैसे ॥ मनीं विरोनियां जाण ॥ ६७ ॥ अधिष्ठानाचा उमज सरेल ॥ तेंचि विचाराचें फळ ॥ असो तेणें फळें समूळ ॥ विक्षेप हरपोनि जाय ॥ ६८ ॥ विक्षेपरूप मन गेलें ॥ तेणें

कल्पनेतें सहजचि नेलें ॥ कल्पनेच्या अभावें उरलें ॥ मोहजाळ कैंवि घडे ॥ ६९ ॥ मोहजाळ जेथें सरे ॥ तेथें अणुमात्र दुःख नुरे ॥ एवं हा संसारभाव निर्धारें ॥ होय विचारें विलयंगत ॥ ७० ॥ ह्मणोनि मनःकल्पित दृश्यविलासु ॥ याचा विचारें होय नाशु ॥ तंतु उकलितां चित्राभासु ॥ पटावरी नुरे जैसा ॥ ७१ ॥ तस्मात्स्वरूपिं दृश्यमृषा ॥ नव्हे तें नव्हेल नाहीं हा भरंवसा ॥ हाचि अन्वयो ऐसा ॥ पुढिल्या श्लोकासीं लागला ॥ ७२ ॥

**यदिदं दृश्यते किंचित्तत्रास्ति किमपि स्फुटं ॥**
**यथा गंधर्वनगरे यथावारि मरुस्थले ॥ ७ ॥**

अंतरींचें कल्पनात्मक भान ॥ आणि बाह्य आकारवंत जाण ॥ ऐसें अंतर्बाह्य मिळोन ॥ दृश्यमान जें कांहीं ॥ ७३ ॥ ब्रह्मभावें करूनि स्फुटतर ॥ तें काहीं न दिसे साचार ॥ ये अर्थी परिकर॥ दृष्टांतद्वय अवधारीं ॥ ७४ ॥ आकाशीं अभ्रें येती ॥ त्यासि गंधर्वनगरें ह्मणती ॥ परंतु तेथें नगरस्थिती ॥ बोलोंचि नये सर्वथा ॥ ७५ ॥ एक उटंकस्थळ ॥ तेथं वर्षतां न दिसे जळ ॥ परि जळास्तिकता केवळ ॥ तेथें बोलोंचि नये पैं ॥ ७६ ॥ तैसें जें काहीं दृश्य दिसे ॥ तें यथार्थ पाहातां नसे ॥ नसे तें स्वरूपचि भासे ॥ हेही ग्रासे ते ठाईं ॥ ७७ ॥ परि अभिनव हें मायार-

हस्य ॥ नसतें नाथिलें दावी दृश्य ॥ विचारून दे निजप्रकाश ॥ होंचि पुढें निरूपण ॥ ७८ ॥

## अहो नु चित्रा मायेयं तात विश्वविमोहिनी ॥
## सर्वांगप्रोतमप्यात्मा तयात्मानं न पश्यति ॥ ८ ॥

आश्चर्यें वसिष्ठ श्रीरामासी ॥ ह्मणे गा बापा परियेसीं ॥ हे विचित्र माया कैसी ॥ अवधानेंशीं करीं श्रवण ॥ ७९ ॥ मोहितसे विश्वासि या ॥ ह्मणोनि विश्वमोहिनी माया ॥ अथवा विश्वशोभा रचावया ॥ हेचि ह्मणोनि विश्वमोहिनी ॥ ८० ॥ देहत्वें असे अपूर्व कोण ॥ परि ब्रह्मत्वें न सोडी अधिष्ठान ॥ ऐसें विशेषाकारें मोहन ॥ ह्मणोनि बोलिली मोहिनी ॥ ८१ ॥ इणें मोहिला जो प्राणी ॥ तो सर्वांगीं आत्माचि असोनि ॥ देहामाजी कोंडोनि ॥ अपूर्वत्वें राहिला ॥ ८२ ॥ आत्मा ह्मणजे आपण निश्चयेंसि ॥ सर्वांगीं म्हणिजे सकळ विश्वासी ॥ असोनि न देखे आपणासि ॥ जाहला एकदेशी देहामाजी ॥ ८३ ॥ अहाहा गगन बांदवडी पडिलें ॥ किं उदक ताहानें पीडिलें ॥ तैसें आत्मया आवरण जाहालें ॥ देहाचेनि प्रमाणें ॥ ८४ ॥ ऐसा अघटित घडिला प्रकारु ॥ हा माया मोहाचा पडिवारु ॥ म्हणोनि इयेचा विचारु ॥ विचित्र रूपें अनुगम ॥ ८५ ॥ विचित्र मायेचें नाशन ॥ तेंचि

णें आपुलेनि सज्ञान ॥ तो कैसा स्वयें आपण ॥ तेंचि सांगों पुढती आतां ॥ ८६ ॥

यत्तु नो दृश्यते किंचिदंतस्थं चापि किंचन ॥
अविनाशवदस्तीह तत्सदात्मनि कथ्यते ॥ ९ ॥

जें जवळि असतांहि दिसों नेणे ॥ परंतु न वेष्टिजे अभावगुणें ॥ ज्ञप्तिमात्र अविनाशपणें ॥ ये शरीरीं नांदतसे ॥ ८७ ॥ मृगजळीं न बुडे सविता ॥ तैसी स्फुरणीं त्याची अलिप्तता ॥ अविनाशवदास्तिकता ॥ स्फुरणाभावें करूनि ॥ ८८ ॥ नभाऐसें पोकळ ॥ परि पोकळपणें निबिड केवळ ॥ केवळ सद्गुरु ह्मणोनि सकळ ॥ चाळी चाळकपणेंविण ॥ ८९ ॥ जे प्रतीयमान स्फुरणामिसें ॥ ते तंव नाशें अवतलें दिसे ॥ यालागीं बोलिलें अविनाश ऐसें ॥ स्फुरणाचेनि अभावें ॥ ९० ॥ जगातें प्रकाशी सविता ॥ परि जगचेष्टेची नेणे वार्त्ता ॥ कीं लोक वर्त्तती राजसत्ता ॥ न ओळखे लोकां नृपती जैसा ॥ ९१ ॥ तैसें विश्व चाले तत्प्रकाशें ॥ परि विश्वाभासु तेथें नसे ॥ प्रकाशाभावें स्वप्रकाश वसे ॥ अलिप्त ऐसें सद्गुरु रूप ॥ ९२ ॥ एवं दृश्य आणि नाश ॥ सत्तारूपें सावकाश ॥ तें ये देहीं स्वप्रकाश ॥ आपुल्या ठाईं बोलिजे ॥ ॥ ९३ ॥ ऐसी जे निरालंब वस्तू अवधारी ॥ तें स्वर्गमृत्युपाताळकुहरीं ॥ वैकुंठ कैलास क्षीरसागरीं ॥ बोलों नये सर्वथा

॥ ९४ तें वस्तु स्वयें आपण ॥ जिचेनि दृश्याचें घडे दर्शन ॥ पुढिले श्लोकीं निरोपण ॥ येणेंचि अन्वयें चालिलें ॥ ९५ ॥

स्वज्ञानदर्पणे स्फारे समस्ता वस्तुदृष्टयः ॥
इमास्ताः प्रतिबिंबंति सरसीव तटद्रुमाः ॥ १० ॥

या दृश्यरूपा समस्ता वस्तु ॥ स्वज्ञानदर्पणा आंतु ॥ प्रतिबिंब येथ दृष्टांतु ॥ येक असे अवधारीं ॥ ९६ ॥ तटाकींचे द्रुम जये परि ॥ बिंबती सरोवरा माझारि ॥ तैसा द्रष्ट्याच्या उदरीं ॥ दृश्याभासु प्रतिबिंबे ॥ ९७ ॥ एवं दृश्याचें दर्शन ॥ तो द्रष्टा स्वयें आपण ॥ ह्मणोनि द्रष्टा दर्शन ॥ आपणचि आपण सर्वथा ॥ ९८ ॥ ऐसिये सम्यक् दृष्टीच्या उदयो ॥ तोचि संसाराचा उदयो ॥ ह्याचि लागला अन्वयो ॥ पुढिल्या श्लोकींचिया निरूपणा ॥ ९९ ॥

सर्गश्चित्स्पंदमात्रात्मा सम्यग्दृष्ट्यैव लीयते ॥
उदेत्यसम्यक् दृष्टौ स रज्जौ सर्पभ्रमो यथा ॥ ११ ॥

स्पंदमात्र चित्स्वरूपिंचा ॥ तोचि चित्स्पंद साचा ॥ अभिप्राय याचि शब्दाचा ॥ विशद करूनि सांगों ॥ १०० ॥ अज्ञान अथवा विपरीत ज्ञान ॥ तद्रूप उल्लेख तोचि स्पंद जाण ॥ त्यासि सर्ग हें अभिधान ॥ उपजवी भवभान ह्मणउनि ॥ १ ॥ एवं जे संधिस्वरूपाचि ॥ तेचि उत्पत्ति संसाराचि ॥ द्रष्टा दृश्य दर्शनाचि ॥

प्रतीति जेणें रूपस ॥ २ ॥ आतां तें संधीचें जें साधन ॥ तेंचि सम्यक् दृष्टीचें दर्शन ॥ त्या सम्यक्दृष्टीकरून लय होय सर्गाचा ॥ ३ ॥ आणि असंधान जें संधिचें ॥ तेंचि असम्यग्दृष्टि साचें ॥ तेंचि संसारउदयाचें ॥ अधिष्ठान निर्धारें ॥ ४ ॥ रज्जुदर्शन संधि जैसी ॥ अधिष्ठान सर्पभ्रमासी ॥ तोचि सर्पभ्रम ये नाशासी ॥ जें संधिचें संधान ॥ ५ ॥ तैसें उल्लेखें संसारचित्र पाहीं ॥ अनुल्लेखें कांहिंच नाहिं ॥ स्वरूपिं संधि जो कांहीं ॥ तोचि उल्लेख बोलिजे ॥ ६ ॥ त्या उल्लेखाचें रूप करूनि ॥ सांगिजेति बंधमोक्ष दोनि ॥ तें तूं श्रीरामा आकर्णीं ॥ पुढिले श्लोकीं निरूपण ॥ ७ ॥

## भोगभावनया याति बंधो दार्ढ्यमवस्तुजः ॥
## तयोपशांतया याति बंधो जगति तानवं ॥ १२ ॥

भोगभावनें करून ॥ अवस्तुजन्य बंधन ॥ पावे दृढत्व हेंचि अर्थन ॥ सांगों स्पष्टाभिप्रायें ॥ ८ ॥ अर्थ घेउनि विवर्त्त पसरे ॥ तोचि भोगभावना निर्धारें ॥ तेचि भोगभावना करूनि वारे ॥ अवस्तुभाव संभवे ॥ ९ ॥ वस्तुहूनि विलक्षण ॥ अन्यथा जे भवभान ॥ अवस्तुभावाचें लक्षण ॥ तेंचि जाण श्रीरामा ॥ १० ॥ त्या अवस्तुभावा पासून ॥ बंध होय निर्माण ॥ त्याचें रूप हेंचि जें मीपण ॥ देहरूपें टसावे ॥ ११ ॥ तो बंध पावे

दृढत्वासी ॥ महत्कल्पांतीं नये नाशासी ॥ यासि कारण काय ह्मणसी ॥ तरि भोग भावना मुळिंची जे ॥ १२ ॥ ते भोगभावनें करूनि साचार ॥ बंध जाहला दृढतर ॥ आतां याचा निवृत्ति प्रकार ॥ ऐक सादर महामते ॥ १३ ॥ जें भोगभावनेची उपशांति ॥ तें बंध पावे मोक्षाप्रति ॥ जेणें बंध तेणें मोक्षप्राप्ती ॥ असे दृष्टांत ये अर्थी ॥ १४ ॥ सर्पिणी आपली संतति जैसी ॥ मुरडोनियां आपणाचि ग्रासी ॥ भोगभावना हे तैसी ॥ मुरडोन ग्रासी बंधातें ॥ १५ ॥ अथवा कांतिणी जें परती धरी ॥ तें उगळिला तंतु मूये उदरीं ॥ भोगभावना तेचि परि ॥ मुरडोन करि बंधनाश ॥ १६ ॥ निरूपण विलासें बोलिलें भिन्न ॥ परंतु भावना तेचि मन ॥ बंधमोक्षाचें कारण ॥ हेंचि निरूपण पुढिले श्लोकीं ॥ १७ ॥

## मनः संपद्यते तस्मान्महतः परमात्मनः ॥
## स्वस्थिरादस्थिराकारं तरंगा इव सागरात् ॥१३॥

महत् ह्मणजे थोर ॥ परमात्मस्वरूप साचार ॥ त्याचा होय साक्षात्कार ॥ जे मनाचि सुस्थिरता ॥ १८ ॥ एवं परमात्मस्वरूप संपादना ॥ ते मनेंचि केली रघुनंदना ॥ आणि ते आलिया चंचळपणा ॥ प्रपंचभानरूप होय ॥ १९ ॥ सागरिंचें उदक जैसें ॥ हालवितां तरंगाकार दिसे ॥ आणि न हालतां असे ॥

सागररूपें स्वतःसिद्ध ॥ २० ॥ तैसें मन चांचल्यातें पावे ॥ तें भासे प्रपंचभावें ॥ आणि तेंचि स्थिर होय स्वभावें ॥ तें स्वरूप-रूपें प्रसिद्ध ॥ २१ ॥ मनाचेनि चांचल्यें निर्माण ॥ अतएव मिथ्या जगद्भान ॥ या अर्थाचें प्रतिपादन ॥ पुढिले श्लोकीं होतसे ॥ २२ ॥

यस्य मे चिरमेवायुः संकल्पं याति नित्यशः
तेनेयमिंद्रजालश्रीर्जाग्रति प्रतितन्यते ॥ १४ ॥

अज्ञानलक्षण सुषुप्ति ॥ माजि मनाची विचरे स्वैरगति ॥ ह्मणोनि नित्य पावे संकल्पाप्रति ॥ तेचि जागृति बोलिजे येथ ॥ ॥ २३ ॥ तेणें संकल्पेंकरून ॥ मिथ्या आरोपित भासे जन ॥ नाना ऐसें नव्हेजाण ॥ हे इंद्रजाळिचि शोभा ॥ २४ ॥ मन हें इंद्रजाल बोलिजे ॥ तेणें विवेकदृष्टि बंधन कीजे ॥ तेणें दृष्टि बंधनें देखिजे ॥ जगद्रूप इंद्र जाळ ॥ २५ ॥ असे ज्या विवेकदृष्टिबंधन ॥ त्याचिप्रति सत्य भासे जन ॥ येणें अर्थी निदर्शन ॥ पुढिले श्लोकीं बोलिजेल ॥ २६ ॥

यथा बालस्य वेतालो मृत्युपर्यंतदुःखदः ॥
असदेव सदाकारं तथा मूढमतेर्जगत् ॥ १५ ॥

बाळका प्रति तम जैसें ॥ होय वागुलाचिया ऐसें ॥ कीं पक्षि-

यासि मनुष्यवेषें ॥ भासे तृणाचें बुझावणें ॥ २७ ॥ तैसा जो कोणी मूढमती ॥ केवळ आथिला सुषुप्ति ॥ असत्य जग तयाप्रति ॥ सत्य ऐसें आभासे ॥ २८ ॥ असत्य वागुल चळों नेणे ॥ परी बाळासि मरणपर्यंत दुःख दशगुणें ॥ तैसें असत्य जग सत्याभास गुणें ॥ दुःखदायक मूढासी ॥ २९ ॥ साचार देखताजन ॥ देही पुढें मी तूं पण ॥ मी तूंपणें वेष्टून ॥ होय महद्दुःखाचें ॥ ३० ॥ मागुतेनि कोणे प्रकारें ॥ मूढदृष्टि जग आकारें ॥ हें दृष्टांतेंसि वारे ॥ श्रवण करीं रामचंद्रा ॥ ३१ ॥

## अव्युत्पन्नस्य कनके कनके कटके यथा ॥
## कनकज्ञप्तिरेवासीन्नत्वनन्यापि हेमधीः ॥ १६ ॥

जैसें कनकापासूनि कंकण ॥ त्यासी कनक हें अभिधान ॥ तें कनकीं कटकपरिज्ञान ॥ वांचूनि नसे अव्युत्पन्ना ॥ ३२ ॥ जो चातुर्य विहीन ॥ तो बोलिजे अव्युत्पन्न ॥ त्या अव्युत्पन्नासि दर्शन ॥ नव्हे कनकीं कनकाचें ॥ ३३ ॥ तोचि व्युत्पन्न जो चतुर ॥ जरी देखे अलंकार ॥ तरी हें कनक हा निर्धार ॥ त्याचा कांहीं न दिसेची ॥ ३४ ॥ एवं हेम बुद्धि करूनि साचें ॥ नदिसे कनकत्व कनकाचें ॥ जें कारणीं दृष्टि तें कार्याचें ॥ भान केंवि उरेल ॥ ३५ ॥

यथाऽज्ञस्य पुरागारनगनागादि गोचरं ॥
एवं दृश्यदृगेवास्ति नत्वन्या परमार्थदृक् ॥१७॥

जैशीं नगर गृहें वृक्ष पर्वत ॥ पशुपक्षि सर्पादि जीवजात ॥ एवं बाह्यांतरदृश्य समस्त ॥ विलास स्वरूपींचा असोनी ॥ ३६ ॥ जो कोणी स्वरूपाज्ञानें अज्ञान ॥ तो दृश्यदृष्टीकरून ॥ देखे पदार्थ भिन्नाभिन्न ॥ परी नेणे कारण समस्तांचें ॥ ३७ ॥ त्याच्याठाईं दृश्यदृष्टी असे ॥ म्हणोनि भेदज्ञान तेथें वसे ॥ जैशीं भासती दृष्टिभ्रंशें ॥ एकाचीं दोन बिंबें ॥ ३८ ॥ आणि जो परमार्थदृष्टि आथिला ॥ जो स्वरूपज्ञानें उमजला ॥ तो स्वरूप देखों लागला ॥ अनेक दृश्यविलासु हा ॥ ३९ ॥ अमळ परमार्थदृष्टि पाहीं ॥ स्वरूपाविण न देखे कांहीं ॥ जैसें सवितयासि कांहीं ॥ दृश्य नव्हे अंधतमस ॥ ४० ॥

अज्ञस्य दुःखौघमयं ज्ञस्यानंदमयं जगत् ॥
अंधं भुवनमंधस्य प्रकाशस्तु सुचक्षुषः ॥ १८ ॥

म्हणोनि अज्ञानासि हो जगज्जाळ ॥ दुःखमयच भासे केवळ ॥ दृष्टि नसतां अमळ ॥ सुख अळुमाळ तेथें कैचें ॥ ४१ ॥ कुरूप पाहे दर्पणीं ॥ तरी सुंदररूप कैचें दिसे नयनीं ॥ तैसा अज्ञानदुःख मूर्ति जो कोणी ॥ आपुलीये भेदप्रतीति ॥ ४२ ॥ पाहों जाय

चराचर ॥ तंव देखे दुःखमय साचार ॥ आपुलेनि भ्रमें समग्र ॥ भ्रमतां काय न देखिजे ॥ ४३ ॥ आणि सुंदर पाहे दर्पणीं ॥ तरी सुंदररूपेंचि दिसे नयनीं ॥ तैसा ज्ञानमूर्त्ति जो कोणी ॥ आपुलीये अभेदप्रतिती ॥ ४४ ॥ पाहोंजाय चराचर ॥ तंव देखे आनंदमय साचार ॥ जो बुडविल्या नाना जगदाकार ॥ तेणेंचि आत्मानंद डोहीं ॥ ४५ ॥ जैसा गर्भांध जो कोणि असे ॥ त्यासि त्रिभुवन आंधळें दिसे ॥ आणि डोळसाप्रति असे ॥ विश्व प्रकाशरूप ॥ ४६ ॥ तैसा स्वरूपज्ञानें जो अज्ञान ॥ तो दुःखमयचि देखे जन ॥ आणि स्वरूपज्ञानें जो सज्ञान ॥ तो देखे जन आनंदरूप ॥ ४७ ॥ स्वहस्तक्रियेचें लाघव जैसें ॥ चित्ररूपें उमटे तैसें ॥ तेंचि परि विश्व हें भासे ॥ आपुले प्रतीतीसारिखें ॥४८॥ तस्मात् आपुलेनि अज्ञानें विश्व दिसे ॥ आपुलेनि ज्ञानें नदिसे ॥ याकारणें आत्मस्वरूपचि कारण असे ॥ जगदुद्भव त्याचें ॥१४९॥

यथा विशुद्ध आकाशे सहसैवाभ्रमंडलं ॥
भूत्वा विलीयते तद्वदात्मनीहाखिलं जगत् ॥१९॥

विशुद्धस्वरूपीं आकाशीं ॥ अभ्रमंडळें पैं जैशीं ॥ होय आणि ये नाशासि ॥ तेणेंन्च दृष्टांतें श्रीरामा ॥ ५० ॥ आत्मस्वरूपीं हे जन ॥ पावे उदय अस्तमान ॥ कां जे तेणेंचि जाणिवेंसि अधिष्ठान ॥ आत्मप्रकाश म्हणोनियां ॥ ५१ ॥ सूर्यप्रकाशाचें अज्ञान॥

उपजवी मृगजळभान ॥ तरि त्यासि अधिष्ठान ॥ सूर्यप्रकाशचि सत्य ॥ ५२ ॥ तैसें अज्ञानमूळ जगद्भान ॥ त्यासि ज्ञानाचि कीं अधिष्ठान ॥ ह्मणोनी जगदुद्भवासि जाण ॥ आत्माचि कारण या अर्थे ॥ ५३ ॥ आणि सूर्यप्रकाशाचें ज्ञान ॥ नाशी मृगजळाचें भान ॥ तरि त्यासि अधिष्ठान ॥ सूर्यप्रकाशचि सत्य ॥५४॥ तैसें जेणें अज्ञानें हरपे जन ॥ त्या अज्ञानासि ज्ञानचि अधिष्ठान ॥ ह्मणोनि जगाद्दिल्यासि जाण ॥ आत्माचि कारण या अर्थे ॥ ॥५५॥ तस्मात् जैसा आकाशीं ॥ अभ्रांचा उदयअस्त परियेसीं ॥ तैसें आत्मरूप स्वप्रकाशीं ॥ जगदुद्भवे आणि नासे ॥ ५६ ॥ आत्मयासि अभिन्न ॥ हें समस्त प्रपंचभान ॥ देखे तो जीवन्मुक्त जाण ॥ हेंचि निरूपण पुढती ॥ ५७ ॥

## आदित्याव्यतिरेकेण रश्मयो येन भाविताः ॥
## आदित्या एव ते तस्य निर्विकल्पः स उच्यते॥२०

आदित्याचिया प्रकाशा ॥ व्यतिरिक्त रश्मिभाव जैसा ॥ भाउं नये पैं सहसा ॥ भावी तोचि अज्ञान ॥ ५८ ॥ तैसा आदित्याचियापरि आपण ॥ जो होऊनि ठायअधिष्ठान ॥ तो आपणाहूनि भिन्न ॥ कैंवि देखे जन रश्मी ॥ ५९ ॥ तस्मात् स्वरूपसूर्येसी ॥ अव्यतिरेकभावें परियेसी ॥ जेणें भाविलें निश्चयेंसी ॥ हें दृश्यरश्मीलें अनेक ॥ ६० ॥ ऐसा जो पुरुष त्याप्रति ॥ रश्मि ते आदित्यरूपा वे

असती ॥ एवं आथिला पूर्णस्थिति ॥ तो निर्विकल्प बोलिजे॥६१॥ पूर्णपणें कोंदाटला ॥ तो कल्पनेसि नव्हे वेगळावला ॥ म्हणोनि निर्विकल्प बोलिला ॥ स्थिरावला आत्मत्वें ॥ ६२ ॥ जरि आलें कल्पांतिचें जळ ॥ आपणावेगळें देखे स्थळ ॥ तरि सुखें होय तें चंचळ ॥ प्रवाहकार्याकारणें ॥ ६३ ॥ तैसें आपणाहूनि भिन्न ॥ जरी देखो पैते जन ॥ तरि सुखें पावते चळण ॥ कल्पनाकार्याकारणें ॥ ६४ ॥ आपणाहूनि दुजें दिसे ॥ तरि कल्पना केउति असे ॥ कल्पना नसतां कैसें ॥ चंचलत्व पाविजेल ॥ ६५ ॥ जो पुरुष संकल्पाधिष्ठान ॥ तो निर्विकल्प बोलावया हेंचि कारण ॥ सकळेंसि तोचि आपण ॥ केंवि सविकल्प बोलावा ॥ ६६ ॥ कार्यकारणेंसि एकरसता ॥ हेंचि मागुतें बोलों आतां ॥ वसिष्ठ म्हणे ऐक आतां ॥ तूं रघुनाथा सादर ॥ ६७ ॥

तंतुमात्रो भवत्येव पटो यद्वद्विचारितः ॥
आत्मतन्मात्रमेवेदं तद्वद्विश्वं विचारितं ॥ २१ ॥

पट पाहतां विचारें ॥ तंतुचि होय साचोकारें ॥ पटत्वहरपे दुसरें ॥ तंतुदृष्टि जयेपरी ॥ ६८ ॥ तैसें विचारदृष्टीं तत्वतां ॥ विश्व चराचर अवलोकितां ॥ देखिजे आत्मतन्मात्रता ॥ एवं म्हणिजे निश्चयें ॥ ६९ ॥ तंतुचेनि वस्त्र आकारलें ॥ तैसें आत्मयाचें विश्व ओतलें ॥ हें विचारें पाहे तरि फावलें ॥ ये-

रा नकळे सर्वथा ॥ ७० ॥ पट हें रूप आणि अभिधान ॥ तंतूसि नघडे भिन्न ॥ तैसें नामरूपेंसि हे जन ॥ पैं अभिन्न आत्मयासी ॥ ७१ ॥ एवं तंतूदृष्टि पाहीं ॥ जैसें असतचि वस्त्र नाहीं ॥ तैसें असतचि नदिसे कांहीं ॥ स्वरूपदृष्टिं हें विश्व ॥ ७२ ॥

**विश्ववीचिविलासोयं चित्सुधाब्धावुदेति च ॥**
**विलीयंते च तत्रैव मध्ये कथमतन्मयः ॥ २२ ॥**

चिद्रूपामृतसागरीं ॥ विश्वलक्षण लहरी ॥ विलास हा पैं सूत्रापरि ॥ पावे उदयलयातें ॥ ७३ ॥ तेथें चेत पैं स्वमायें ॥ उदयो आणि लया पावे ॥ तरि मध्यें कैसें ह्मणावें ॥ वेगळावलें तेथुनि ॥ ७४ ॥ उत्पत्ति स्थिति आणि नाशन ॥ चळन अथवा अचळन ॥ चित्समुद्रातें नसोडून ॥ होय विश्वलहरीचें ॥ ७५ ॥ या लागीं चिद्रूपा वेगळा सहसा ॥ बोलोंचि नये विश्वठसा ॥ चिद्रूप नाम परी विश्वा ॥ ऐसा रूपभाव तयाचा ॥ ७६ ॥

**यथा नतोयतो भिन्नाः फेनोर्मिहिमबुब्दुदाः ॥**
**आत्मतोपि तथा विश्वमभिन्नं विद्धि राघव॥२३॥**

जैसे फेनतरंग तुषार ॥ उर्मिकल्होळ इत्यादि प्रकार ॥ हे बोलोंचि नये साचार ॥ उदकाहूनि भिन्नपैं ॥ ७७ ॥ तैसें आत्मयासि हे विश्वजन ॥ अनेकाकारें परि अभिन्न ॥ नसतां आत्मा अधिष्ठान ॥

विश्वाचें रूप न घडे ॥ ७८ ॥ आत्मा तोचि विश्वाकारें ॥ ऐसें जाण राघवा निर्धारें ॥ आणि येके दृष्टांतें प्रकारें ॥ हाचि ऐक अभिप्राय ॥ ७९॥

मृदि कुंभो जले वीचिः कनके कटकं यथा ॥
आत्मन्येतत्तथाऽभिन्नं विश्वमात्मविनिर्गतं ॥ २४॥

मृत्तिकेपासून घट उत्पन्न ॥ यालागिं मृत्तिकेशीं तो अभिन्न ॥ कीं वीची कां जळापासून ॥ ह्मणों नये अभिन्न जळांशीं ॥ १८०॥ कनकापासूनि कंकण ॥ यालागिं कनकाशींतें अभिन्न ॥ तसें आत्मयापासूनि विश्व ह्मणोन ॥ नव्हे भिन्न आत्मयाशीं ॥ १८१ ॥ आत्मयापासूनि विनिर्गत ॥ ह्मणोनि विश्व नव्हे आत्मया अखंडित आत्मा नेणतां विश्व भासत ॥ येचि अर्थी निरूपण ॥ ८२ ॥

आत्माज्ञानाज्जगद्भ्रांतिरात्मज्ञानान्निवर्त्तते ॥
रज्जुज्ञानादहिभ्रांतिस्तत्तज्ज्ञानान्निवर्तते ॥२५॥

आत्मयाचे जें अज्ञान ॥ तेणें जगभ्रांति विद्यमान ॥ आणि जें आत्मयाचें ज्ञान ॥ तेणें निवारे जगद्भ्रांति ॥ ८३ ॥ तैसें रज्जूचें अज्ञान जें ॥ तेणें सर्पभ्रांति उपजे ॥ तेंचि यथार्थ जाणिजे ॥ तेणें निवर्त्ते सर्पभ्रांति ॥ ८४ ॥

**तथा दृश्यात्मतत्वस्य विस्मृत्यैवं स्थितिं गतं ॥**
**नान्यस्मादागतं राम जगद्रज्जुभुजंगवत् ॥२६॥**

एवं रज्जुज्ञानीं सर्प नाहीं ॥ तैसें अदृश्य आत्मस्थितिच्या ठांई ॥ जग पावलें असतां पाहीं ॥ मूळचें आपुल्या जगपणें ॥ ८५ ॥ आणिक कोठूनि नाहिं आलें ॥ तें जग आत्मयापासूनि जाहलें ॥ ह्मणोनि जेथिंचा तेथें लय पावलें ॥ रज्जुभुजंगाचेपरी ॥ ८६ ॥ सर्परज्जुपासूनी जाहला ॥ तो त्याच्याच ठाई लय पावला ॥ एवं जगाजगद्भाव लोपला ॥ आत्मस्थिति प्राप्त असतां ॥ ८७ ॥ जैसी उदकासि नाठवे तहान ॥ कीं साखरेसि नाठवे कडूपण ॥ कीं अमृतासि नाठवे मरण ॥ तैसें आत्मयासि विस्मरण जगाचें ॥ ॥ ८८ ॥ आत्मत्वीं जगद्रूप वाव जालें ॥ तें मागुतें रूपा नाहीं आलें ॥ जैसें दोरीं देखोनि लया गेलें ॥ तें मागुतें नये भुजंगत्वा ॥ ॥ ८९ ॥ जैसें मृत्तिकेचें ढेपुळ ॥ उदकीं विरलें तात्काळ ॥ तें रूपा नयेचि केवळ ॥ उदकरूपेंचि उरलें ॥ ९० ॥ अगा श्रीरामा तैसें जाण ॥ आत्मरूपीं अढळें दृश्यमान ॥ तें मागुतें नयेचि दृश्यपण ॥ आत्मरूपेंचि उरलें ॥ ९१ ॥

**चिद्विलासः प्रपंचोयं सखे ते दुःखदः कथं ॥**
**किमिंद्रवारुणी याति सितया कटुकीं कुतः ॥२७॥**

ह्मणोनि हा प्रपंचु दिसे ॥ तोचि चिद्विलासुर असे ॥ तरी

था सखया कैसें ॥ विचारूनि पाहें पां ॥ ९२ ॥ तोचि चिद्विलास प्रपंचठसा ॥ तो दुःखदायक तूतें कैसा ॥ ये अर्थीं दृष्टांत ऐसा ॥ योजिला असे अवधारीं ॥ ९३ ॥ साखर पावे इंद्रावणपण ॥ तरी कटुता येईल कोठून ॥ तैसें स्वयेंचि चित्सुख आपण ॥ प्रपंचरूपें जरि जाहलें ॥ ९४ ॥ तरीं दुःखरूप तया होणें नघडे ॥ शर्करादृष्टांतें पाहें पुढें ॥ सुखी स्वस्वरूप क्रीडे ॥ आकारें निराकारेंशीं ॥ ९५ ॥ मी प्रपंच जाहलों हे स्फूर्त्ती ॥ जरि तयाच्याठाईं असती ॥ तरी सुखें बोलों येती ॥ दुःखस्थिति पैं येथें ॥ ९६ ॥ जैसें होतां रसरूप ॥ उदकत्व नसांडीच आप ॥ तैसें सुखमय चिद्रूप ॥ नविकारेंचि प्रपंचाकारें ॥ ९७ ॥ जैसा उपाधिसारिखा जाहला ॥ परि आपुलिया अनळत्वा नाहीं मुकला ॥ तैसा आत्मा प्रपंचरूपें विलासला ॥ परि नाहिं अंतरला निजसुखा ॥ ९८ ॥ असो चिद्विलासु प्रपंच ऐसा ॥ तूतें दुःखदायक घडे कैसा ॥ साखरें इंद्रावर्णि जैसा ॥ कटु स्वाद नपाविजे ॥ ९९ ॥ एवं वास्तव प्रपंचाचें ॥ सत्यासत्य विलक्षण साचें ॥ ह्मणोनि अक्षय सुखाचें ॥ हाचि अधिष्ठान पैं ॥ २०० ॥ हा प्रपंच निश्चित ॥ प्रपंचदृष्टीं नघडे असत ॥ आणि ब्रह्मदृष्टीं नघडे सत ॥ येचि विषईं दृष्टांत देती ॥ १ ॥

**स्वप्नो जाग्रति सद्रूपः स्वप्ने जाग्रत्यसद्वपुः ॥**
**मृतिर्जन्मनि सद्रूपा मृतेर्जन्माप्यसन्मयं ॥ २८ ॥**

एवं स्वप्निचें जें जागेपण ॥ तें स्वप्नीं असत्य नव्हे जाण ॥ आणि जागृतीं म्हणेल कोण ॥ सत्य ऐसें तयातें ॥२॥ मरणीं मरणाचें जें जनन ॥ तयें जननीं सत्य नव्हें मरण ॥ आणि तेंचि मरणाचें जनन ॥ जन्म केंवि सत्य होय ॥ ३ ॥

## एवं नसन्नासदिति भ्रांति मात्र विजृंभितं ॥
## अनुभूयत एवाशु किंचित्सर्वानुभूतितः ॥ २९ ॥

तैसा प्रपंच प्रपंचपणें पैंगा ॥ आणि ब्रह्मत्व आलिया अंगा ॥ नातळे सत्यासत्यविभागा ॥ उभयदृष्टीं पहातां ॥ ४ ॥ एवं सत ना असत येके अंशें केवळ ॥ केवळ प्रपंचाचें रूप अमळ ॥ यासि प्रपंच ह्मणणें हेंचि जाळ ॥ भ्रांतिरूप विस्तारलें ॥ ५ ॥ नातळे सत्यासत्यपणीं ॥ परिशून्याची न जाये घाणि ॥ सर्वानुभवें करूनि ॥ किंचित्सूक्ष्म ज्ञप्तिरूप ॥ ६ ॥ निद्रेमाजि काहींचि नसे ॥ परि सुखभोक्तृत्वीं कांहीं असे ॥ यालागिं सर्वानुभूतित्वें वसे ॥ सर्वरूपीं सूक्ष्म वस्तू ॥ ७ ॥ ह्मणोनि प्रपंच चिद्विलासू ॥ केला याचिलागिं निर्देशू ॥ नसे दुःखाचा लवलेशू ॥ सुखरूपचि सर्वांगें ॥ ८ ॥ सुखमय चिद्विलास प्रपंचभान ॥ ऐसें जयासि जाहलें ज्ञान ॥ तो पुरुष प्रपंचें करून ॥ केंवि पावे दुःखातें ॥९॥ ह्मणोनि श्रीरामा वेगेंसि ॥ ऐसा प्रपंच आणूनि अनुभवासि ॥ मग सुखें विचरें तेणेंशीं ॥ नाहिं तुजशीं भिन्न तो ॥ १० ॥

हेंचि पुढिले प्रकर्णि ॥ निरूपिजेल विशद करूनि ॥ श्रवणा मनना गांठीं घालुनी ॥ सादर आकर्णी रामचंद्रा ॥ ११ ॥ ऐसें ऋषिराजचूडामणी ॥ बोले वसिष्ठ महामुनी ॥ धन्य धन्य त्याची वाणी ॥ ब्रह्मनिरूपणीं रंगली ॥ १२ ॥ आणि सकळ वक्तृत्वाची कृतार्थता ॥ तो श्रीराम जेथें श्रोता ॥ एवं या प्रसंगाची अभिनवता ॥ वाटे समर्था अपार ॥ १३ ॥ कामधेनु लागिं जैसा ॥ कल्पतरूचा आदर कीजे तैसा ॥ श्रोता श्रीरामा ऐसा ॥ वसिष्ठमुनीच्या निरूपणा ॥ १४ ॥ अनर्घ्यरत्नजडित स्थाली जाण ॥ माजी गुरुचरण तीर्थाचें सांठवण ॥ तैसें वसिष्ठमुखीं निरूपण ॥ करी श्रवण श्रीराम ॥ १५ ॥ येथूनि प्रकरण समाप्ती ॥ पुढें कृपा कीजे संतीं ॥ कृतांजलिपुटें करी विज्ञप्ती ॥ नारायणांकित माधवदास ॥ २१६ ॥ इति श्रीयोगवासिष्ठसारे माधवदासविरचितं दृश्यटीकायां जगन्मिथ्यात्वप्रकरणं द्वितियं समाप्तम् ॥ श्लो० ॥ ॥ २९ ॥ ओव्या ॥ २१६ ॥ एवंसंख्या ॥ २४५ ॥ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

## तत्वावबोध एवैकः सर्वाशातृणपावकः ॥
## प्रोक्तः समाधिशब्देन तुच्छतां समवस्थितः ॥१॥

आतां समाधि ते कोण कैसी ॥ कोणलक्षणें लक्षिजे तियेसी ॥ वसिष्ठ ह्मणे रामासी ॥ आतां अवधारीं ॥ १ ॥ तत्व आलें बो-

वासी ॥ हें स्फुरण पडे ग्रासी ॥ तत्वावबोध ऐसी ॥ तेथेंचि भाल्या पैं ॥ २ ॥ ऐसा तत्वावबोध सोज्वळ ॥ एतल्लक्षणें जो अनळ ॥ आशातृष्णेचें निबिड जाळ ॥ तो तत्काळ दहनकर्त्ता ॥ ॥ ३ ॥ जेथें बोध हें स्फुरण न साहे ॥ तेथें इतर आशंका केउति राहे ॥ यालागीं तत्वावबोध पाहें ॥ सर्वाशा तृणपावक ॥ ४ ॥ एवं अधोर्द्ध आशापाश गेले ॥ तन्मूलें संदेह निरसिले ॥ तयाप्रति उरोनि उरलें ॥ पिंडेसकट ब्रह्मांड ॥ ५ ॥ तो देहप्रवाहें वर्त्तत दिसे ॥ परंतु मुख्य बीज तसें ॥ विवर्त्ताविवर्त्ताचेनि अभावें कैसें ॥ असमाधान बोलावें ॥ ६ ॥ उदकाचेनि चांचल्यें जैसें ॥ सूर्यबिंब हलविलें दिसे ॥ परंतु मुख्यबिंब जैसें तैसें ॥ तें नेणें हलवणेपणातें ॥ ७ ॥ तसा देह चांचल्ययोगें ॥ आत्मबिंब हालों लागे ॥ परंतु मुख्यबिंबा नलगे ॥ देह चळणेचा विटाळ॥ ॥ ८ ॥ ऐसी जे स्थिति जाण ॥ समाधी हें तियेचें अभिधान ॥ येर काष्ठवत जें उगेपण ॥ ते समाधि नव्हे सर्वथा ॥ ९ ॥ जें विक्षेपातें पावे ॥ ते समाधि हें कैसें बोलावें ॥ जिच्यापोटिं बीज भावें ॥ नांदतसे संसारु ॥ १० ॥ अपेक्षा अर्धोर्द्धसुखाची ॥ ते व्यक्ति भवबीजाची ॥ तेचि आस्तिकता संसाराची ॥ निवृत्ति कैसी बोलावी ॥ ११ ॥ ह्मणोनि काष्ठसमाधि हें फुडी ॥ ते केवळ जीवपणाची बांदवडि ॥ येथें धरिली ज्याहिं गोडि ॥ ते बापुडिं कोंडलिं ॥१२॥ समाधि तेचि अमळ ॥ जें स्वभावें सहज सरळ॥

गाळू विवर्त्ताचें मूळ ॥ द्वंद्व किटाळ पडलें ग्रासी ॥ १३ ॥ कांहीं न स्फुरोनि अवघें स्फुरण ॥ सर्व न होनि सर्वांसि आपण ॥ ऐसि जे स्थिति परम निर्वाण ॥ समाधि हें अभिधान तियेतें ॥ १४ ॥ एतत्समाधिस्थ जो कोणी ॥ तोचि सुखि या गा कार्मुकपाणी ॥ अन्वय लागूनि निरोपणीं ॥ पुढील श्लोक प्रवर्तला ॥ १५ ॥

## चिदाकारमिदं सर्वं जगदित्येव भावयन् ॥
## यस्तिष्ठत्युपशांतिस्थः सब्रह्मकवची सुखी ॥ २ ॥

हें जितुकें जग चराचर ॥ तितुकें सर्व चिदाकार ॥ ऐसी भावना दृढतर ॥ आधीं जाहाली पाहिजे ॥ १६ ॥ या भावनेनें जो चोखाळला ॥ तोचि शांतिवधूनें वरिला ॥ इच्छेचा उपशम जाहला ॥ त्याची चिंतावशांति ॥ १७ ॥ एवं इच्छोपशमित होत्साता ॥ जो राहे पूर्णपणें तत्वतां ॥ तोचि सुखी जाणिजे निरुता ॥ ब्रह्मकवचधारी पैं ॥ १८ ॥ मी चिद्रूप येणें सकळांसिं ॥ भावितां नव्हे येकदेशि ॥ तेथें इच्छा उपजेल कैसी ॥ सर्वात्म भाव उमजलिया ॥ १९ ॥ अपार भावना स्फुरण ॥ त्या ब्रह्म प्रतीतीकरून ॥ आच्छादुनि ठेला ह्मणोन ॥ ब्रह्मकवच बोलिला ॥ २० ॥ मागुतेनि तो कैसा अवधारीं ॥ बोलिजेल दुसरे उत्तरीं ॥ ज्याचा निर्वाह निरंतरिं ॥ सहज समाधिरूप पैं ॥ २१ ॥

**सर्वातीतपदालंबी पूर्णेंदुशिखराश्रयः ॥**
**यस्तिष्ठति सदा योगी सएव परमेश्वरः ॥ ३ ॥**

सर्व निरसुनि जे उरलें ॥ ते ते सर्वातीत बोलिलें ॥ देहीं ज्यासि दृश्य जाहलें ॥ तो सर्वातीत पदालंबी ॥ २२ ॥ नाना सर्व आणि अतीत ॥ या द्वंद्वपदातें प्रकाशित ॥ ह्मणोनि बोलिले निश्चित ॥ सर्वातीतपदालंबी ॥ २३ ॥ सर्वातीतपदप्रकाशी ॥ ह्मणोनि आलें मन पूर्णतेसि ॥ नाना मनचंद्रपूर्णचिदाकाशी ॥ सोळा कळांशीं विराजमान ॥ २४ ॥ सुखामृताचा वोतला ॥ समाधानशिथिलतें आथिला ॥ ऐसा जो मनचंद्र तत्प्रभें जाहला ॥ जगदाकार शीतळ ॥ २५ ॥ एवं जो सर्वातीत पदाधिष्ठान ॥ त्याचें पूर्णचंद्रासारिखें मन ॥ तेणें पूर्णमनें जगद्भान ॥ सहज आलें पूर्णत्वा ॥ २६ ॥ तो ऐसा जो योगि वियोगी ॥ जो जगत्वनुरवोनि राहे अंगीं ॥ तोचि परमेश्वर निश्चयालागीं ॥ संशय कळंकु न लावावे ॥ २७ ॥ मागुतें त्याचें महिमान ॥ बोलिजेल परम तें निर्वाण ॥ तें पुढिले श्लोकींचें निरूपण ॥ करिं श्रवण रघुराया ॥ २८ ॥

**नोद्वेगी नच तुष्टात्मा संसारे नावसीदति ॥**
**ब्रह्मोपनिषदां तत्वं भावयेद्योऽन्तरात्मना ॥ ४ ॥**

ब्रह्मोपनिषदश्रवणें ॥ जो अंतरात्मा तेणें ॥ निर्वाण प्राप्तिका-

रणें ॥ अंतरीं तत्वतां, भावावें ॥ २९ ॥ तत्वास्थिकें उपरि ॥ शांत नव्हे तो संसारिं ॥ शोभायमानसुपरि ॥ नोद्वेगी ना संतुष्ट ॥ ॥ ३० ॥ जसें काहिं बोलिलें ॥ तें नसेल प्रबोधलें ॥ तरि कळे ऐसें भलें ॥ विशद प्रकारें बोलिजेल ॥३१॥ ब्रह्मतें प्रतिपादिजे ॥ ते ब्रह्मोपनिषद्बोलिजे ॥ तें श्रवण करिहोजें ॥ वाढतीया सद्युक्ति ॥ ३२ ॥ तें सद्युक्तिकरून ॥ होय तत्वता भाव उत्पन्न ॥ मग तो स्वयें अंतरात्मा ॥ तेणें चिद्रूपपण होउनियां ॥ ३३ ॥ ऐसा ब्रह्मरूप होत्साता ॥ उपरतोनि पाहे मागुता ॥ तंव देखे प्रपंचा समस्ता ॥ आटणि आत्मस्वरूपीं ॥ ३४ ॥ जसें दिनकराचिये किरणीं ॥ होय मृगजळाचि आटणी ॥ तसी संसारमायादि करूनि ॥ आत्मस्वरूपीं आटला ॥ ३५ ॥ भासत होतें मृगजळ भान ॥ तेंचि जालें रविकिरण जाण ॥ तसा जो संसारिं प्रयत्न वान ॥ तोचि जाला आत्मरूप ॥ ३६ ॥ एवं संसार आत्मरूप असे ॥ अतएव संसारिं तो न क्लेशे ॥ संसारे नावसीदति ऐसें ॥ त्याचिलागिं बोलिजे ॥ ३७ ॥ आतां संसारें न पावे दुःख ॥ तरि आत्मरूपें पावेल सुख ॥ हेंहि बोलणें गौण देख ॥ अप्रमाणिक गमनसे ॥ ३८ ॥ आपुलिया माथां आपण ॥ केवि केलें जाय आरोहण ॥ आत्मसुखाचें संस्थान ॥ नघडे येणें विचारें ॥ ३९ ॥ कार्यामागें कारण ॥ ऐसें बोलेल कवण ॥ तैसें आत्म-

सुखाचें संस्थापन ॥ न घडे प्रपंचविनाशें ॥ ४० ॥ अस्फूर्ति भेद नै पावे ॥ तो सुखालागीं कवि वेगळावे ॥ म्हणोनि आत्मसुख ऐसें बोलावें ॥ नलगे येणेहि विचारें ॥ ४१ ॥ तस्मात् दुःख न पावे संसारभानें ॥ सुख न पावे आत्मज्ञानें ॥ द्वंद्वातीत जयाचें असणें ॥ जाणोन नेणिजे जया ठायीं ॥ ४२ ॥ द्वंद्वातीत यालागिं साचा ॥ उद्वेग न पावे संसाराचा ॥ अथवा संतुष्टभाव आत्मत्वाचा ॥ तयातेंहि न स्पर्शे ॥ ४३ ॥ ऐसा जो पुरुष अमळ ॥ सबाह्य ब्रम्हचि केवळ ॥ तो देहप्रवाहें चंचळ ॥ परि अचळ वस्तुता ॥ ४४ ॥

**भ्रमंतो मुक्तिभाजोपि भुक्तिभाजो न संशयः ॥**
**यथा पर्वतमाश्रित्य नाश्रयंति मृगा द्विजाः ॥५॥**

प्राकृताचिये परि ॥ मुक्ति लागिं भ्रमणकरि ॥ पारि तो निःसंशयो जरि ॥ मुक्तिच्या शिखरीं विराजे ॥ ४५ ॥ परिस केंवि पाषाण ह्मणणें ॥ कौस्तुभ कैसा मणिसमान करणें ॥ पाक्षियाचे तुळणे ॥ केंवि आणणें विनतासुता ॥ ४६ ॥ शेष ह्मणावा सर्प कैसा ॥ नंदिकेश्वर ह्मणावा वृषभ कैसा ॥ ज्ञानी ह्मणावा कैसा ॥ इतरमनुष्या समान ॥ ४७ ॥ तो बद्ध सारिखा पाहि ॥ वर्त्ते शरीरप्रवाहीं ॥ परंतु बोलोंनये कांही ॥ मुक्तत्वासि साचु ॥ ४८ ॥ राजा कोणेयेके वेळां ॥

चरणीं चाले निजलीला ॥ तरि तो दरिद्री जाहला ॥ हें सहसा बोलों नये ॥ ४९ ॥ तैसा लीळेकरूनि निजसत्ता ॥ ज्ञानी देह-प्रवाहिं वर्त्ततां ॥ पावों नशके बद्धता ॥ प्राकृताचिये परि ॥५०॥ कोणी येक नीच युवती ॥ रायें पर्णिली ती राणी ह्मणती ॥ ज्ञानियाची क्रिया निश्चिती ॥ न घडे तैसी क्रियारूप ॥ ५१ ॥ अज्ञानजन्य दोषभावें ॥ क्रियेसि क्रियारूपत्व पावे ॥ परि त्या दोषाचिये नावें ॥ त्याचे ठाईं विंदुलें ॥ ५२ ॥ जैसा पर्वत वण-वियाचा ॥ मृगपक्षि त्याग करिती त्याचा ॥ तैसा जो अंतरीं उज्ज्वळ साचा ॥ आश्रय त्याचा न करिती दोषु ॥ ५३ ॥

## तस्माद्ब्रह्मविदं दोषा नाश्रयंति कदाचन ॥
## असंत इव संतोपि कोपयंति परं नरः ॥ ६ ॥

तस्माद्ब्रह्मविद् जो निश्चिति ॥ निःसंशय ज्याची स्थिति ॥ त्यातें कदा नाश्रयिती ॥ अज्ञानजन्य दोष ॥ ५४ ॥ दोषांचेनि अभावें ॥ क्रियेसि क्रियारूपत्व पावे ॥ ह्मणोनि ते जे वर्त्ते देहस्वभावें ॥ ते क्रिया नव्हे सर्वथा ॥ ५५ ॥ संत होत्साता जरि ॥ त्यातें दाऊनि आपपर उभारि ॥ इतर जीव असंताचे परि ॥ परम जरि कोपती ॥ ५६ ॥ तरि आपुलेनि अलिप्तपणें ॥ ते क्रियेतें कदा नेणें ॥ येचिअर्थीं परिसणें ॥ दृष्टांतेसि पुढाल ॥ ५७ ॥

५

**किं सर्पिषा हि रसनालिप्यते करवद्धद ॥**
**विषयज्ञो विषयत्वं तथानस्पृशति क्वचित् ॥ ७ ॥**

जैसी घृतादिकीं करूनि निर्धारि ॥ हे रसना न लिंपे करांचिये पारि ॥ कीं जें असे तियेच्या अंतरीं ॥ ज्ञातृत्व ह्मणोनि ॥ ५८ ॥ करु सर्वथानेणता ॥ ह्मणोनि तयासिच अलिप्तता ॥ तैसीं विषईं सज्ञानासि अलिप्तता ॥ आणि अज्ञानी होय लिप्त ॥ ५९ ॥ विषय दृश्यरूप जाणणें ॥ ह्मणोनि अलिप्त दृष्टपणें ॥ याहूनि अन्य तो विषयगुणें ॥ लिप्त होय सर्वात्मना ॥ ६० ॥ अज्ञान सरल्िया वरि ॥ तो अज्ञानकार्यांचि कां करि ॥ ऐसें ह्मणसि श्रीरामा जरि ॥ तरि श्रवण करिं प्रस्तुत ॥ ६१ ॥

**ज्ञात्वाप्यसर्पं सर्पोत्थं यथा कंपं न मुंचति ॥**
**निरस्ताखिलमोहोपि मोहकार्यं तथाऽऽत्मवित् ॥ ८ ॥**

जैसा सर्पभाव रज्जूचा ॥ कळे तरि सर्पत्वाचा ॥ कंपु न जाय साचा ॥ यथापूर्व असेच कीं ॥ ६२ ॥ तैसा आत्मज्ञाना नंतर ॥ मोह नासे समग्र ॥ परंतु मोहकार्य साचार ॥ यथापूर्व असेच कीं ॥ ६३ ॥ जैसा दंड टाकितां हातिंचा ॥ परंतु भ्रम न जाय कुलालचक्राचा ॥ तैसा नास जालिया मोहाचा ॥ मोहकार्य न मोडे ॥ ६४ ॥ परंतु जैसें उदक विहिरीचें ॥ तैसें मोह नसतां मोहकार्य साचें ॥ आणि उदक जैसें कुंभिचें ॥ तैसें मोह नसतां मोहकार्य ॥ ६५ ॥ मागें न दिसे मूळ ॥ पुढें न

दिसे ढाळ ॥ मध्यें कार्येंचि भासे आभाळ ॥ अवकाळींचे आ-
काशीं ॥ ६६ ॥ तस्मात् मोह निरसल्यावरि ॥ मोहकार्य उरे
त्यापरि ॥ तें देहपात पर्यंत वरि ॥ आपुली अवधि पुरवी
असे ॥ ६७ ॥ परि कर्मफळ भोगानुसंधान ॥ ज्ञानियासि न
करि बंधन ॥ यदर्थींनिदर्शन ॥ येक असे एकपां ॥ ६८ ॥

स्फटिकः प्रतिबिंबेन यथा नायाति रंजनं ॥
तज्ज्ञः कर्मफलेनाते तथा नायाति रंजनं ॥९ ॥

जैसा बिंबले पदार्थें करून ॥ स्फटिक पावे रंजन ॥ हाचि
दृष्टांतु जाण ॥ बोध ऐसा सांगिजेला ॥ ६९ ॥ स्फटिक ज्या
वरि वैसे ॥ तो पदार्थ सांत दिसे ॥ परंतु या अर्थे पाहतां नसे॥
स्फटिकामाजि पदार्थ ॥ ७० ॥ तैसा सम्यक्आत्मज्ञ जो कोणी
त्याचा ठाईं जी मोहकार्य करणी ॥ तिचा फळभोग भासे नयनि
परंतु नसे यथार्थें ॥ ७१ ॥ जैसा उपाधिसंगें स्फटिकु ॥ नव्हे
सर्वथा सोपाधिकु ॥ तैसा ज्ञानि निष्कळंकु ॥ क्रियायोगें अक्रिय
॥ ७२ ॥ यासि येकचि दिसतसे कारण ॥ येथ कर्तृत्वाचें नसे
स्फुरण ॥ दृष्टांतेंसह वर्त्तमान ॥ येचि अर्थीं पुढिल श्लोक ॥७३॥

अंतर्मुखतया तिष्ठन् बहिर्वृत्तिपरोपि सन् ॥
परिशांततया नित्यं निद्रालुरिव लक्ष्यते ॥१०॥

उमजलेनि नुमजे चोख ॥ जे स्थिति ते अंतर्मुख ॥ ते स्थि-
तेसी राहतां देख ॥ बहिर्वृत्तिसि जरि पावे ॥ ७४ ॥ तरी

त्याची अंतर्मुखता ॥ न पावेची भ्रंशु तत्त्वतां ॥ ते बहिर्वृत्ति नव्हे शांतता ॥ तद्रूपत्वें आकारिली ॥ ७५ ॥ उपशमा आलि निर्देश गति ॥ तेचि बोलिजे परिशांति ॥ असो तेणेंचि रूपें बहिर्वृत्ति ॥ अंतर्मुखाचि विलासे ॥ ७६ ॥ असतां नित्य परि शांतपणें ॥ पावलि बहिर्वृत्ति तन्हि नेणे ॥ यालागीं बहिर्वृत्तीं हें बोलणें ॥ न पावे सहसा तिच्या ठाईं ॥ ७७ ॥ जैसा कोणी येक निजालु जरि ॥ चिमटिल्या चरण आवरि ॥ कांहियेक मुखें बोले तरि ॥ तो विलासु नुमजाचा ॥ ७८ ॥ निद्रा तरि मोडलि नाहिं ॥ क्रिया तरि घडलि काहिं ॥ तैसेंचि येथ पाहिं ॥ अभिनव असे श्रीरामा ॥ ७९ ॥ नुमजलेनि उमजे जाण ॥ पावलें बहिर्वृत्तिचें चळण ॥ परि आलों गेलों हें स्फुरण ॥ नसे अंतर्मुखाप्रति कदा ॥ ८० ॥ क्रिया तरि घडे स्फुरणा ऐसी ॥ परि स्फुरणासि नातळे निश्चयेंसि ॥ ह्मणोनि निजाळाच्या परि परियेसीं ॥ दृष्टांतु येथ दिधला ॥ ८१ ॥ तस्मात् निजाळाचिये लक्षणि ॥ लक्षावा अंतर्मुख ज्ञानी ॥ मागुतेनि तो कैसा श्रवणीं ॥ अगाध कर्णीं रघुराया ॥ ८२ ॥

**अद्वैतं स्थैर्यमायाति द्वैते च प्रशमं गते ॥**
**योगिनः कर्म कुर्वंति पश्यंति स्वप्नवज्जगत् ॥११॥**

द्वैत पावलें मथमनातें ॥ अद्वैतहि आलें स्थैर्यातें ॥ जैसा ठे- ऊनि उदकातें ॥ कर्दम कांहीं न शोभे ॥ ८३ ॥ अद्वैतभाव

ठेउनि तैसा ॥ द्वैत ल्यातें न पावे सहसा ॥ अद्वैतेसि द्वैत वसा ॥ एकसमयो हारपे ॥ ८४ ॥ एवं द्वैताची धांव सरलि ॥ अद्वैत स्फूर्ति पांगुळलि ॥ द्वैताद्वैतविलक्षण उरलि ॥ निर्वाणस्थिति जे कांहीं ॥ ८५ ॥ ऐसिये स्थितीचे जे योगी ॥ ते कर्मकर्ते ऐसे दिसति जगीं ॥ परंतु नलगे त्यांच्या अंगीं ॥ कर्तृत्वाचा लवलेशु ॥ ८६ ॥ जगीं तयांचें कर्तेपण ॥ ते जग देखति स्वप्न ॥ जगाचेनि अभावें करून ॥ कर्तृत्व सहजचि वावो ॥ ८७ ॥ एवं स्वप्नवत् हे जनस्थिति ॥ देखोन योगी कर्में करिति ॥ द्वैताद्वैत जयां प्रति ॥ नसेचि उरलें कांहिं ॥ ८८ ॥

अद्यैव मरणं वास्तु कल्पांतनिचयेऽथवा ॥
तज्ज्ञः कलंकं नाप्नोति हेम पंकगतं यथा ॥ १२ ॥

आजि हो देहासि मरण ॥ अथवा कल्पांतिं हो पतन ॥ परि देहनाशें करून ॥ ज्ञानी न पावे कलंकु ॥ ८९ ॥ नेणे देह ऐसि संभावना ॥ तो जन्माचा केवि होईल देखणा ॥ जन्म नसतां मरणा ॥ भास कैसा उरेल ॥ ९० ॥ ह्मणोनि मरणाची चिंता ॥ नसे तया भाग्यवंता ॥ अवबोधपणें तत्वतां ॥ जन्ममरण निरसलें ॥ ९१ ॥ देहापूर्वि त्याची आस्तिकता ॥ आणि देहाउपरि तोचि असतां ॥ येणेंहि विचारें पाहतां ॥ मरणाची चिंता नसे त्यातें ॥ ९२ ॥ जैसें चिखलामाजि कांचन ॥ असे परि कसवटि नव्हे न्यून ॥ टाकुं नेणें आपलें आपण ॥ तरि चिखलींचें कैवि

ह्मणावें ॥ ९३ ॥ तैसा स्वरूपज्ञानी नो साचा ॥ देही असे परि मूळ देहाचा ॥ नलगे ह्मणूनि त्रिवाचा ॥ तो देहिचा ह्मणों नये ॥ ९४ ॥ देहिचा नव्हे जयाचा सिद्धांतु ॥ तरि देहमरणें केंवि पावे घातु ॥ ह्मणोनि आजिच हो देहपातु ॥ अथवा असो कल्पकोटी ॥ ९५ ॥

## तनुं त्यज्यतु वा काश्यां श्वपचस्य गृहेऽथवा॥ज्ञानसंप्राप्तिसमये मुक्तोऽसौ नात्र संशयः ॥१३ ॥

असो दग्धपटासारिखें देह काहिं ॥ ते टाको वाराणसिं पाहिं॥ अथवा चांडाळाच्या गृहिं ॥ टाको प्रारब्धयोगें ॥ ९६ ॥ देहपातें मुक्ति अमुक्ति ॥ हे त्याच्या ठाईं नसे भ्रांति ॥ ह्मणोनि भलते ठाईं पडो मति ॥ कासया खंती वाटेल ॥ ९७ ॥ सम्यक् प्रकारें ज्ञानप्राप्ति ॥ तेणेंचि समयें जाहली मुक्ति ॥ आतां ऐलिकडे देहपातिं ॥ नूतन काय होईल ॥ ९८ ॥ जैसें तक्रावेगळें नवनीत ॥ तक्रनाशें न विकारे निश्चित ॥ तैसा देहापासूनि जो विदेहमुक्त ॥ तो देहपातें न विकारे ॥ ९९ ॥ जेव्हां निरसलें अज्ञान ॥ तेव्हांचि त्याचें देहावसान ॥ येथें संदेह नाहीं जाण ॥ देहपाता आधिं मुक्त जो ॥ १०० ॥ देहपाहीं न दिसे फळ ॥ तरि कां विचारावें स्थळास्थळ ॥ जैसा प्रारब्धप्रवाह केवळ ॥ येईल तैसें हो सुखें ॥ १ ॥ ऐसा जो विदेहमुक्त निश्चि-

ती ॥ त्यासि कोठेंचि न पडे गुंती ॥ आपुलेंनि पूर्णपणें अंती ॥ नैराश्यभावें वर्ततां ॥ २ ॥

**गोष्पदं पृथिवी मेरुः स्थाणुराशासमुद्भवम् ॥**
**तृणं त्रिभुवनं राम नैराश्यालंकृताकृतेः ॥ १४ ॥**

ज्यापासाव गळित आशा ॥ तो पुरुष विराजे कैसा ॥ ज्याचा स्वरूपाकृति ठसा ॥ असे अलंकृत नैराश्यें ॥ ३ ॥ तो नैराश्यालंकृता कर्ता ॥ मानी गोखुरासमान जगता ॥ लघुगिरिसमान मेरु निश्चिती ॥ मानी त्रिभुवन तृणतुल्य ॥ ४ ॥ जसें पर्वतावरुनि पृथ्वीकडे ॥ पाहतां मनुष्य दिसे पाक्षिया येवढें ॥ तसें त्रिभुवन भासे थोकडें ॥ उंच नैराश्य दृष्टा ॥ ५ ॥ स्फुरण मात्र मावळलें ॥ याथातथ्य सहजचि उरलें ॥ नैराश्यदृष्टि जें बोलिलें ॥ तें येणेंचि रूपें जाणावें ॥ ६ ॥ एवं नैराश्यदृष्टि सम्यक् ॥ ब्रह्मत्व भासे क्षुल्लक ॥ तेथ दृश्य दिसे अल्पक ॥ ये अर्थी अपूर्व कोण ॥ ७ ॥ दृश्याचेनि अभावें असें ॥ आणि सकळिं सकळपणें वसे ॥ ह्मणोन त्याच्या ठाई नसे ॥ अधोर्ध्वभागिंचा आशा ॥ ८ ॥ आतां दृश्याभाव किंलक्षण ॥ कैसें सकळिं सकळपण ॥ हें दृष्टांतेसि निरूपण ॥ पुढिलें श्लोकीं कीजेल ॥ ९ ॥

**अंतःशून्यो बहिःशून्यो शून्यकुंभ इवांबरे ॥ अंतःपूर्णो बहिः पूर्णो पूर्णकुंभ इवांभसि ॥ १५ ॥**

शून्यकुंभ असे अंतरिं ॥ तो शून्यचि अंतबाहेरि ॥ अंतर्बाह्य तयेचि परि ॥ अभावि अभावरूप जो ॥ १० ॥ अंतरि देखणेपण नाहिं ॥ तरी बाह्यद्रव्य कैचें पाहिं ॥ एवं अंतर्बाह्य नसे काहिं ॥ शून्यकुंभ दृष्टांतें ॥ ११ ॥ आतां पूर्णकुंभ जळामाझारि ॥ बुजाल्यानू पूर्णचि आंतु बाहेरि ॥ अंतर्बाह्य तयेचि परि ॥ पूर्णि पूर्णरूप जो ॥ १२ ॥ अंतरिंचा उल्लेख जें आपण ॥ तें बाहेरिल द्रव्य होइल कवण ॥ ह्मणोनि अंतर्बाह्य आपणचि आपण ॥ पूर्णकुंभ दृष्टांतें ॥ १३ ॥ जरि अभावरूप सबाह्य आपण ॥ तरि आशा कैंवि घडे ॥ १४ ॥ एवं द्रव्याचेनि भावगुणें ॥ अथवा सकळिं सकळपणें ॥ न घडे आशा हें बोलणें ॥ या ब्रह्मनिष्ठाच्या ठाईं ॥ १५ ॥ याचि प्रमेया दृढी करण ॥ कीजेल पुढिल श्लोकीं निरूपण ॥ त्या निरूपणालागीं गहन ॥ दत्तावधान होइं रामा ॥ १६ ॥

**ईप्सितानीप्सिते न स्तो यस्यांतर्वस्तुदृष्टिषु ॥**
**सुषुप्तवद्यश्चरति स मुक्त इव तिष्ठति ॥ १६ ॥**

ज्याचे वस्तुदृष्टिच्याठाईं न पडे अंतर ॥ त्यासि ईप्सितानीप्सित नसे इतर ॥ आपणचि पूर्णत्वेंसमग्र ॥ तेथें इच्छा कोणाची ॥ १७ ॥ एवं इच्छे अनिच्छे नस्पर्शतां ॥ सुषुप्तिचे परि होइ विचारितां ॥ ते सुषुप्ति कैसी आतां ॥ रूप करूनि दाविजेल ॥ १८ ॥ जागृति ऐलिकडे सुषुप्ति ॥ पैलिकडे तेचि निश्चिति ॥ यालागीं

गाउनि निज स्फूर्ति ॥ उरलि स्थिति निद्राच कीं ॥ १९ ॥
एवं निद्रारूपें असोनियां ॥ निजल्याचि सारिखि करि क्रिया ॥
मुक्त ऐसा दिसे परि बोलावया ॥ ह्माहि नसे अधिकार ॥ २०॥
असो इच्छे अनिच्छे मांडवला ॥ सुषुप्तिवत विचरों लागला ॥
तो मुक्ताचियेपरि राहिला ॥ परि नसाहे मुक्तत्वहि ॥ २१ ॥

**निर्ग्रंथिः शांतसंदेहो जीवन्मुक्तः स्वभावतः ॥**
**अनिर्वाणोपि निर्वाणे चित्रदीप इव स्थितः ॥१७॥**

शांति होऊनि संदेहाचि ॥ ग्रंथि सुटली जीवित्वाचि ॥ मग जीवन्मुक्ति स्थिति तयाचि ॥ स्वभावें विराजमान ॥ २२ ॥ सर्वरूपें असो जाणें ॥ परि सर्वासारिखाही नेणे ॥ एवं जीतचि असतां नसो जिणें ॥ ये लक्षणें जीवन्मुक्ताचि ॥ २३ ॥ सुषुप्तिवत् विहरण ॥ ऐसें मागें जें केलें निरोपण ॥ तेंचि जीवन्मुक्ताचें लक्षण ॥ येथ नसे संशय ॥ २४ ॥ आकाश सकळिं सकळपणें ॥ असे परि स्वभाव सांडूं नेणे ॥ तैसा जिऊनि जिणियातें नेणे ॥ स्वभावें ह्मणूनि जीवन्मुक्त ॥२५ ॥ अनिर्वाण ह्मणिजे संसारि ॥ जरि भासे व्यवहारि ॥ तरि तो जाण सुपारि ॥ निर्वाणरूप सर्वदा ॥ २६ ॥ जागृति पलिकडे पाहिं ॥ स्फुरणाभावें उरलें काहिं ॥ तेंचि निर्वाण येथ संदेह नाहीं ॥ तद्रूपेंचि अखंड असे ॥ २७ ॥ ह्मणोनि या स्फुरण ॥ भासे दृश्य द्रष्टा दर्शन ॥

॥ तरि ते स्फूर्ति ह्मणेल कवण ॥ निदर्शन येअर्थी ॥ २८ ॥ चित्रि दीप जैसा दिसे ॥ परि तो सत्यत्वें न प्रकाशे ॥ तैसें जीवन्मुक्ताचें नसे ॥ स्फुरणास्फुरण रूपें ॥ २९ ॥ असो ऐसा बुरोनि उरला ॥ न वर्तोनि वर्तो लागला ॥ तो निर्वाणरूपचि संचला ॥ जरिं भासला निर्वाण ॥ ३० ॥ चित्रदीपाचेनि दृष्टांतें ॥ असोनि नसणं जयाचें निरुतें ॥ येचि जीवन्मुक्तस्थिति-तें ॥ मागुतेनि सांगोंपां ॥ ३१ ॥

अहंकारमयीं त्यक्त्वा वासनां लीलयैव यः ॥
तिष्ठति द्वेपसंत्यागी सजीवन्मुक्त उच्यते ॥ १८ ॥

अहंकाराची दुहिता ॥ जीतवासना ऐसें आलें बोलतां ॥ तियेसि लग्न जाहालें असतां ॥ पूर्वदशा अतिक्रमल्या ॥ ३२ ॥ तयाउपरि परियेसीं ॥ वासना व्यभिचारें पितयासी ॥ पुंश्चली पापिणी देखोनि ऐसी ॥ त्याग केला निशेप तिचा ॥ ३३ ॥ मग उत्तम दशेसि जाण ॥ केलें सद्वृत्तिचें पाणिग्रहण ॥ आत्मानु-कूलत्वें तियेचें वर्तणें ॥ देखोनि उपजे संतोषु ॥ ३४ ॥ एवं वासना स्त्री तें नावडती ॥ आणि सद्वृत्तीतें आवडती ॥ सद्वृत्ति ते अधिक प्रीति ॥ वासनेचा घडे द्वेषु ॥ ३५ ॥ यावरि चलेनी प्रीतिगुणें ॥ सद्वृत्ति आलिंगिली गुणें ॥ मागुतेनी भेदा येणें ॥ ऐसें नव्हतें आलिंगन ॥ ३६ ॥ ऐसें ऐक्य जाहालियानंतरें ॥ प्रीति लागे सद्वृत्ति नुरे ॥ तेथें द्वेषाल्यागिं केउति उरे ॥ असद्वृत्ति

वासना ॥ ३७ ॥ वासना नदिसे वेगळेपणें ॥ ते द्वेष ऐसे कवण ह्मणे॥ह्मणोनि द्वेष त्यागीं ऐसें बोलणें॥इतुकेनि जाहलें सार्थक॥३८॥ या उपरि तो तत्वतां ॥ लीला विनोद होय राहता ॥ क्रिया करि परि कर्तव्यता ॥ तेथें सहसा बोलों नये ॥ ३९ ॥ तस्मात् अहंकारमयी वासनात्यक्त ॥ आणि द्वेष संत्यागयुक्त ॥ तोचि बोलिजे जीवन्मुक्त ॥ लीलाविग्रह असा जो ॥ ४० ॥ साधकाची सावधानवृत्ति ॥ तत्याची सहजस्थिति ॥ ते केले ह्मणासि रघुपति॥ यथा निगुती एकपां ॥ ४१ ॥

दूरे मुंचति बंधमंध इव यः संगाद्भुजंगादिवत्रासं यो विदधाति वेत्ति दशकं रोगं च भोगं च यः ॥ स्त्रैणं यश्च गणं तृणं प्रकुरुते मित्रेष्वामित्रेष्वपिस्वां तं यस्य समं सुमंगलमिहामुत्रापि शर्मान्तरम् ॥१९॥

अंध पदार्थ नदेखे जयेपरि ॥ तैसा बंधन देखोनि टाकिला दूरीं॥ जो संगापासूनि त्रास धरि ॥ भुजंगवत् मानोनी ॥ ४२ ॥ रोगरूप जाणोनि अति ॥ भोगांचि अनावड चित्तीं ॥ स्त्रीसमूहिं अनासक्ति ॥ तृणतुल्य मानोनी ॥ ४३ ॥ मित्र आणि अमित्राप्रति ॥ समान जयाची प्रीति ॥ अक्षय सुखाची प्राप्ति ॥ इह आणि परलोकीं ॥ ४४ ॥ अंतरिं अधिष्ठान समत्वाचें ॥याळागिं अंतर सुमंगळाचें ॥ आतां हाचि अर्थ साचे॥ सांगों द्वितीय प्र-

कारें ॥ ४५ ॥ दृश्य न देखोनि अंध जाहला ॥ यालागीं संशय-बद्ध नाहि देखिला ॥ अहंकारसंग नव्हे भला ॥ ह्मणोनि धरिला त्रास त्याचा ॥ ४६ ॥ द्वैतभागाचे न मनीं सुख ॥ वासना समूहाचें न पाहे मुख ॥ आणि मित्रामित्र आपपर देख ॥ समत्व योग्य तेठाईं ॥ ४७ ॥ इह ह्मणिजे स्वंपद सबळ ॥ स्वर्ग ह्मणिजे तत्पद केवळ ॥ या दोहींच्याठाईं अमल ॥ असिपदाचें सुख भोगीं ॥ ४८ ॥ आतां जरि गोडी समत्वाची ॥ ह्मणोनि ऐसि स्थिति नयाची ॥ असो देहि दशा साधकाची ॥ परि सहजरूप असे तथें ॥ ४९ ॥ पुनरपि त्या पुरुषाचें लक्षण ॥ जाणावया कीजेल निरूपण॥ सादर करी श्रवण॥ वसिष्ठ ह्मणे रामचंद्रा॥ ५०

हृदा यः संपरित्यज्य सर्वदृश्यं प्रबोधधीः ॥
व्योमसौम्यतरोऽव्यग्रः समुक्तः परमेश्वरः ॥२०॥

सर्व दृश्याचें बीज दृश्यपणें॥ द्रष्ट्यासी होतांउणें ॥ मग दृश्य कविहोणें ॥ वस्तुत्वाचें ॥ ५१ ॥ त्या द्रष्ट्याचे संधि ॥ वसत होती जे बुद्धी ॥ तेंहि पुरलि अवधी ॥ दृश्यद्रष्टापणाची ॥ ५२ ॥ दृश्यासगट भेद खाऊन ॥ जाहलिया खुंटे विवरण ॥ मग व्योमाचियेपरी निर्वाण ॥ सौम्यरूप होय उतरता ॥ ५३ ॥ स्वरूपीं उल्लेख द्रष्टपणाचा ॥ तोचि ग्रामभाव तेथिंचा ॥ द्रष्टोपशमनानंतरें साचा ॥ उरला केवळ अव्यग्रभावो ॥ ५४ ॥ ऐसि भावरूपें जे आस्तिकता ॥ तेचि बोलिजे अव्यग्रता ॥ असो या स्थितिं जो

उरला तत्वतां ॥ तोचि सर्वथा नित्यमुक्त ॥५५ ॥ बंधमोक्षांचिया गडामोडी ॥ जियेची श्रीरामचन्द्रा न होय वाकुडी ॥ तेचि नित्य मुक्तता फुडी ॥ जो निजप्रौढी शाश्वत ॥ ५६ ॥ ते नित्यमुक्त-तेचा धनी ॥ महाराज स्वरूपज्ञानी ॥ तो नित्यमुक्त परमेश्वर म्हणोनि ॥ याचिलागि बोलिला ॥ ५७ ॥ नांदे जागृति परता ॥ अतएव ईश्वरपदाते लंघिता ॥ याकारणें तत्वतां ॥ परमेश्वर तोचिपें ॥ ५८ ॥ ऐसा सर्वद्रव्य परित्यागी ॥ प्रशांतधी महायोगी ॥ व्योमासारिखा जगीं ॥ तोचि मुक्त परमेश्वर ॥ ५९ ॥

समाधिर्यस्य कर्माणि माकरोतु करोतु वा ॥
हृदये नास्ति सर्वाशो मुक्तएवोत्तमाशयः॥ २१ ॥

त्याची क्रिया अथवा उगपण ॥ येकेक कर्म समाधिरूप जाण ॥ ऐसें असतां लीलेकरून ॥ कर्मे करू अथवा न करू ॥ ६ ॥ आपुलेपणें ते कांहीं सकळ आशांचें बीज पाहिं ॥ तें निरसे तेव्हांचि नाहीं ॥आशासमूह हृदईचा ॥ ६१ ॥ आशासमूह हृदई नसतां ॥ तो मुक्त ऐसें आलें बोलतां ॥ उत्तमाशयपद हें आतां ॥ साभिप्राय वारंवारु ॥ ६२ ॥ आशयशब्दें अंतःकरण बोलणें ॥ सर्वापरि सर्वपणें ॥ गुंतोनि उगवलें आत्मज्ञानें ॥ याचि कारणें उत्तम ॥ ६३ ॥ उत्तम ज्याचें अंतःकरण ॥ म्हणोनि धन्य तो सकळाधिष्ठान ॥ उत्तमाशय हें अभिधान ॥ येणें विचारें बोलिलें ॥ ६४ ॥ एवं कर्माकर्मे सहज लीळा ॥ असतां नभंगे समा

धिसोहळा ॥ हृदईहूनि गेल्या आशा सकळा ॥ तोचिमुक्त उत्तमा शय ॥ ६५ ॥ मागुतेनि तो पुरुष कैसा ॥ जो बोलिजेल नित्य-मुक्त ऐसा ॥ एवं बंधमोक्षाचा ठसा ॥ कदापि सहसा नदिसे॥६६॥

**अनात्मन्यात्मधीर्बंधस्तन्नाशो मोक्ष उच्यते ॥**
**बंधमोक्षौ न विद्येते नित्यमुक्तस्य चात्मनः ॥२२॥**

आत्मयाचें जे अज्ञान ॥ त्या पासाव झालें प्रपंचभान ॥ म्हणोनि अनात्मा हें अभिधान ॥ प्रपंचासि बोलिलें ॥ ६७ ॥ त्या अनात्म रूप रघुनंदना ॥ मानिलि जे आत्मभावना ॥ तोचि बंध यावचना ॥ लागों नेदि असंभवा ॥ ६८ ॥ नाश तया बंधाचा ॥ तोचि निर्देश मोक्षाचा ॥ विटाळ या उभयाचा ॥ नलगे नित्य मुक्तासि ॥६९॥ आपुलिये सहजस्थिति ॥ नेणे आत्मानात्म हे उपपत्ति ॥ ॥ ऐसें आतां बंधमोक्षभ्रांति ॥ कैचि बोलावें त्याठाईं ॥ ७० ॥ तस्मात नित्य मुक्त जो कोणि ॥ तो नसाहे बंधमोक्षाची घाणी ॥ निर्वाण रूपें निर्वाणिं ॥ मिरवे कैसा तो आइक ॥ ७१ ॥

**दृश्यं नास्तीति बोधेन मनसो दृश्यमार्जनं ॥**
**संपन्नं चेत्तदोत्पन्ना परा निर्वाण निर्वृतिः ॥२३॥**

दृश्य भावि दृमजलपण ॥ येणें दृश्यं नास्तीति बोधेंकरून ॥ मनोजन्य दृश्याचें मार्जन ॥ होय पूर्णत्वें जें कांहि ॥ ७२ ॥ तेव्हां निवृत्ति परमनिर्वाण ॥ उत्पन्न होय ऐसे त्याला जियेचे

मोक्ष ऐसें अभिधान ॥ नच ठेवि चरण तियेवरि ॥ ७३ ॥ होय सकळ आशांचें निर्दळण ॥ तरिच खुंटे विवरण ॥ आणि विवरणाचें जें अवसान ॥ तेंचि निर्वाण मोक्षरूपाचें ॥ ७४ ॥ एवं सकळ आशांचा जो क्षयो ॥ तोचि निर्वाणमोक्षाचा उदयो ॥ येणेचि प्रमेयें अन्वयो ॥ पुढिल श्लोकासि लागला ॥ ७५ ॥

**न मोक्षो नभस पृष्ठे न पाताले न भूतले ॥**
**सर्वशासंक्षयश्चेतःक्षयो मोक्ष इतीष्यते ॥ २४ ॥**

मोक्ष नाहिं नभमंडळिं ॥ मोक्ष नाहिं पृथ्वीतळिं ॥ मोक्ष नाहीं पाताळिं ॥ सत्य बोली श्रीरामा हे ॥ ७६ ॥ मोक्ष नाहिं त्रैकुंठनिकेतनिं ॥ मोक्ष नाहिं कैलासभुवनीं ॥ मोक्ष नाहिं सप्तद्वीपस्थानीं ॥मोक्ष नाहिं क्षीरसागरिं ॥ ७७ ॥ आशा समस्त क्षयो पावति ॥ आणि स्वयें उपशमे चित्तवृत्ति ॥ ऐसी जेथें होय स्थिति ॥ मोक्ष निश्चित तोचि जाणा ॥ ७८ ॥

**अनंते चिद्घनानंदे निर्विकल्पैकरूपिणि ॥**
**स्थिते द्वयस्याभावाद्वा को बद्धः कश्च मुच्यते ॥२५॥**

मोक्षाची व्यक्ति कैसी ॥ श्रीरामा सावधान परियेसीं ॥ मोक्षहेहि भावना ऐसी॥करितां नये ज्याच्या ठांई ॥ ७९ ॥ ती करितां नये ह्मणोनि अनंत ॥ चिद्घनानंदेंसि भराभरित ॥ जागृति पैलीकडे ह्मणोनि ह्मणिजेत ॥ निर्विकल्पैकरूप ॥ ८० ॥ ऐसे

अनंत चिद्धनानंद ॥ निर्विकल्पैकरूप प्रसिद्ध ॥ द्वैताभावेंकरूनि विशुद्ध ॥ त्याच्याठाई स्थिर असतां ॥ ८१ ॥ बद्ध ह्मणावा कोण पाहि ॥ मुक्त बोलावें कोणाच्याठाई ॥ एकरसभावें कांहिं ॥ बंध मोक्ष न भासति ॥ ८२ ॥ एवं बंध मोक्षां जे ये स्थिति ॥ तोचि बंध जाणा निश्चिति ॥ आणि बंध मोक्ष जेथं नासति ॥ तोचि मोक्ष जाणिजे ॥ ८३ ॥ बंध मोक्ष मिळोनि मन ॥ या-लागिं तेथंचि आधींबंधन ॥ मनाच्या प्रशमेंनी मोक्ष निर्वाण ॥ हेंचि निरूपण पुढतीं ॥ ८४ ॥

तस्माद्विलासमात्रेणं मनसो बंध आगतः ॥
मनःप्रशमतो राम मोक्षएवावशिष्यते ॥ २६ ॥

तस्मात् स्वरूपीं स्वरूपविलास स्फुरण ॥ तेणें स्फुरणविला-समात्रें आपण ॥ पावे मनोरूप बंधन ॥ मोक्षबंध त्याचेच पोटीं ॥ ८५ ॥ तें प्रशमातें पावलिया मन ॥ उरे मोक्षपद जें निर्वाण॥ जैसें किडाळ टाकितां शोधून ॥ उरे कांचन सांडपंधरें ॥ ८६ ॥ तस्माद्विलासमात्रें मनाची उत्पत्ति ॥ मनोदयें नासे मोक्षस्थिति ॥ अगा श्रीरामा महामति ॥ हा निरूपणाचा कळसु ॥ ८७ ॥ आतां येथूनि संपलें प्रकरण ॥ पुढें अवधारीं सावधान ॥ मनो-

लयाचें प्रकरण ॥ विशद प्रकारें बोलिजेल ॥ ८८ ॥ ऐसा महर्षींमाजी वरिष्ठ ॥ वक्तयांमाजी श्रेष्ठ ॥ वचन बोले वसिष्ठ ॥ परमादरें परमप्रीति ॥ ८९ ॥ तें ऐकुनि रघुनंदन ॥ जो कौसल्योदरशुक्तिजन्य रत्न ॥ श्रवणाकार करूनि मन ॥ होय सावधान निरूपणीं ॥ ९०॥ माधवदास टीका कर्ता ॥ मननेंसहित प्रार्थि महंतां ॥ या निरूपणलक्षणामृता ॥ अनुभव सुखें सेवावें ॥९१॥ इति श्रीयोगवासिष्ठसारे माधवदासकृतटीकायां तृतीयं जीवन्मुक्तप्रकरणं समाप्तम् ॥ १०२ ॥ श्रीमत्सीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ श्लो० ॥ २६ ॥ टी० १०२ ॥ पद्यसंख्या ॥ २१० ॥ अ० ३॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीमन्नारायणचरण ॥ सुंदर रक्तोत्पलाहून ॥ जें स्मरतां बोध कल्याण ॥ उदयगिरवासिन पावे ॥ १ ॥ जें सकळ तीर्थांचें जन्मस्थान ॥ जें विश्वश्रियेचें भुवन ॥ जें योगियांचें ध्येय निर्वाण ॥ परम पावन उपासकां ॥ २ ॥ तें श्रीचरण उत्कंठ प्रीतीं ॥ धरिले हान्मातें चित्तीं ॥ निजस्वरूप सुखाप्ति ॥ आली वाकप्रवाहा ॥ ३ ॥ आतां आरंभिलें चतुर्थ प्रकरण ॥ जेथें कडोविकडांचें निरूपण गहन ॥ कृपा आणुनि मन ॥ नाहीं कीजेल अनुभवें ॥ ४ ॥ श्रीराम देखोनि सावधान ॥ वसिष्ठ आल्हादरूप जाण ॥ सुप्रसन्न बोले वचन ॥ एक बापा मंगळनिधि ॥ ५ ॥ मागें जे निरूपिली मनाची मूर्ति ॥ ते

सूक्ष्मप्रकारें गा रघुपति ॥ आतां सांगिजेल यथानिगुति ॥ स्थूळविचारें करूनी ॥ ६ ॥

**एषा स्वभावाभिमतिः स्वतः संकल्प्य धावति ॥**
**चेतसः स्वयमास्थानं सा एव मनआत्मनः ॥१॥**

स्वतः संकल्पाचिये संगतीं ॥ नीट धांवे विषयांप्रती ॥ हे चित्ताची स्वभावमति ॥ ऐसि स्थिति इयेची ॥ ७ ॥ प्रवाहाचा उगम जैसा ॥ प्रवाहावांचुनी नसे सहसा ॥ मनोवृत्तीचा उद्भव तैसा ॥ मनाचेनि विचारें ॥ ८ ॥ नदीचा उगम तडाग बोलतां ॥ नदी हा शब्दचि न घडे वस्तुता ॥ तैसें वृत्तिचें अधिष्ठान आत्मा ह्मणतां ॥ वृत्ति हा तत्वता शब्द न घडे ॥ ९ ॥ असो तिचें तेंचि अधिष्ठान । ह्मणोनि तिणें कवळिलें हें गगन ॥ तस्मात् तेंचि बोलिजे मन ॥ आत्मयाचेंचि बोतिलें ॥ १० ॥

**एतस्मात्सर्वगादेव सर्वशक्तेर्महात्मनः ॥**
**विभागः कल्प्यते शक्तिर्लहरीवोत्थितांऽभसः ॥२॥**

जो सर्वशक्तीतें धरिता ॥ अतएव महात्मा ऐसें आलें बोलतां ॥ जो सर्वगतपणें सर्वीं नांदता ॥ देवादिदेव अखंड ॥ ११ ॥ तयापासुनी कल्पित पाहीं ॥ हा मनोरूप शक्तिविभाग जो कांहीं ॥ जयेपरि उदकाचिया डोहीं ॥ लहरी होय निर्माण ॥ १२ ॥ एवं लहरीउत्थित जळ ॥ तसा मनोदित आत्मा सबळ ॥ अमळासि केलें समळ ॥ येवढा महिमा जयाचा ॥ १३ ॥ अव्यक्तिं दावि-

ल्या अनंतव्यक्ति ॥ असो ऐसी मनोवृत्ति ॥ इयेची काशेनि होय उपशांति ॥ हेंचि पुढति सांगों आतां ॥ १४ ॥

## अंतःसंकल्पसिद्धेयं संकल्पेनैव शाम्यति ॥ येनैव जायते तेन वन्हिज्वालेव वायुना ॥ ३ ॥

अंतरींच्या संकल्पासरिसा ॥ इयेचा उमटे रूपठसा ॥ म्हणोनी अंतःसंकल्पासिद्ध ऐसा ॥ शब्द आला बोलतां ॥ १५ ॥ एवं संकल्पसिद्ध हे मनोवृत्ति ॥ इयेची संकल्पें होय उपशांति ॥ तो संकल्प कोण हे उपपत्ति ॥ सांगों महामते तुजलागीं ॥ १६ ॥ धांवती वृत्तिमां मन्यगावरण ॥ तोही संकल्पचि जाण ॥ यालागीं संकल्पें होय प्रशमन ॥ संकल्पजन्यवृत्तीचें ॥ १७ ॥ साहंकार संकल्पें होय जनन ॥ नाहंकारशब्दें होय निधन ॥ जेणें उपजे तेणेंचि नाशन ॥ येअर्थी असे दृष्टांत ॥ १८ ॥ जैसा वायु प्रगटी वन्हिज्वाळेंते ॥ तोचि पाववी प्रशमातें ॥ किंवा मृत्तिकेनें समळ केलें वस्त्रातें ॥ तेचि मागुतें करी अमळ ॥ १९ ॥ कीं पदकेंचि उपजविली वकुळी ॥ आणि तोचि तियेतें पोटीं घाली ॥ कीं दृष्टीनें मूर्ति प्रसन्न केली ॥ आणि तिणेंचि केली अप्रत्यक्ष ॥ ॥ २० ॥ तसी संकल्पेंचि मनोवृत्ति जोडे ॥ संकल्पेंचि मागुती मोडे ॥ तुगवे शब्दरूप हें कोडें ॥ अनुभवेंविण सहसा ॥ २१ ॥ एवं संकल्पें उपजे नाशे ॥ असो ऐसी जे मनोवृत्ति असे ॥ ते कोणे प्रकारें नासे ॥ हें मागुती सांगिजेल ॥ २२ ॥

**मनो मुदे वाभ्युदितमन्याकारेण लक्षणात् ॥**
**स्वस्वप्नमरणाकारं प्रेक्ष्यमाणं न दृश्यते ॥ ४ ॥**

उदयातें पावलें जें मन ॥ त्याचें अन्याकारें जें ईक्षण ॥ त्या ईक्षणाचें लक्षण ॥ करीं श्रवण रघुराया ॥ २३ ॥ जो मनाहुनी विलक्षण असतां ॥ जो माझें मन ऐसें ह्मणतां ॥ आपुलेनि देखणेंपणें देखतां ॥ अन्याकारें तोचि पैं ॥ २४ ॥ तेणें अन्याकारें ॥ पाहतां मन नुरे निर्धारें ॥ मन होय आनंदोदित वारें ॥ दृष्टांत असे येअर्थी ॥ २५ ॥ हें स्वप्नीं देखतां ॥ ऐसें भासतांचि नुरे स्वप्न वार्त्ता ॥ हें मरण मी मरतां ॥ ऐसें जाणतां नुरे मरण ॥ २६ ॥ तैसें हें मन मी याचा देखणा ॥ ऐसें भावितांचि मनाचा होय उगाणा ॥ हे आकळे सद्गुरूची खुणा ॥ अन्यथा अज्ञाना उमज न पडे ॥ २७ ॥ तस्मात् अन्याकारें जें ईक्षण ॥ तेंचि मनाचें निदर्शन ॥ ह्मणोनि अन्यथा ज्ञान ॥ तेंचि मन निश्चयें ॥ २८ ॥

**असम्यक्दर्शनाद्यस्मादनात्मन्यात्मभावनं ॥**
**यदवस्तुनि वस्तुत्वं तन्मनो विद्धि राघव ॥ ५ ॥**

पूर्वश्लोकीं बोलिलें जें ईक्षण ॥ तेंचि परम सम्यक् दर्शन ॥ आणि याचें जें विपरीत ज्ञान ॥ असम्यक् जाण तेंचि पैं ॥ २९ ॥ त्या असम्यक्दर्शनाचें महिमान ॥ हेंचि जें विसरण आपणा आपण ॥ नाशिवंत शरीर जें पिशुन ॥ तेथें मीपण दृढ याचें ॥

॥ ३० ॥ तेणें मीपणें परियेसी ॥ अखंड जो आपण सकळांसीं ॥ तो खंडित होऊन पदार्थांसी ॥ भिन्नभिन्न देखता होय ॥ ३१ ॥ जैसें स्वप्नीं देखिजे भान ॥ आपुलेंचि कीजे आपण ॥ परंतु नुमजल्पेपणें ह्मणे भिन्न ॥ मजसी आहे वर्तत ॥ ३२ ॥ तैसा देहीं कोंडला होत्साता ॥ सर्वांकळें आपणचि हें न कळतां ॥ देखे सकळां पदार्थां ॥ पृथकभावें करूनी ॥ ३३ ॥ एवं सम्यकदर्शना भावें ॥ अनात्मीं आत्मत्व संभवे ॥ दृश्य अवस्तुमय असोनि अवघें ॥ वस्तुत्वें प्रतीयमान ॥ ३४ ॥ वस्तु ह्मणिजे पदार्थु ॥ अवस्तु ह्मणिजे परमार्थु ॥ येथें ऐसाचि घ्यावा अर्थु ॥ अन्यथा अनर्थ ह्मणीं होय ॥ ३५ ॥ तस्मात् ऐसें जें स्थितिलक्षण ॥ तेंचि रावता जाण मन ॥ पुढिले श्लोकीं निरूपण ॥ हेंचि असे बोलिलें ॥ ३६ ॥

## अयं सोहमिदं तन्मे एतावन्मात्रकं मनः ॥
## तदभावेनमात्रेण दात्रेणैव विलीयते ॥ ६ ॥

हा अमुका तो अमुका देहधारी ॥ मी असुका जन्मलों माते-च्या उदरीं ॥ हें विश्व अनेकाकारीं ॥ तें ब्रह्म असें देखिलें ॥ ३७ ॥ पुत्रदारादि समस्त ॥ माझेंचि पैं हें निश्चित ॥ ऐसी भेदभावना अखंडित ॥ मन तें एतावन्मात्र ॥ ३८ ॥ अहंकाराचा आश्रयो केला ॥ आणि येकचि अनेकत्वें विभागला ॥ तोचि संसार नाथिला ॥ तेंचि रूप मनाचें ॥ ३९ ॥ तेचि भावना होय परती ॥

तरि कैंची नाथिली संसृति ॥ मन कोठुनी येईल व्यक्ति ॥ स्वयं स्थिति अभंग ॥ ४० ॥ जसा उपाधि परता नेला ॥ स्फटिक भेद त्यासवेंचि गेला ॥ तसा आत्मभेद दशरथी जाहला ॥ भावनेचेनि अभावें ॥ ४१ ॥ शस्त्रें छेदिजे मन ॥ तस्मात् भावनामात्र बंधन ॥ हेंचि निरूपण ॥ पुढति असे ॥ ४२ ॥

**उपादेयानुतपनं हेयैकांतविवर्जितं ॥**
**यदेतन्मनसो रूपं बंधं तं विद्धि राघव ॥ ७ ॥**

प्रिय पदार्थ घेणें ॥ यापासाव अनुताप नेणें ॥ आणि अप्रिय पदार्थ टाकणें ॥ टाकी एकांत विवर्जित ॥ ४३ ॥ हे कुरूप हे बरवें ॥ हे घेउनि टाकावें ॥ ऐसि जे भावना भेदभावें ॥ हेंचि रूप मनाचें ॥ ४४ ॥ भावनेवेगळें मन ॥ हे बोलोंचि नये वचन ॥ चळण नसतां भासिल कोण ॥ संसाराची आस्तिकता ॥ ४५ ॥ याल्लागीं भावनारूप मन ॥ आणि मनोरूप तेंचि बंधन ॥ हें राघवा निश्चयें जाण ॥ मनचि कारण संसाराचें ॥ ४६ ॥

**मनो हि जगतां कर्तृ मनो हि पुरुषः स्मृतः ॥**
**मनः कृतं कृतं राम न शरीरकृतं कृतं ॥ ८ ॥**

ही यस्मात् रघुपति ॥ जगाची जेथुनी उत्पत्ति ॥ ऐसी जे मूळ प्रकृति ॥ ते मनोरूपचि निर्धारीं ॥ ४७ ॥ आणि प्रकृतीचा अधिष्ठाता ॥ कूर्मावलोकनें विलोकिता ॥ ऐसा जो पुरुष तत्वतां ॥

तोहि मनोरूप पें ॥ ४८ ॥ एवं पिंडब्रह्मांडीं जे ईश्वर ॥ माया अविद्यातत्व विद्यातत्व विचार ॥ इणेंचि अवघा जगदाकार ॥ मनोरूप रचल्यास ॥ ४९ ॥ जेसें वटबीज राईप्रमाण ॥ परि वृक्षरूपें कवळी गगन ॥ तेसें भावनारूप सूक्ष्म मन ॥ व्यापी ईश्वरपणें प्रपंचपें ॥ ५० ॥ ह्मणोनि मनावेगळें सहसा ॥ बोलों-चि नये प्रपंचठसा ॥ सूर्योदयाव्यातिरिक्त कैसा ॥ दिवस भाव अनुगमेल ॥ ५१॥ सुषुप्ति वेगळें स्वप्न न दिसे ॥ कीं गोडी वेगळें गुळपण नसे ॥ मनाचेनि अभावें तैसें ॥ प्रपंचभान बोलों नयें ॥ ५२ ॥ कां जे प्रकृति पुरुषापासूनी जन ॥ आणि पुरुष प्रकृति मिळोनि मन ॥ तरि जगाचें उत्पत्तिस्थान ॥ आणिक न बोलावें ॥ ५३ ॥ येणें विचारें सर्वथा ॥ क्रिया आली मनाचे माथां ॥ मनाचि कर्त्ते अन्यथा ॥ क्रियारूप न घडे कोठें ॥ ५४॥ मनें केलें तेंचि कर्म घडे ॥ शरीरें केलें तें नघडे ॥ निदर्शन येक पुढें ॥ असे स्फुरलें ये अर्थीं ॥ ५५ ॥ जैसा बहुरूपी सोंग घेऊनियां ॥ आचरे नानाप्रकारची क्रिया ॥ तें क्रियाफळ पावे सोंगा नया ॥ कीं बहुरूपियासि पावे ॥ ५६ ॥ नाना बहुरूपीच तेथें कर्त्ता ॥ करूनी फळाचा होय भोक्ता ॥ परंतु सोंगें केलें वस्तुता ॥ बोलोंचि नये सर्वात्मना ॥ ५७ ॥ बाहुलें नाचे स्तंभावरी ॥ ऐसें दिसे परि नाचवी सूत्रधारी ॥ नृत्य करूनी नकरी ॥ अचे-तन तें बापुडें ॥ ५८ ॥ तैसें कर्मयोगें शरीर चळे ॥ परि कर्तृत्व

शरीरीं नाढळे ॥ क्रिया उद्भवे मनामुळें ॥ म्हणोनि आलें मनाच्या माथां ॥ ५९ ॥ चुंबकसत्तें लोह चळे ॥ लोह तें चळण क्रिये-केंसळें ॥ कां जे कर्तृत्व असे लागलें ॥ चुंबकाचे मुळीं पै ॥६०॥ तेंसें मनाचेनि योगें देह वागे ॥ हे देहीं क्रिया शेषु न लागे ॥ काढे मनाचेनि आंगें ॥ कर्तृत्व असे म्हणोनी ॥ ६१ ॥ यालागीं शरीर करूनि न करी ॥ आणि मन तें नकरूनि करी ॥ कैसी झाली नवल परी ॥ जड तें अजड अजड तें जड ॥ ६२ ॥ तस्मात् याल्लोकाच्या ठाईं ॥ मनें केलें तें केलें पाहीं ॥ शरीरकृत तें केलेंचि नाहीं ॥ पूर्वोक्त दृष्टांत प्रमाणें ॥ ६३ ॥ मनाचे माथां कर्तेपण ॥ अतएव मन मूळ त्रिभुवना ॥ हेंचि पुढें निरूपण ॥ करीं श्रवण श्रीरामा ॥ ६४ ॥

## चित्तं कारणमर्थानां तस्मिन् सति जगत्रयं ॥ तस्मिन् क्षीणे जगत्क्षीणं तच्चिकित्सा प्रयत्नतः ॥९॥

उगाव आटव पदार्थांचा ॥ तोचि संस्कार मनाचा ॥ तरी मनेंकरूनि साचा ॥ अर्थोद्भव जाणावा ॥ ६५ ॥ चित्त समस्त पदार्थांचें कारण ॥ तरी चित्ताचेंचि वोतिलें त्रिभुवन ॥ म्हणोनी चित्त असतां भासे जन ॥ चित्ताभावें जन नाहीं ॥ ६६ ॥ जैसें आटल्या जीवन ॥ नुरती सहसा बुद्बुदफेन ॥ तेंसें नाहीं होय जेव्हां मन ॥ हरपे जन त्याचि सरिसें ॥ ६७ ॥ म्हणोनि सर्व प्रयत्नें करून ॥ हा चित्तव्याधि होय क्षीण ॥ ऐसा करावा औषध

प्रयत्न ॥ जेणें जगद्रूप हरपे ॥ ६८ ॥ तो प्रयत्न ह्मणसी कोण ॥ तरी वासनारूप असे हें मन ॥ वासनेचें केलिया निर्दळण ॥ तें हरपे अनायासें ॥ ६९ ॥

**राम वासनया बद्धं मुक्तं निर्वासनं मनः ॥**
**तस्मिन् विवासिता भावं संहराशु विवेकतः ॥१०॥**

श्रीरामा परियेसीं वचन ॥ सांगिजेल चमत्काराची खुण ॥ तरी गा वासनायोगें जाण ॥ बद्ध मन सर्वथा ॥ ७० ॥ दिगंबर झाले सत्रासमि ॥ वानप्रस्थ जाहले गृहवासि ॥ मौनी शरण येती वाचेसि ॥ वासनेचेनि संयोगें ॥ ७१ ॥ ब्रह्मचारी संग्रहिती वनिता ॥ येकांती येती व्यौकिका ॥ लोलुप्य उपजे विरक्ता ॥ वासनेचेनि संयोगें ॥ ७२ ॥ आहार सेविती निराहारी ॥ मुंडित होती अलकधारी ॥ जटी त्यागिती जटा जरी ॥ वासनेचेनि संयोगें ॥ ७३ ॥ नग्न होती गर्वाधिकारी ॥ विरक्त येती बाहेरी ॥ समाधिस्थ येती देहावरी ॥ वासनेचेनि संयोगें ॥ ७४ ॥ वासनेची प्रौढी ऐसी ॥ सांगितली श्रीरामा परियेसीं ॥ कारणरूप देहासी ॥ सवासन मन बोलिजे ॥ ७५ ॥ निष्कळीं आलें ब्रह्मत्व ॥ ब्रह्मत्वीं आलें ईश्वरत्व ॥ ईश्वरीं आलें जीवित्व ॥ वासनेचेनि संयोगें ॥ ७६ ॥ ऐसें आत्मविवेकेंविण ॥ ह्मणोनी सवासन असे मन ॥ तस्मात् तें विवेककरून ॥ नाशीं वेगें श्रीरामा ॥ ७७ ॥ विवेकें वासनेचें नाशन ॥ वासना नाशी

निर्वासन मन ॥ निर्वासन मन तेंचि मुक्त जाण ॥ अन्यथा होय बद्धपें ॥ ७८ ॥ याकारणें रघुनाथा ॥ वासना निवृत्ति मुख्यता ॥ वासना आड असतां ॥ न घडे स्वरूपींचा अनुभव ॥ ॥ ७९ ॥ ह्मणोनि गा रघुनंदना ॥ स्वरूपासि आच्छादक वासना ॥ येचि अर्थीच्या निरूपणा ॥ श्रीं देई अवधान ॥ ८० ॥

## यथाऽभ्रलेखाशशिनं सुधालेपं मसी यथा ॥ पिदधत्येवमेवांतर्नरमाशा विषूचिका ॥ ११ ॥

जैसें आड रेखामात्र आभाळ ॥ आच्छादी समग्र शशिमंडळ ॥ कीं चूर्णलेपीं अळुमाळ ॥ मसी होय आच्छादक ॥ ८१ ॥ तैसें पुरुषाचें अंतर ॥ आत्मविज्ञान साचार ॥ त्याप्रती आशा हे अणुमात्र ॥ आच्छादक जाण श्रीरामा ॥ ८२ ॥ जैसें विषूचि-काग्र परियेसीं ॥ सूक्ष्म परी रुपे शरीरासि ॥ आशा विषूचिका हे तैसी ॥ स्वल्प परिभ्रंशी अंतर ॥ ८३ ॥ आशा आणि वासना ॥ येकची बोलिजे रघुनंदना ॥ तस्मात् स्वरूपसुखा अतिगहना ॥ आच्छादक वासना अणुमात्र ॥ ८४ ॥ तें वासनेचेनि नासें स्वरूपप्राप्ति ॥ आणि स्वरूपावबोधें वासनानिवृत्ति ॥ परस्परें योगाची स्थिति ॥ अनुभवें जाणती अनुभवी ॥ ८५ ॥ जैसे डोळे डोळस उपनेत्रगुणें ॥ आणि नेत्राचेनि उपनेत्र देखणें ॥ तयाचे परी जाणणें ॥ परस्परता येथिंची ॥ ८६ ॥ वासनानिवृत्ति

स्वरूपप्रकाशें ॥ स्वरूपप्राप्ति वासनानाशें ॥ आतां होचि सांगों कैसी निरसे ॥ स्वरूपाववोधें वासना ॥ ८७ ॥

## अंतर्मुखतया सर्वं चिद्वन्हौ त्रिजगत्तृणं॥ जुव्हतस्तन्निवर्तंते राम चित्तादिविभ्रमाः ॥ १२॥

स्वरूपाववोध तेंचि अंतर्मुखता ॥ तेणें ज्ञानाग्नीची होय प्रगटता ॥ त्या ज्ञानाग्निमाजी तत्वतां ॥ जाळिलें समस्त त्रिभुवनतृण॥८८॥ एवं होळी होय सर्व दृश्याची ॥ तेव्हां स्वस्थता होय अंतराची ॥ वासना विभ्रमाची ॥ वास्तव घडे निवृत्ति ॥ ८९ ॥ श्रीरामा जंव दृश्याचें देखणें आंगीं ॥ तंवचि प्ररोह वासनेलागीं ॥ याकारणें जो आत्मयोगी ॥ वासनात्यागी तोचि पैं ॥ ९० ॥ सर्वदृश्योपसंहरण ॥ तेंचि आत्मयोगाचें लक्षण ॥ त्या दृश्योपसंहाराचें कारण ॥ भावींच नास्तिकता ॥ ९१ ॥

## यदा न भाव्यते किंचिद्धेयोपादेयरूपवत् ॥ स्थीयते सकलत्यक्तं तदा चित्तं न जायते॥१३॥

घेणें टाकणें हे भावना ॥ जेव्हां नाशु पावे रघुनंदना ॥ निरसुनी सकळ दृश्यरचना ॥ स्थिति निर्वाह आत्मत्वीं ॥ ९२ ॥ तेव्हां चित्ताची उत्पत्ति ॥ बोलोंचि नये निश्चिती ॥ हेंचि निरूपण पुढती ॥ सांगों आणिक प्रकारें ॥ ९३ ॥

घोरं जाग्रन्मयं चित्तं शांतं स्वप्ने व्यवस्थितं ॥
मूढं सुषुप्तभावस्थं त्रिभिर्हीनं मृतं भवेत् ॥ १४ ॥

अवस्थात्रय जें जाण ॥ तें मनाचें वसतिस्थान ॥ त्या अवस्थात्रयाचें लक्षण ॥ करीं श्रवण सावधानें ॥ ९४ ॥ अंतरींहूनी संकल्प उठे ॥ तोचि करणीं बाह्य प्रगटे ॥ या स्थिति स्थूळदेह गाढे ॥ ते जागृति बोलिजे ॥ ९५ ॥ क्रिया सगळिया संकल्प सरे ॥ तरी संस्कार त्याचा अंतरीं उरे ॥ लिंगदेहाचेचि आधारें ॥ दावी भास तें स्वप्न ॥ ९६ ॥ संस्कार तरि अंतरीं वसे ॥ आभास तरी कांहीं नसे ॥ ऐसी जे लयस्थिति असे ॥ तियेचें नाम सुषुप्ति ॥ ९७ ॥ हें अवस्थात्रय जीवाचें ॥ आतां सांगों ईश्वराचें ॥ अंतरीं स्फुरण जें ज्ञानाचें ॥ ते जागृती तेथिंची ॥ ॥ ९८ ॥ स्वप्न तें विपरीत ज्ञान ॥ सुषुप्ति तें केवळ अज्ञान ॥ सर्व देह अवस्थात्रय जाण ॥ ईश्वराचें साचार पैं ॥ ९९ ॥ या अवस्थात्रयाचें चाळक मन ॥ नांदे तिहींमाजी येक आपण ॥ परंतु रूपें भिन्न भिन्न ॥ अवस्थापरत्वें धरितसे ॥ १०० ॥ स्वसंकल्परूपें सतीव्र ॥ ह्मणोनि जागृतीसी बोलिजे घोर ॥ अचेतनत्वें करी व्यवहार ॥ म्हणोनि चित्तशांती बोलिजे स्वप्नीं ॥ १ ॥ संस्कार न मोडतां ॥ लई लयरूप त्याची आस्तिकता ॥ यापरी स्वप्नामाजीं तत्वतां ॥ मूढ असे सुषुप्तीसी ॥ २ ॥ जैसा काष्ठामाजी अग्नि असे ॥ तो काष्ठरूपाचि तेथें वसे ॥ सुषुप्तिमाजी तसें ॥

असे सुषुप्तिरूप पैं ॥ ३ ॥ मन रूपत्रयें यापरी ॥ नांदे अवस्थात्रया माझारीं ॥ तें अवस्थात्रय मृषपरी ॥ द्रष्टेपणें जें नासे ॥ ४ ॥ जेव्हां अवस्थात्रयाचें झालें नाशन ॥ तें मनातें मन म्हणेल कवण ॥ एवं अवस्थात्रयाचेनी अभावें जाण ॥ मनाचें मरण स्वभावें ॥ ५ ॥ जैसें निवासस्थान मोडे ॥ मग पक्षियांचें राहणें नव्हे ॥ तैसें मनाचें मनपण फुडे ॥ अवस्थानाशें नाश पावे ॥ ६ ॥ आणि येक प्रकारें ॥ बोलिजे मनाचा लयो निर्धारें ॥ तो दृष्टांतेंसीं सादर चांग ॥ करीं श्रवण रघुनाथा ॥ ७ ॥

## विलुप्य पंकं कनके रजोप्सु विलयं यथा ॥
## यथात्मनि तथा विद्धिलासाद्विलयं मनः ॥१५॥

जैसें सुवर्णाचें झालें पाणी ॥ तें आपणा लोपोनी आहे सुवर्णी ॥ कीं रंग उत्पन्न उदकापासुनी ॥ याचा उदकींच लय होय ॥ ८ ॥ तैसें आत्मयाचें ओतलें मन ॥ तें सद्रूपनिरूपणें करून ॥ आत्मस्वरूपींच होय लीन ॥ तो होतो प्रकार ऐसा ॥ ९ ॥ आत्मस्वरूपमना आलें तें ॥ तत्पविज्ञानें पैं निरुतें ॥ मन पावे विलयातें ॥ आत्मस्वरूपीं तत्काळ ॥ १० ॥ मन हें स्वरूपाचें आच्छादन ॥ परंतु सत्ता नसोडे म्हणून ॥ स्वरूपदृष्टीं असतमान ॥ होय याचें त्रिवाचा ॥ ११ ॥ आणि स्वरूप दृष्टि जें न चढे ॥ तें मन हें स्वसामर्थ्यें वाढे ॥ नाना मन गुणें नामें उघडे ॥ संसाररूपें

साकार ॥ १२ ॥ मना आणि संसारासी जाण ॥ बोलोंचि नये भिन्नपण ॥ येच अर्थी निरूपण ॥ एक पुढिले श्लोकींचें ॥ १३ ॥

**चित्तंजानीहि संसारं बंधं चित्तमुदाहृतं ॥**
**पादपः पवनेनैव देहश्चित्तेन चाल्यते ॥ १६ ॥**

सुखदुःखातें होय मानितें ॥ ह्मणोनी मन ऐसें बोलिजे यातें ॥ आणि पावतसे चळनातें ॥ ह्मणोनि चित्त हें दुसरें नाम ॥ १४ ॥ अतएव चित्त आणि मन ॥ क्रियायोगें भासे भिन्न ॥ परंतु दोन्ही नामें मिळून ॥ येकचि वस्तुचाठाई ॥ १५ ॥ असा चित्त हें मनाचें अभिधान ॥ त्या चित्तापासाव संसार जाण ॥ आणि चित्त तेंचि बोलिजे बंधन ॥ निश्चयेंसी श्रीरामा ॥ १६ ॥ निजकल्पनें आपुल्या भावीं ॥ मोक्षासहि कळंक लावी ॥ यालागीं सर्वथा जाणावी ॥ बंधरूप हे चित्तवृत्ति ॥ १७ ॥ चित्तेंकरूनी संसारभान ॥ हें बोलावया हेंचि कारण ॥ जे देहचतुष्टयाचें चळण ॥ होय चित्ताचेनी योगें ॥ १८ ॥ ब्रह्माहमस्मि स्फूर्ति ॥ महाकारण देहीं जियेची स्थिति ॥ तीतेंहि व्यापिलें चित्तवृत्तिं ॥ स्वसामर्थ्यें करुनी ॥ १९ ॥ एवं न सोडि स्फुरणातें ॥ म्हणोनि चाळक चतुर्विध देहातें ॥ हें चित्त जैसा वृक्षातें ॥ पवन चळे निजरूपें ॥ २० ॥ तस्मात् चित्त देहाचें चाळक ॥ म्हणोनि संसार तन्मूळक ॥ आणि बद्ध तोहि ये तद्रूपक ॥ मानी सम्यक् निश्चय हा ॥ २१ ॥ येथ आशंका ऐसी ॥

ह्मणी तूं श्रीरामा घेसी ॥ चित्त नसोडी स्फुरणासी ॥ तरी जिंकावयासी कोण दुसरें ॥ २२ ॥ तरी ये भावनेचें कोण कारण ॥ येथें जिंकिलें पाहिजे मननेंची मन ॥ हेंचि पुढें निरूपण ॥ सदृष्टांत अवधारीं ॥ २३ ॥

**हस्तौ हस्तेन संपीड्य दंतैर्दंतान्प्रपीड्य च ॥**
**अंगैरंगं समाक्रम्य जयेदादौ स्वकं मनः ॥ १७ ॥**

जैसे हस्तें हस्त चुरिजेति ॥ दंतींच दंत खायिजेति ॥ अंगेंचि करुनि आक्रमिजेति ॥ स्वशरीराचि आंगें ॥ २४ ॥ कीं गजेंचि गज पांगिडि पडे ॥ तसा मनेंचि मनाचा जय घडे ॥ सद्रुत्क्रम्य वर्म हें पुढें ॥ कळतां कुवाडं वहिर्मुखा ॥ २५ ॥ एवं मनोजयाची नास्ती ॥ न भावि सर्वथा रघुपति ॥ याचि येणेंचि जय प्राप्ति ॥ पूर्वोक्त दृष्टांतप्रमाणें ॥ २६ ॥ ह्मणोनि आपुलेनि मननें आपुलें मन ॥ आधिं जिंकावें हेंचि साधन ॥ आणि जो जिंकूं नशके तो अतिहीन ॥ येअर्थी पुढिल श्लोक ॥ २७ ॥

**चित्तमेकं न शक्नोति जेतुं स्वातंत्र्यवर्जितः ॥**
**ध्यानवार्ता वहन्मूढः स किं लोके न लज्जते ॥ १८ ॥**

आणि मनाचें केलें नकरि ॥ तो स्वतंत्र पुरुष निर्धारि ॥ आणि मनाचें केलें करि ॥ तो स्वातंत्र्यें वर्जित ॥ २८ ॥ आपुलेनि तंत्रें वर्ते ॥ तो स्वतंत्र जाण निरुतें आपण ह्मणिजे मनातें ॥

सर्वथा ॥ ४९ ॥ नसतां मनोजयाची स्थिति ॥ उटाळी अथवा वांती पोती ॥ लाल विका दुघट अंतीं ॥ अनुष्ठिती तरी वृथा ॥ ॥ १५० ॥ आत्मज्ञानें न जिंकितां मन ॥ केलें वेदांतपठण ॥ अनेकधा शास्त्रश्रवण ॥ तरी वृथाची सर्वथा ॥ ५१ ॥ अंतरीं मनोजयेंविण ॥ होय सिद्धींचें संपादन ॥ अतींद्रियद्रष्टृत्वाचें ज्ञान ॥ तें जाण वृथाची पें ॥ ५२ ॥ अंतरीं नसतां लया मना ॥ उगाची आळापिली पवना ॥ तरी केलें कलावचना ॥ तरी वृथाची सर्वथा ॥ ५३ ॥ जिंकिलें नसतां मन ॥ गोड जरी बोले ब्रह्मज्ञान ॥ करी मान्य महानुभावपण ॥ मिरवी तरी तें वृथाची पें ॥ ५४ ॥ तस्मात् मनोजयाविण केवळ ॥ बाह्य साधन तें विफळ ॥ हें वाक्य अति अमळ ॥ सत्य मानीं त्रिवाचा ॥ ५५ ॥ त्या मनोजयाचें रूप केलें ॥ उपायी तरी या मागां केलें ऐसें ॥ अंतरिंचेनी प्रेम उल्लासें ॥ वसिष्ठ म्हणे श्रीरामा ॥ ५६ ॥

# अनुद्योगाश्रयान्मूलं पुण्यौघाच्च निवर्त्तते ॥ जातो मनोजयो यस्य त्रैलोक्यविजयस्तृणं ॥२०॥

अनुद्योग म्हणजे दृष्टोपशमन ॥ तदाश्रयें मुख्य द्रष्टृपण ॥ येणें मुळें रचलें मन ॥ त्याची निवृत्ती प्रकार ॥ ५७ ॥ गुरुकृपेण होतां सिद्ध साधन ॥ योजे मुख्यत्वें दृष्टोपशमन ॥ तेणें दृष्टोपशमनें करून ॥ होय मनाची निवृत्ती ॥ ५८ ॥ सावलंब दृष्टा कानना ऐकिजे ॥ निरावलंब त्याहूनी नेणिजे ॥ मुख्य द्रष्टृत्व

अनुभविजे ॥ संधिचेनी संयोगें ॥ ५९ ॥ सतत संधिचें जाहालिया साधन ॥ यांजे सहज दृश्यपण ॥ मग दृष्टोपशमनें मुरोन ॥ पाहातां होय आश्चर्य ॥ १६० ॥ मन पूर्वी नव्हतें आतां नाहीं ॥ पुढें सहसा नव्हेल कांहीं ॥ ऐसी मनोवृत्ती पाहीं ॥ होउनी ठाके चमत्कार ॥ ६१ ॥ त्यावरु ऐसें असे ह्मणूनी ॥ व्यर्थत्व आलें बहिरंग साधनीं ॥ तस्मात् अनुयोगें करूनी ॥ मनोवृत्ती साचार ॥ ॥ ६२ ॥ ज्याचेनी पुरे त्रिभुवन ॥ तें जेणें पुरुषें जिंकिलें मन ॥ त्यासी त्रैलोक्यविजय भासे तृण ॥ अपूर्व कोण येअर्थी ॥ ६३ ॥ ह्मणोनि मनोजय ज्या पुरुषासी ॥ तो विजयी रणीं निश्चयेंसी ॥ त्रैलोक्य भासे तृणवत त्यासी ॥ येथें आश्चर्य कोण सांगों ॥ ६४ ॥ हे मनोजयसिद्धि पावावयासी ॥ स्थूळ उपाव कोण ह्मणसी ॥ तरी गा श्रीरामा परियेसीं ॥ पुढिले श्लोकीं सादर ॥ ६५ ॥

सत्संगो वासनात्यागोऽध्यात्मविद्याविचारणा ॥
प्राणस्पंदनिरोधश्चेत्युपायाश्चेतसो जये ॥ २१ ॥

जयाचिये कृपादृष्टीं ॥ जीवन्मुक्त होय सृष्टी ॥ ज्ञान विज्ञानासी होय पुष्टी ॥ ज्याचेनि स्मरणमात्रें ॥ ६६ ॥ अगाध ज्याचा दर्शनमहिमा ॥ बोलों न शके विष्णु ब्रह्मा ॥ स्पर्शुनि माहात्म्या शिवोपमा ॥ निगमागमा केलिया न वचे ॥ ६७ ॥ जयाचे अनुवचनें ॥ करि काशी आदि तीर्थ पावन ॥ आश्रयूनि जयाचे चरण ॥ समाधी गेहे सर्वदा ॥ ६८ ॥ त्या पुरुषाचा संग साचा ॥

दारवंटा निजमोक्षाचा ॥ तो येक उपाव मनोजयाचा ॥ जाण त्रिवाचा श्रीरामा ॥ ६९ ॥ जे विषयानुजु धांवतसे ॥ जे स्वरूप सुखा आवड वसे ॥ जिणें रूप केलें जीवदशे ॥ केलें पिसें ब्रह्मादिकां ॥ १०० ॥ अनिवार बळ प्रभाव जिचा ॥ त्याग करणें तैं वासनेचा ॥ हा दुसरा उपाव मनोजयाचा ॥ जाण त्रिवाचा श्रीरामा ॥ ७१ ॥ गुणसमूह अधिदैवत ॥ आत्मयासी अधिकारुनी वर्त्तत ॥ तेंचि अध्यात्म निश्चित ॥ हें वेदांत प्रतिपादी ॥ ॥ ७२ ॥ जें वेदांत केलें प्रतिपादन ॥ तें जें अध्यात्म परिनिष्ठीत जाण ॥ त्याचि आत्मज्ञानें करून ॥ विचारें अनुष्ठिलें पाहिजे ॥ ॥ ७३ ॥ एवं सत्संग वासनात्याग साचा ॥ जो विचार आत्मज्ञानाचा ॥ तो तिसरा उपाव मनोजयाचा ॥ जाण त्रिवाचा श्रीरामा ॥ ७४ ॥ प्राणाचें जें सदन ॥ तेणें मनासी मनपण ॥ ह्मणउनि प्राण निरोधन ॥ अनुष्ठिलें पाहिजे ॥ ७५ ॥ निजालुनी विषयभोगु ॥ वासना त्यागुनी पावे नगु ॥ मग आनंदभोगु ॥ चिदंबरीं राखणें ॥ ७६ ॥ जैसा केतु लाभे सद्गुरुमुखींचा ॥ तयापरी निरोध होय प्राणाचा ॥ हा चौथा उपाव मनोजयाचा ॥ जाण त्रिवाचा श्रीरामा ॥ ७७ ॥ सत्संगें वासनात्यागु घडे ॥ वासनात्यागें अध्यात्मविचार घडे ॥ अध्यात्मविचारें जोडे ॥ निरोध पुढें प्राणाचा ॥ ७८ ॥ असा स्थूळोपाय चतुर्विध जरी ॥ मनोजयालागीं निर्धारी ॥ हा पाववी बरवेपरी ॥ सूक्ष्मोपाय पर्यंत ॥

॥ ७९ ॥ मग सूक्ष्मोपाय करूनि मन ॥ पावतें होय दृष्टोपशमन ॥ तेथिंचें लक्षण ॥ करीं श्रवण श्रीरामा ॥ १८० ॥

पूर्णे मनसि संपूर्णं जगत्सर्वं सुधाद्रवम् ॥
अपान द्दढपादस्य ननु चर्मास्तुवीभंगु ॥ २२ ॥

दृष्टोपशमनें पूर्ण मन ॥ त्या पूर्णमनाच्याठाईं जाण ॥ समस्त जग होय पूर्ण ॥ सुधाद्रवेंकरूनी ॥ ८१ ॥ पूर्णचंद्राची पूर्णस्थिति ॥ ते आनंद सुधा होय द्रवति ॥ ते सुखसुधाद्रव निश्चिती ॥ सकळ जग करिती सुख पूर्ण ॥ ८२ ॥ एवं संपूर्ण मनची वोतिलें ॥ तें हें जगद्रूप पें आलें ॥ तैसें पूर्णत्वा जगद्घोलिलें ॥ तेंसेंचि आलें जग हें वाचें ॥ ८३ ॥ वस्तुता जन मन दोनि नाहीं ॥ बुडालीं पूर्णत्वाच्या डोहीं ॥ पूर्णें पूर्ण अखंड पाहीं ॥ जनें आणि मनेंसी ॥ ८४ ॥ अंतरीं सूक्ष्मोपायेंकरून ॥ जोडे मनोजय समाधान ॥ तरी बहिरंग जड साधन ॥ कवणा कायी अनुग्रावें ॥ ८५ ॥ पृथ्वीवरी चर्मास्तरण ॥ करूनी घालणें आसन ॥ अपानीं पाठी देउन ॥ चालावें मनचक्रभेदें ॥ ८६ ॥ हा हटयोग गा रघुनाथा ॥ येथें बोलोंचि नये सर्वथा ॥ येणें कायाक्लेशची अन्यथा ॥ मनोजयकथा बोलोंची नये ॥ ८७ ॥ कां जे मन असे संकल्पाकार ॥ ह्मणोनि स्पर्शे बाह्याचार ॥ याच संकल्पें बंध मोक्ष प्रकार ॥ येचि अर्थी पुढिल श्लोक ॥ ८८ ॥

**नाहंब्रह्मेति संकल्पात्सुदृढं बध्यते मनः ॥**
**सर्वं ब्रह्मेति संकल्पात्सुदृढं मुच्यते मनः ॥ २३ ॥**

नाहंब्रह्म संकल्पेंकरून ॥ मनासी दृढ होय बंधन ॥ मनाचें जें मनपण ॥ नयाचेनि अंगें ॥ ८९ ॥ जैसें बाबुळीरूपें उदक ॥ होय आपणा आपण छादक ॥ तैसें मनासी मन बंधकारक ॥ नाहंब्रह्मसंकल्पें ॥ ९० ॥ जैसें आपणा आपण नयन ॥ पडळरूपें होती आच्छादन ॥ तैसें मनें मना केलें बंधन ॥ नाहंब्रह्मसंकल्परूपें ॥ ९१ ॥ जैसी उरगरूपें रज्जुक ॥ होय आपणा आपण लोपक ॥ तैसें मन होय मनासी बाधक ॥ नाहं ब्रह्मसंकल्परूपें ॥ ९२ ॥ आणि सर्व ब्रह्माकारें स्फुरी ॥ तोचि संकल्प सुदृढी धरी ॥ तेणें सुदृढ संकल्पें जगीं ॥ मन पावे मोक्षातें ॥ ९३ ॥ आपुलें प्रकाशें आपणा आपण ॥ जैसें प्रकाश होति नयन ॥ मुक्त करी मनासि मन ॥ सर्व ब्रह्म संकल्परूपें ॥ ९४ ॥ आपुलेंनि रूपें रज्जु जैसी ॥ दाविती होय आपणासि ॥ तैसें मन मुक्त करी मनासि ॥ सर्व ब्रह्म संकल्परूपें ॥ ९५ ॥ तस्मात् इदं मिथ्या हेंचि जाण ॥ नाहंब्रह्मसंकल्परूपें मनासि बंधन ॥ आणि सर्व ब्रह्मसंकल्पेंकरून ॥ मुक्त होय मन सर्वात्मना ॥ ९६ ॥ उभय संकल्प गा रघुपति ॥ निश्चयें मनाचीच व्यक्ति ॥ ह्मणोनि मनाचि मनाप्रति ॥ बंधमोक्षासि कारण ॥ ९७ ॥ एवं मन मनपणासि मुकलें ॥ त्याचेनि नाम मुक्तत्वा

आलें ॥ असो मनोजया नंतर कैसें जाहलें ॥ तें एक पुढिलें श्लोकीं ॥ ९८ ॥

चित्ते त्यक्ते लयं याति द्वैतमैक्यं च सर्वतः ॥
शिष्यते च परं ब्रह्म शांतं नित्यमनामयं ॥ २४ ॥

स्वरूपींहुनि प्रपंच वेगळावला ॥ तो द्वैतभाव पैं बोलिला ॥ आणि तोचि प्रपंचु स्वरूपीं आटला ॥ त्याचें नाव ऐक्य भावो ॥ ॥ ९९ ॥ यथार्थ करितां विचारु ॥ मुळी वेगळावलाचि नाहीं संसारु ॥ जसा कनका पासूनि अलंकारु ॥ परि कनकातें सोडू नेणे ॥ २०० ॥ कीं जळापासूनि तरंग दिसे ॥ परि जळातें सोडुनि कांहिं नसे ॥ स्वरूपींहुनि प्रपंचभान तसें ॥ परंतु नसे वेगळावलें ॥ १ ॥ येणें विचारें रघुपति ॥ द्वैताचा अभाव निश्चिति ॥ आतां ऐक्यभावाची उपपत्ति ॥ यथा निगुति सांगिजेल ॥ २ ॥ जसें घटाकाश महदाकाशा ॥ भेटलें हा शब्दचि नघडे सहसा ॥ स्वरूपीं प्रपंचभागु तसा ॥ मिळाला हें बोलोंचि नये ॥ ३ ॥ उपक्रम नाहीं वेगळावला ॥ तो उपसंहार केविं ह्मणों मिळाला ॥ असा या उपपत्तिला बाव जाहला ॥ ऐक्यभावहि सर्वथा ॥ ४ ॥ यापरि ऐक्य आणि द्वैतभान ॥ चित्तवृत्तीचेनि भासमान ॥ याल्हागीं मनो जनित जाण ॥ द्वंद्वभाव बोलिजे ॥ ५ ॥ तें मन आलिया उपशांतिनें ॥ ऐक्य आणि द्वैत पावे लयातें ॥ कार्येंसि कारण निरुतें ॥ येकचि समयें नाश पावे ॥ ६ ॥

मानस असतां त्यक्त ॥ आटलें द्वैताद्वैत ॥ मग उरे सर्वत्र निश्चित ॥ परब्रह्म निर्वाण ॥ ७ ॥ जें सर्व स्फुरणातीत ॥ विवर्ताभावें ह्मणोनि शांत ॥ येणेंचि स्वभावें सदोदित ॥ यालागीं नित्य बोलिजे ॥ ८ ॥ अनामय जो निर्देशु त्यासि नातुडे ॥ ह्मणोनि तें जाण अनामय फुडें ॥ असो मनोलयानंतर उघडें ॥ एवंविध स्वरूपभावें ॥ ९ ॥ असो हें बोलिलें स्वरूप निर्याण ॥ आतां स्वरूपनिर्याणाचें करूं निरूपण ॥ ज्याचें उपशमांतें पावलें मन ॥ द्वैताद्वैतरहित ॥ ११० ॥

# चिन्मात्रत्वं प्रयातश्च तीर्णो मर्त्यो सचेतसः ॥ यो भवेत्परमानंदः केनासावुपमीयते ॥ २५ ॥

सचेतसः म्हणिजे विवेकि नरू ॥ विवेकें तरला मोह-सागरु ॥ तरोनि पावला पैल पारु ॥ जें शुद्ध चिन्मात्रत्व ॥ ॥ ११ ॥ चिन्मात्रत्व पाउनि स्वयें ॥ जो परमानंद होउनि ठाय ॥ तो ह्मा उपमाकोणाची नोहे ॥ अद्वितीय ह्मणोनी ॥ ॥ १२ ॥ असो तोचि परमानंद पूर्ण ॥ बोल सांडता अंतरींहुन ॥ स्वयें कृतार्थ होऊन ॥ होय आणिका उपकारी ॥ १३ ॥ चिन्मात्र व्हावया प्राप्त ॥ जो नरु प्रवर्तला सचित्त ॥ त्यासी उपकार करी निश्चित ॥ तो निर्वाणस्वरूपानुभवी ॥ १४ ॥ आपण तारूं होऊनी परियेसा ॥ कासे लाउनियां जीवांसी ॥ मग दाखवी वेगेंसी ॥ भवाब्धिचा पैलपारु ॥ १५ ॥ चिद्रूप

चिद्वान निरसलें ॥ निरसोनी चिन्मात्रची उरलें ॥ तें जाण श्रीरामा भलें ॥ भवाब्धिचें पैलतीर ॥ १६ ॥ त्या पैलतीराची प्राप्ति वरवी ॥ कारितां स्वरूपानुभवी ॥ तस्मात् स्वात्मपदीं वैसवी ॥ चित्त चोरोनि तयाचें ॥ १७ ॥ येकु तो आणि येकु आपण ॥ हें नुरवीच भेदाचें लक्षण ॥ धन्य तयाचें उदारपण ॥ जेणें बोलिलें आपणा शिष्यातें ॥ १८ ॥ तेव्हां गुरुशिष्य भेद नकळे ॥ उंच निंच भागु नाढळे ॥ दीपें दीप जैसा उजळे ॥ तें काय कळे तारतम्य तेथ ॥ १९ ॥ ऐसा आत्माराम कृपामूर्ती ॥ जो परमानंद स्वपतीती ॥ आत्मोपम करी त्रिजगती ॥ येवढी ख्याती तयाची ॥२०॥ कल्पतरु कल्पनेचा दाता ॥ परिस धातूतें सुवर्णत्व देता ॥ परि आपणाची सारिखे हे उभयतां ॥ करूं न शकती निर्धारें ॥ २१ ॥ तैसा नव्हे हा सद्गुरु परियेसा ॥ आपणाची सारिखें करी शिष्यासी ॥ एवं त्याचिया औदार्यासी ॥ कवण करील मर्यादा ॥२२॥ त्यासि उपमा देऊं जातां ॥ उपमा न दिसे तत्वतां ॥ कां जे तयाची परिपूर्णता ॥ सर्वत्र असे ह्मणोनि ॥२३॥ त्याची उपमा देणें त्यासी ॥ हे तव नये प्रमाणासी ॥ असे निरुपम ऐसी ॥ तेचि परम मर्यादा ॥२४॥ मन आलें असे उपशमा ॥ ह्मणोनि अनिर्वाच्य त्याचा महिमा ॥ वसिष्ठ ह्मणे गा श्रीरामा ॥ येथूनि संपलें प्रकरण ॥२५॥ आतां विचार करूनि पुरें ॥ वासना उपशमद्वारें ॥ निरूपिजेल मनोजय वारें ॥ मागुता पुढिले प्रकरणीं ॥२६॥

तो निरूपणार्थ अति चांगु ॥ गमे तुरीयपदाचा परागु ॥ सेवीं श्रवणघ्राणें तूं सारंगु ॥ शरयू तीरस्थ पुरपती ॥ २७॥ ऐसें वासिष्ठ महामती ॥ बोले श्रीरघुनाथा प्रती ॥ नाना तेणें मिसें आल्या व्यक्ति ॥ निजसुखस्वाद अति सरस ॥ २८ ॥ एवं श्रीरामचंद्र जाण ॥ जें योगियाचें विश्रांतिस्थान ॥ परम कल्याणैकनिधान ॥ समाधान समाधीचें ॥ २९ ॥ ज्या लागीं प्रवर्तलें ज्ञान ॥ ज्याची उत्कंठता वाहे ध्यान ॥ तो मूर्तिमंत करी निजभाग्यें श्रवण ॥ करूनी कान सर्वेंद्रियांचे ॥ २३० ॥ माधवदास श्रीनारायणाचा ॥ संतां प्रार्थितसे नम्रवाचा ॥ पुढां पांचवे प्रकरणांचा ॥ अभिप्राय परिसावा ॥ २३१ ॥ इति श्रीयोगवासिष्ठसारे माधवदासकृतटीकायां मनोलयप्रकरणं चतुर्थं संपूर्णम् ॥ ४ ॥ श्लोक ॥ २० ॥ टीका ॥ २३१ ॥ एवं संख्या ओव्या ॥ २०६ ॥

---

श्रीगणेशाय नमः ॥ मुराडि धरावया मन ॥ विचारची मुख्य कारण ॥ पुढिले श्लोकीं निरूपण ॥ हेंचि आतां निरूपिजेल॥१॥

**राम स्वात्मविचारोऽयं कोऽहं स्यामितिरूपकः॥ चित्तदुर्द्रुमबीजस्य दहने दहनः स्मृतः ॥ १ ॥**

अनुलक्षितो आत्मयासी ॥ तो हा स्वात्मविचार परियेसीं ॥ याचें रूप कैसें ह्मणसी ॥ तरी सांगों विशद आतां ॥ २ ॥ ये

पांचभौतिकीं जाण ॥ उठे जेथुनी मी माझेपण ॥ तो मी कवणाचा आहे कवण ॥ हाचि करणें विचार ॥ ३ ॥ मी कोण ऐसें विचारितां ॥ माझेपणची दिसतसे तत्वतां ॥ एवं देहाश्रयें अवलोकितां ॥ मी सर्वथा नाढळे ॥ ४ ॥ मीपण जरी कोठें नातळे ॥ तरी मी कोणाचा हें कैसें कळे ॥ ज्याचा ह्मणं पाहें तें आलें ॥ माझेपणाची माझारी ॥ ५ ॥ एवं मीपण कांहीं नानुडे ॥ माझेपणची दिसे पुढें ॥ तेही माझेपण वाडकोडें ॥ कोणियेके विचारें आतां ॥ ६ ॥ देह तरी पंचभूतांचा ॥ तद्रूप समूह इंद्रियांचा ॥ ह्मणोनि माझें नव्हे विचाचा ॥ इंद्रियांसी शरीर ॥ ७ ॥ आतां जरी ह्मणों माझा प्राण ॥ तरी तो व्योमा पासुनी उत्पन्न ॥ यालागि तो व्योमाचाची जाण ॥ माझा हें सहसा ह्मणों नये ॥ ॥ ८ ॥ आतां मनातें ह्मणों माझें कळे ॥ तरी तें प्रकृतिपुरुषापासुनी झालें ॥ म्हणोनि माझें मन येणें बोलें ॥ कांहीं कारण न दिसे ॥ ९ ॥ जैसें कोठें नाढळेचा मीपण ॥ तैसेंचि वाव झालें माझें मन ॥ एवं आपुला जो विचार तेणेंकरून ॥ मी माझें होय देशधडी ॥ १० ॥ चित्त हाची वृक्षपं साचे ॥ दृष्ट म्हणिजे छेदिला न वेचे ॥ तया चित्तद्रुमाचें ॥ बीज जें मीमाझेंपण ॥ ॥ ११ ॥ स्वात्मविचार करून ॥ या बीजाचें होय दहन ॥ बीजनाशें सहज छेदन ॥ होय चित्त द्रुमाचें ॥ १२ ॥ तस्मात् आत्मविचाराचिये परवडी ॥ मी माझेपण होय देशधडी ॥ मी

माझें नसतां होय मुरडी ॥ मनपणापासुनी मनाची ॥ १३ ॥ शरीरावेगळा प्राण जैसा ॥ असे हें बोलोंचि नये सहसा ॥ मनाचा ठाव पुसे तैसा ॥ मी माझेपण निरसिल्या ॥ १४ ॥ एवं मी कोण एतद्रूपें करूनी ॥ श्रीरामा हा स्वात्मविचाराग्नी ॥ चित्त दुर्द्रुमबीज दहनी ॥ बोलिजे पूर्वोक्त प्रकारें ॥ १५ अधोभाग निरसे मनवियोगीं ॥ मग स्वरूप निश्चयालागीं ॥ एक बुद्धि उरे ऊर्ध्वभागीं ॥ हेंचि पुढें निरूपण ॥ १६ ॥

**विचारदर्पणे लग्नां धियं धैर्यधुरं गतां ॥**
**आधयो न विलुंपंति वाताश्चित्रलतामिव ॥ २ ॥**

आत्मविचाराच्या अंतीं ॥ जे स्वरूप निश्चयात्मक सद्युक्ति ॥ तेचि जाण बुद्धीची व्यक्ति ॥ परि मनाचे पंक्ति न बैसे ॥ १७॥ ते विचारदर्पणाची किळ ॥ तीमाजी बिंब स्वरूप अमळ ॥ धैर्याधिष्ठान अढळ ॥ स्वयें होउनी असे ॥ १८ ॥ देहेंद्रियप्राण-मनोजनित ॥ ऊर्मि पावलिया नव्हे चलित ॥ चळणमस्तकीं ते नादत ॥ न ये निश्चित अधोभागा ॥ १९ ॥ जे उल्लेख पावे अंतरीं ॥ त्याचा स्वरूपनिश्चयाभासु करि ॥ सर्वथा न ये-इंद्रियांवरि ॥ असे ये अर्थीं दृष्टांत ॥ २० ॥ जैसी चित्रीं लिहिली जे लता ॥ ते वायूचेनि चळों नेणे तत्वतां ॥ तैसा अंतरीं उल्लेख उपजतां ॥ सद्युक्ति सर्वथा ढळों नेणे ॥ २१ ॥ एवं अंतरोल्लेखें कदा न चळे ॥ बाह्ययोगें धावे ततोपि नढळे ॥

शरीर आप्लवो प्रळयजळें ॥ अथवा वरी पडो आकाश ॥ २२ ॥ कोणि करवत घेऊनि माथांवाल्ठु ॥ कोणि अग्नित टाकुनि देह जाल्ठु ॥ परंतु चळण विटाळु ॥ नलगे तयें सद्युक्तितें ॥ २३ ॥ येवोंचि नेणे अधोभागासि ॥ ते द्वंद्वें करूनि चळेल कैसी ॥ जे निजात्मविचारेंसि ॥ संलग्न असे अखंड ॥ २४ ॥ राज पत्नीसि भिक्षेचे डोहळे ॥ नुठति जैसे कोणि काळें ॥ तैसी ऊर्ध्वभागा पासूनि नचळे ॥ विचारवध्र सद्युक्ति ॥ २५ ॥ रविबिंबाची प्रभा जैसी ॥ भेटि न घे अंधकारेंसि ॥ अधो भागासि नये तैसि ॥ विचारवधू सद्युक्ति ॥ २६ ॥ तस्मात् स्वरूपनिष्ठिक जें केवळ ॥ ते बुद्धि सर्वात्मना अचळ ॥ शोभाय-मान अत्यंत अमळ ॥ विचारचेनि आंगें पै ॥ २७ ॥ एवं सद्युक्ति अंगविचाराचि ॥ आतां विचारअंग कवणाचें ॥ ह्मणसि तरि ऐक साचें ॥ पुढिलें श्लोकीचें निरूपणीं ॥ २८ ॥

## विचारोऽध्यात्मविज्ञानाज्ज्ञानं तत्वविदो विदुः ॥
## ज्ञेयं तस्यांतरे चास्ति माधुर्यं पयसो यथा ॥ ३ ॥

आत्मा जेथ अधिकृत ॥ त्या अध्यात्मविद्या निश्चित ॥ त्यापासूनि जो विवेक उपजत ॥ तोचि अध्यात्मविचारु ॥ २९ ॥ त्यालागीं विचाराचें अंग निश्चिति ॥ अध्यात्मविद्या बोलिजेति ॥ जो अध्यात्मविचार यातेंच जाणति ॥ ज्ञान ऐसें तत्ववेत्ते ॥ ३० ॥ एवं ज्ञान आणि अध्यात्मविचारु ॥ येकरूपाचि हा निर्धारु ॥

परि अभिनव येथिंचा प्रकारु ॥ ज्ञानाचे पोटीं ज्ञेय असे ॥ ३१ ॥ दुग्धामाझारिल माधुरि ॥ असे गूढत्वें जयेपरि ॥ तैसें ज्ञानाच्या उदारिं ॥ ज्ञेय असे वर्तमान ॥ ३२ ॥ ज्ञान ज्ञेयालागिं प्रसवलें ॥ तंव ज्ञेय ज्ञानाचिया पोटा आलें ॥ मग ज्ञानहि ज्ञानपणा मुकलें ॥ ऐसें उरलें ज्ञान ज्ञेय ॥ ३३ ॥ एवं दृश्य द्रष्टा दर्शन ॥ मग ये त्रिपुटिचें येथें दहन ॥ जें पूर्वी केलें निरूपण ॥ मुळेंसि मन नाशिलें जेथ ॥ ३४ ॥

## विचारेण परिज्ञातस्वभावस्योदितात्मनः ॥
## अनुकंप्यां भवंत्यहो ब्रह्मविष्ण्वींद्रशंकराः ॥ ४ ॥

ऐसें अध्यात्मविचारें॥परि ज्ञान होतां निर्धारें॥ भान निरसोनि आत्मा उरे ॥ जो स्वभावें सदोदित ॥ ३५ ॥ द्रष्टत्व जरि निरसलें ॥ तरि दृश्यपणपण असे संचलें ॥ एवं सहज प्रकाशें विनुळलें ॥ संसारभान जें कांहीं ॥ ३६ ॥ येणें स्वभावें सदा उदित ॥ ह्मणोनि स्वभाव सदोदित ॥ सर्वांसि परि सर्वातीत ॥ व्यतिरेकें आणि अन्वयें ॥ ३७ ॥ ऐसें विचारकरूनि परिज्ञान ॥ स्वभावोदित आत्मा जो आपण॥ तो जगद्गुरु नारायण ॥ त्रिभुवनीं वंद्य निश्चयें ॥ ३८ ॥ ब्रह्मा विष्णु महेश्वर ॥ इंद्र मुख्य करूनि सुरवर ॥ त्यातें करिती नमस्कार ॥ होउनी किंकर शरण येती ॥ ३९ ॥ तो जगद्गुरु महाराज जरी ॥ त्या शरणागतावरी कृपा करी ॥ हात ठेवी मस्तकावरी ॥ येवढी थोरी तयाची ॥ ४० ॥ असो

परब्रह्म जो परिपूर्ण ॥ तो वर्णावा काय म्हणोन ॥ परंतु पावावया हें निर्वाण ॥ मुख्य कारण विचार ॥ ४१ ॥ विचारापासुनी येथवरी ॥ तो पावला कवणेपरी ॥ हें मागुतें श्रीरामा अवधारीं ॥ सांगिजेल पुढिले श्लोकीं ॥ ४२ ॥

**किमिदं विश्वमखिलं कः स्यामहमिति स्वयं ॥**
**विचारे निरतस्यैतदसदेवाभवज्जगत् ॥ ५ ॥**

हें विश्व तें काय समस्त ॥ मी तो देही कवण वर्तत ॥ ऐसा निश्चय जो विचारित ॥ जग हें असत्य होय त्यातें ॥ ४३ ॥ विचारें आपणातें पाहों जाय ॥ स्वयें अविनाश आपण आहे ॥ मग असद्रूप देखता होय ॥ जग हें चराचरात्मक ॥ ४४ ॥ एवं जग हें अवघें असत ॥ मी अविनाशी संत ॥ ऐसें देखतां उपजे निश्चीत ॥ सर्व ब्रह्म हे भावना ॥ ४५ ॥

**यस्य मौर्ख्यं क्षयं नीतं सर्वं ब्रह्मेति भावनात् ॥**
**नोदेति वासना तस्याज्ञस्येवांबुमतिर्मरौ ॥ ६ ॥**

सर्व ब्रह्मभावनेचेनि गुणें ॥ जरी सद्रूपविभाग देखणें ॥ भेददृष्टि जे ती तेचि म्हणणें ॥ मौर्ख्य ऐसें निर्धारें ॥ ४६ ॥ तरी सतासतभान जें भासलें ॥ तेथवरी मूर्खपणची पावलें ॥ असो तें मौर्ख्य क्षया नेलें ॥ सर्वत्र ब्रम्ह ऐसें भावलें ॥ ४७ ॥ एवं सर्वत्र ब्रम्हभावना भाविता ॥ ब्रम्ह सर्वत्र भासे तत्वतां ॥

याउपरी विषय हे वार्त्ता ॥ बोलोंचि नये सर्वात्मना ॥ ४८ ॥ लोपु जाहलीया विषयभाना ॥ कोठुनी उपजेल वासना ॥ सर्वाकारें रघुनंदना ॥ ब्रम्हचि पूर्ण कोंदाटलें ॥ ४९ ॥ तस्मात् सर्व ब्रम्ह भावनें करून ॥ ज्याचें नासलें मूर्खपण ॥ त्याच्याठाईं सर्वथा जाण ॥ वासना न पावे उदयातें ॥ ५० ॥ जैसा सूर्यकर तें जाणता ॥ तो जळीं जळबुद्धी नव्हे मानिता ॥ तैसा सर्व ब्रम्ह जो देखता ॥ विषयवासना नुपजे त्यातें ॥ ५१ ॥ एवं वासनेचेनि परित्यागें ॥ कैसी स्थिति निर्वाहो लागे ॥ ते एक कीं अवधान योगें ॥ पुढिले श्लोकीं रघूत्तमा ॥ ५२ ॥

**वासनासंपरित्यागाच्चित्तं गच्छत्यचित्ततां ॥**
**प्राणस्पंदनिरोधाच्च यथेच्छासि तथा कुरु ॥ ७ ॥**

वासनेचे परित्यागें ॥ आणि प्राणस्पंद निरोधयोगें ॥ प्राण-निरोध तोचि जो मागें ॥ पूर्व प्रकरणीं बोलिला ॥ ५३ ॥ चित्त पावे अचित्ततप्रती ॥ हेचि सांगों विषय पुढती ॥ पूर्वश्लोकार्थासी संगती ॥ लागुनिगुती बोलिजेल ॥ ५४ ॥ सर्वत्र ब्रम्हावभासीं ॥ वासना सहज पडे ग्रासीं ॥ वासनालयीं पवनासी ॥ स्थिरता वधू माळ घाली ॥ ५५ ॥ एवं वासनेचिये उपशांति ॥ आणि प्राण-निरोधाचिये प्राप्ती ॥ चित्त पावे अचित्ततेप्रती ॥ तोचि निश्चिती उपरमु ॥ ५६ ॥ सर्व ब्रम्हावभासु ॥ चित्तभाव येणेंचि रूपसु ॥ भासु सरे तेव्हां ग्रासु ॥ चित्तवृत्तीचा बोलिजे ॥ ५७ ॥ तस्मात्

नित्यविचारें ॥ मी ब्रह्म ऐसें कळे निर्धारें ॥ याउपरी विश्वाकारें ॥ ब्रह्मचा होय भावितां ॥ ५८ ॥ ब्रह्म भावितां विश्व नसे ॥ विश्वाभावें ब्रह्मची दिसे ॥ ब्रह्मावभासीं वासना ग्रासे ॥ वासनाग्रासीं नुरे भासु ॥५९॥ ब्रह्मभासु जेव्हां नुरे ॥ तेव्हाची चित्तवृत्ति ते विरे ॥ चित्तोपशमना नंतरे ॥ सहज स्थिति निर्वाण ॥ ६० ॥ सहज स्थिती बाणलियावरी ॥ श्रीरामा तूं अवधारीं ॥ होई लीलाविग्रह विहारी ॥ करूनि नकरी अवघे पणें ॥ ६१ ॥ करी इच्छेसारिखें अनुवर्तन ॥ म्हणोनी मुळीं बोलिलें वचन ॥ तरी त्याचे तात्पर्य हें चिजाण ॥ जें विहरण लीलाविग्रहें ॥ ६२ ॥ एवं मुळिंचनी विचारें केवळ ॥ पद पाविजे ऐसें अमळ ॥ त्या अध्यात्मविचाराचें मूळ ॥ सत्संग आणि सच्छास्त्र ॥ ६३ ॥

साधुसंगमसच्छास्त्रपरो भवसि राम चेत् ॥
तद्दिनैरेव नो मासैर्नाप्नोषि पदमाधिनां ॥ ८ ॥

जो संसारभ्रांतीचा निर्गमु ॥ जो स्वसुखानुभूतीचा आगमु ॥ तो साधुचा समागमु ॥ आणि आत्मप्रतिपादक सच्छास्त्र ॥६४॥ या उभयांठाई तत्परायण ॥ जरि तूं होसी श्रीराम पूर्ण ॥ तरी न लागे दिवस मास व्यवधान ॥ तेणेंचि दिवसें तत्काळ ॥६५॥ माया उल्लंघुनि विवर्तती ॥ जे उत्कृष्ट सद्युक्ती ॥ ते दाविती यथानीती ॥ न मनीं येअर्थी संदेहो ॥ ६६ ॥ जमानादिकाहुनबी

परती ॥ आणि आत्मरूपाहूनी अरूती ॥ सिद्धिसी असे वसती ॥ ह्मणोनि सद्युक्ती हें नाम ॥ ६७ ॥ तींप्रकारिंते सद्युक्ती ॥ करि वासनेची निवृत्ति ॥ हेची निरूपिजेल पुढती ॥ अगा रघुपती श्रवण करीं ॥ ६८ ॥

असंगव्यवहारित्वाभावभानाविवर्जितात् ॥
शरीरनाशदर्शित्वाद्वासना न प्रवर्तते ॥ १ ॥

देहेंद्रियमनादि व्यवहारीं ॥ वर्तोनी तयाचा संग न धरी ॥ तें श्रीरामा जाण निर्धारी ॥ असंगव्यवहारित्व पें ॥ ६९ ॥ ते असंगव्यवहारित्वविचारणा ॥ करितां नाश होय मी माझेंपणा ॥ येणें सहजचि नुपजे वासना ॥ हा एक प्रकार सद्युक्तीचा ॥७० जे भावने भवभासु ॥ भावने मूळ प्रकाशु ॥ येणें विचारें नाशु ॥ या जे भवभावनेचा ॥ ७१ ॥ जैसें मृगजळाचें मूळ ॥ पाहतां देखिजे रविमंडळ ॥ मग तें सूर्य दृष्टिमृगजळ ॥ नाहिं होय सर्वथा ॥ ७२ ॥ तैसें मूळ प्रकाशदृष्टीकरून ॥ होय भवभानाचें वर्जन ॥ तेणें वासनोदय नव्हे जाण ॥ हा दुसरा प्रकार सद्युक्तीचा ॥७३॥ पृथगभूतें महाभूतें मेळवावीं ॥ ते अनुक्रमेंची लय पावावीं ॥ मग सद्वस्तूचा निजभावी ॥ शरीरनाशें अनुगमे ॥ ७४ ॥ एवं शरीर नाश दर्शनें ॥ विषय ऐसें कवण ह्मणे ॥ विषय नसतां वासने ॥ उरी कैसी विचारीं पां ॥ ७५ ॥ हा तिसरा विचारु सीतापती ॥ निरूपिला तुजप्रति ॥ इहिं प्रकारिं सद्युक्ती ॥ करीं निवृत्ति वा-

सनेची ॥ ७६ ॥ श्रीरामचंद्रा परियेसी ॥ तूं आशंका श्रवणीं येथ घेसी ॥ जे असंतशरिराच्या नाशीं ॥ सद्वस्तु काय नासे ॥ ७७ ॥ संतें असंतासि चळण ॥ आणि असंतें संति संतपण ॥ येणें परस्परयोगें संतपण ॥ असंत संगे कां नघडे ॥ ७८ ॥ या अभिप्रायें रघुकुळटिळका ॥ जरी तुज उपजेल आशंका ॥ तरि आकर्णि विचारु नेटका ॥ निरुपिजेल पुढिले श्लोकीं ॥ ७९ ॥

**दृढदेहानुसंधानाद्विमूढ्यंनहि राघव ॥**
**विषं न यात्यमृततताममृतं विषतामिव ॥ १० ॥**

दृढ देहानुसंधानें ॥ जरी असेल विमूढपणें ॥ तरि देहाचेनि नाशनें ॥ नाशा नेणे सद्वस्तु ॥ ८० ॥ अलंकाराचेनि कांचन ॥ कांचनाचेनि अलंकारपण ॥ परि अलंकारनाशें करून ॥ सुवर्ण नाश बोलों नये ॥ ८१ ॥ घटाचेनि रूप मृत्तिकेसी ॥ आणि मृत्तिकेचेनि रूप घटासी ॥ परंतु घटनाशें नाशासी ॥ नये निश्चयेसी मृत्तिका ॥ ८२ ॥ तैसी असंताचेनी संतप्रवृत्ति ॥ आणि संताचेनी असंत आले व्यक्ति ॥ परंतु असंतलयें संतास्थिति ॥ नये नाशासी सर्वथा ॥ ८३ ॥ योग तरि असे संतासंतां ॥ परी स्वगुण न टाकिती उभयतां ॥ असंत न पावे संतता ॥ संत नव्हे असंत ॥ ८४ ॥ संतीं असंतभाव भावितां ॥ असंतपण नये संता ॥ आणि असंतीं संतभाव लावितां ॥ असंत नव्हे संत पै ॥ ८५ ॥ जसी विषाच्या ठांई अमृतभावना ॥ करितां

पस्ती ॥ आणि आत्मरूपाहूनी अरुती ॥ सिद्धिसी असे वसती ॥ ह्मणोनि सद्युक्ती हें नाम ॥ ६७ ॥ तींप्रकारिंते सद्युक्ती ॥ करि वासनेची निवृत्ति ॥ हेची निरूपिजेल पुढती ॥ अगा रघुपती श्रवण करीं ॥ ६८ ॥

**असंगव्यवहारित्वाभावभानाविवर्जितात् ॥**
**शरीरनाशदर्शित्वाद्वासना न प्रवर्तते ॥ ९ ॥**

देहेंद्रियमनादि व्यवहारीं ॥ वर्तोनी तयाचा संग न धरी ॥ तें श्रीरामा जाण निर्धारी ॥ असंगव्यवहारित्व पें ॥ ६९ ॥ ते असंगव्यवहारित्वविचारणा ॥ करितां नाश होय मी माझेंपणा ॥ येणें सहजचि नुपजे वासना ॥ हा एक प्रकार सद्युक्तीचा ॥७० जे भावने भवभासु ॥ भावनें मूळ प्रकाशु ॥ येणें विचारें नाशु ॥ या जे भवभावनेचा ॥ ७१ ॥ जैसें मृगजळाचें मूळ ॥ पाहतां देखिजे रविमंडळ ॥ मग तें सूर्य दृष्टिमृगजळ ॥ नाहिं होय सर्वथा ॥ ७२ ॥ तैसें मूळ प्रकाशदृष्टीकरून ॥ होय भवभानाचें वर्जन ॥ तेणें वासनोदय नव्हे जाण ॥ हा दुसरा प्रकार सद्युक्तीचा ॥७३॥ पृथग्भूतें महाभूतें मेळवावीं ॥ ते अनुक्रमेंची लय पावावीं ॥ मग सद्वस्तूचा निजभावीं ॥ शरीरनाशें अनुगमे ॥ ७४ ॥ एवं शरीर नाश दर्शनें ॥ विषय ऐसें कवण ह्मणे ॥ विषय नसतां वासने ॥ उरी कैसी विचारीं पां ॥ ७५ ॥ हा तिसरा विचारु सीतापती ॥ निरूपिला तुजप्रति ॥ इहिं प्रकटि सद्युक्ती ॥ करीं निवृत्ति वा-

सनेची ॥ ७६ ॥ श्रीरामचंद्रा परियेसी ॥ तूं आशंका झणीं
येथ घेसी ॥ जे असंतशरिराच्या नाशीं ॥ सद्वस्तु काय नासे
॥ ७७ ॥ संतें असंताशिं चळण ॥ आणि असंतें संतिं संतपण ॥
येणें परस्परयोगें संतपण ॥ असंत संग कां नघडे ॥ ७८ ॥
या अभिप्रायें रघुकुळटिळका ॥ जरी तुज उपजेल आशंका ॥
तरि आकर्णि विचारु नेटका ॥ निरूपिजेल पुढिले श्लोकीं ॥ ७९ ॥

**दृढदेहानुसंधानाद्दैमूढ्यंनहि राघव ॥**
**विषं न यात्यमृततामममृतं विपतामिव ॥ १० ॥**

दृढ देहानुसंधानें ॥ जरी असेल विमूढपणें ॥ तरि देहाचेनि
नाशनें ॥ नाशा नेणे सद्वस्तु ॥ ८० ॥ अळंकाराचेनि कांचन ॥
कांचनाचेनि अळंकारपण ॥ परि अळंकारनाशें करून ॥ सुवर्ण
नाश बोलों नये ॥ ८१ ॥ घटाचेनि रूप मृत्तिकेसी ॥ आणि
मृत्तिकेचेनि रूप घटासी ॥ परंतु घटनाशें नाशासी ॥ नये नि-
श्चयसी मृत्तिका ॥ ८२ ॥ तसी असंताचेनी संतप्रवृत्ति ॥ आणि
संताचेनी असंत आलें व्यक्ति ॥ परंतु असंतलयें संतस्थिति ॥
नये नाशासी सर्वथा ॥ ८३ ॥ योग तरि असे संतांसंतां ॥
परी स्वगुण न टाकिती उभयतां ॥ असंत न पावे संतता ॥
संत नव्हे असंत ॥ ८४ ॥ संतीं असंतभाव भाविता ॥ असंत-
पण नये संता ॥ आणि असंतीं संतभाव लाविता ॥ असंत नव्हे
संत पै ॥ ८५ ॥ जेसी विषाच्या ठांई अमृतभावना ॥ करितां

विष नये अमृतपणा ॥ अथवा अमृतीं करितां विषकल्पना ॥ नये विषपणा अमृता ॥ ८६ ॥ हा विचार जेथ नाहीं ॥ तें तंव अ-ज्ञान बोलिजे पाहीं ॥ असत्य शरीराच्या ठाईं ॥ सत्यभावना जेथें वसे ॥ ८७ ॥ ह्मणोनि देह असंत हे साचार ॥ आत्मा संत निर्विकार ॥ तोचि नित्यानित्यविचार ॥ हेंचि साचार कळणियाचें ॥ ८८ ॥

## सत्यभावेन दृष्टोयं देहो देहो भवत्फलं ॥
## दृष्टस्त्वसत्यभावेन व्योमतां याति दैहिकं ॥ ११ ॥

देहो देखिला सत्यत्वें ॥ ह्मणोनि देहीं देहची होय पूर्णत्वें ॥ आणि तोची देहो देखिला असत्यत्वें ॥ तरी देहीं पावे व्योमता ॥ ८९ ॥ एवं शरीराचें सत्यत्व जोडे ॥ ऐसें आत्मया देहसंग घडे ॥ वस्तुगत्यें पाहतां न घडे ॥ आत्मयाप्रति संगु तो ॥ ९० ॥

## सुखतल्पगतो येन स्वप्ने देहेन दृष्टवान् ॥
## परिभ्रमसि हे राम देहस्ते क्व संप्रति ॥ १२ ॥

अगा अवधारीं श्रीरामा ॥ तो सुखस्वरूप तूं आत्मा ॥ त्या तुज शरीर प्रतिमा ॥ सांप्रत कोठें काय केंचे ॥ ९१ ॥ जेणें शरीरें एकदेशीं ॥ होउनि संसार स्वप्न देखसी ॥ ते संसारस्वप्नें परिभ्रमसी ॥ दशदिशा चित्त ठाके ॥ ९२ ॥ तें शरीर तुजप्रति ॥

तसें सर्वात्मना निश्चिति ॥ तस्मात् टाकुनि येथेंचि अहंकृति ॥ आत्मस्थिति रहावें ॥ ९३ ॥

**देहोहमिति संत्यज्य सर्वनाशे व्युपस्थिते ॥**
**स्पष्टव्यो स्वानुभावेन साश्रमा एव पुल्कसी १३॥**

देहाची अहंकृति नाशे ॥ तें देह असतांचि न दिसे ॥ देह नसतां ब्रह्मांड नसे ॥ ब्रह्मांडअभावें नसे कांहीं ॥ ९४ ॥ एवं देहाहं देह त्यागिति तत्वतां ॥ सर्व नाश उपस्थिती असतां ॥ स्वानुभवें करूनि स्पष्टता ॥ जय काळीं अनुभवे ॥ ९५ ॥ काहींनदिसे येणें प्रकाशें ॥ स्वगत प्रकाश तो आपण असे ॥ तेणें स्वानुभव स्पष्ट दिसे ॥ न दिसोनि आपणा आपण ॥ ९६ ॥ तेव्हां सावळे द्वैतोपपत्ति ॥ आपणांसि आपण विश्रांति ॥ जेविं पुल्कस्याचि स्थिति ॥ अर्थतेंथ साश्रम ॥ ९७ ॥ त्यासि आश्रमांचिया आयासा ॥ प्रवर्त्तणें नलगे सहसा ॥ त्याचें वर्त्तणुकेंचि सरिसा ॥ आश्रम असे समागमें ॥ ९८ ॥ तैसा स्पष्ट जो स्वानुभवस्थिति ॥ त्या समागमेंचि असे विश्रांति ॥ जरी वर्ते देहस्थिति ॥ तरि विश्रांति न सोडी त्यातें ॥ ९९ ॥ तो विश्रांतिसहित देखे नयनीं ॥ विश्रांतिसहित ऐके श्रवणीं ॥ विश्रांतिसहित चाले चरणीं ॥ एवं करी करणीं विश्रांतीसी ॥ १०० ॥ जें असत्यशरीराची अहंकृति ॥ दशरथी होय रघुपति ॥ तें एवंविध त्या उपजे विश्रांति ॥ प्रयासेंविण निश्चिती ॥ १ ॥ तो देहअहंकार गळे

कैसा ॥ ऐसें जरि ह्मणसी जानकीशा ॥ तोचि प्रकारु प्रांजळ ऐसा ॥ निरूपिजेल पुढिले श्लोकीं ॥ २ ॥

**ब्रह्मैक्यं भावयेत्साधु शांतस्तिष्ठेर्गतव्यथः ॥**
**ततस्ते मावहंभावः स्वयमेव पतिष्यति ॥ १४ ॥**

तत्वमसिसंकेतप्रमाणें ॥ ब्रह्मसाक्षात्कार सद्गुरुवचनें ॥ होतांचि साधु जो तेणें ॥ तेथुनि आपणा पाहावें ॥ ३ ॥ आपणातें पाहों जातां ॥ ब्रह्माचि भासे तत्वतां ॥ येणेंविचारें गा दशरथसुता ॥ घडे ब्रह्मैक्यभावना ॥ ४ ॥ ब्रह्मैक्यभावना करूनि ऐसी ॥ यावें शांतिचिया गृहासी ॥ शांत होऊनाता परियेसीं ॥ निर्द्वंद्वस्थिति राहावें ॥ ५ ॥ तदनंतर रघुराजा ॥ हा देहोहंभाव तुझा ॥ गळे आपेआप हा माझा ॥ सत्य वाक्यार्थ मानी पां ॥ ६ ॥ जसा श्रोत्रियाच्या विडागारीं ॥ चांडाळ न कदां वसती करी ॥ तसा ब्रह्मैक्यभाव असतां अंतरीं ॥ देहाहंकार न राहे ॥ ७ ॥ शांति आणि निर्द्वंद्व प्रकारु ॥ ब्रह्मभावना परिवारु ॥ अतो तेणेंसि तो नांदना सुंदर ॥ देहअहंकारु न राहे ॥ ८ ॥ तस्मात् ब्रह्मैक्यभाव ठसावे ॥ देहअहंकार लया पावे ॥ याउपरि नवलाव संभवे ॥ तो घननीळा श्रवण करी ॥ ९ ॥

**सर्वत्रैक्यावबोधेन स्वस्थोंतःशीतलः सदा ॥**
**निरहंकृतिराकाशविशदस्त्वदनंतरम् ॥ १५ ॥**

ब्रह्मज्ञान आत्मज्ञानासि आलें ॥ तेणें ब्रह्मात्मभावैक्या केलें ॥ ऐक्यानंतर जंव पाहिलें ॥ तंव जोडलें अभिनव ॥ १० ॥ विश्व पाहों जातां दिसे आपण ॥ आपण तो ब्रह्म परिपूर्ण ॥ एवं ब्रह्मस्वरूप स्वयें चिद्धन ॥ सदा सदात्मक प्रपंचेंसि ॥ ११ ॥ ऐसी स्थिति जाहालिया नंतर ॥ स्वस्थ शीतळ होय अंतर ॥ तें कसें ह्मणसी तरी एकाग्र ॥ आइक राया रघूत्तमा ॥ १२ ॥ पाहतां रेवलेंनि भोगें केवळ ॥ ना आपण ना ब्रह्म ना सकळ ॥ उरे गगनोपम निष्कळ ॥ अहंकृतिचेनि अभावें ॥ १३ ॥ सर्वत्र ऐक्यभावाचें स्फुरण ॥ हेंचि तेथ अहंकृति जाण ॥ तियें जालिया उपशमन ॥ उरे निर्वाण सहजपें ॥ १४ ॥ करी तन्मये प्रमाण ॥ ह्मणोनिया ग्रासलें स्फुरण ॥ स्फुरणाभावें करून ॥ गगनोपम बोलिलों ॥ १५ ॥ करितां नये प्रमाण ॥ यालागीं रितें न सोडि स्फुरण ॥ सकळ स्फुरणेंसी तेंचि पूर्ण ॥ ह्मणोनि बोलिलें सहज ॥ १६ ॥ एवं सर्वत्रैक्यावबोधें साचार ॥ जो सदा शीतळ स्वस्थांतर ॥ तो निरहंकृति तदनंतर ॥ आकाशाचेपरि विशद ॥ १७ ॥

अंतःशीतलतायां तु लब्धायां शीतलं जगत् ॥
अंतस्तृष्णोपतप्तानां दावदाहमिदं जगत् ॥ १९ ॥

ऐसी बाणलिया चरमस्थिति ॥ अंतर पावे शीतळतेप्रति ॥ पावोनि मग यथा निगुती ॥ होय त्रिजगत शीतळ ॥ १८ ॥

तस्मात् अंतरीं जो निवाला ॥ त्याप्रति विश्वाकार शिथिल जाला ॥ ह्मणिजे विश्वस्फुरणभाव निमाला ॥ आत्मस्फुरणा भावें ॥१८॥ आणि जो सद्गुणें उपेक्षित ॥ देहअहंकारसंयुक्त ॥ भेदभावने करूनी खंडित ॥ शरीरप्रमाणें जालासे ॥ २० ॥ दृढतर भाव शरीरीं ॥ तृष्णानलें तापला अंतरीं ॥ तोचि तापु बाह्याकारीं ॥ आला अवलोकनमिसें ॥ २१ ॥ जिकडे पाहों जाय दृष्टि ॥ तिकडे संतप्तचि देखे सृष्टी ॥ तृष्णानलाच्यापोटीं ॥ आहळत असे निरंतर ॥ २२ ॥ याचा अभिप्राव ऐसा दिसे ॥ जे भेदभावाने विश्वाभावें ॥ ह्मणोनि त्याप्रति ऐसें ॥ जगदाकार दुःखरूप ॥ ॥ २३ ॥ यालागीं जो अंतरीं तृष्णांपतप्त ॥ याप्रती दावाग्नी विश्वजात ॥ आणि जो अंतरीं निवाला निश्चित ॥ त्याप्रती शीतळ जगदाकार ॥ २४ ॥ जे निर्वाण सहज स्थिति ॥ शिथीलतेचि व्यक्ति ॥ तियेचें साधन हें निश्चिती ॥ जे आत्मानुसंधान दृढ ॥ २५ ॥ जें पूर्वी निरोपिलें तुजप्रती ॥ बोधलें नसेल तरि सांगों पुढतीं ॥ वसिष्ठ ह्मणे रघुपति ॥ मंगळमूर्ती अवधारीं ॥ ॥२६॥ श्रीरामा नायणाचा अंकितु ॥ माधवदास संतां प्रार्थितु ॥ पुढिलें प्रकरणीं वसिष्ठ महंतु ॥ बोलेल तें परिसावें ॥ २७ ॥ उपनिषद्विभाग हा कल्पद्रुम ॥ जेथ आत्मानुभवफळ संभ्रम ॥ वसिष्ठ हाचि विहंगम ॥ तो फळस्वाद घेवो जाणे ॥ २८ ॥ स्वाद घेउनि तृप्त जाहला ॥ तोचि वोसंडु बाहेरी आला ॥ जो

मुखापासुनी निघाला ॥ वसिष्ठरूपें प्रवाह पैं ॥ २९ ॥ तेथिचा उच्छिष्ट भाग मजलागुनी ॥ प्राप्त नारायणकृपें करूनी ॥ ह्मणोनि ये सूक्ष्मनिरूपणीं ॥ जालों अधिकारी टिकामिसें ॥ ३० ॥ त्याहिवरी येक भावार्थ असे ॥ भवदनुग्रहभानुप्रकाशें ॥ तेणें ममहृदयकमळ विकासे ॥ टीकामकरंदरसपकरंदेशीं ॥ ३१ ॥ असो येणें वाचाळपणें ॥ विशेष अनुपयुक्त ह्मणे ॥ तरि येक आतां बोलणें ॥ पुढिलें करूं वसिष्ठाचें ३२ ॥ इति श्रीयोगवासिष्ठसारे माधवदासकृतटीकायां वासनोपशमनप्रकरणं पंचमं समाप्तं ॥ ५ ॥ श्लो० । ॥ १६ ॥ टी० ॥ १३२ ॥ एवं संख्या ॥ १४८ श्रीसीताराम चंद्रार्पणमस्तु ॥

---

श्रीगणेशायनमः ॥ गुरुवाक्यश्रवण होय प्रकाशु ॥ तेणें प्रकाशे मनविलासु ॥ मनोविलासे निजध्यासु ॥ योज कैसा तें सांगों ॥ १ ॥

**शुद्धो निरंजनः शांतो बोधोऽहंप्रकृतेः परः ॥
चेष्टमानमिमं देहं पश्याम्यन्य शरीरवत् ॥ १ ॥**

नसे उपाधिअवलंबन ॥ तो मी शुद्ध निरंजन ॥ माझा ठाई वृत्त्युपशमन ॥ ह्मणोनि मी शांतरूपी ॥ २ ॥ निजभावापासुनि न विकार कदां ॥ म्हणोनि मी बोधस्वरूपी सदां ॥ नातळे भेदाचे दद्दा ॥ यालागीं प्रकृतिहूनि पर ॥ ३ ॥ मी स्वशरीराचा चेष्टविता ॥ परशरीरांचीन ये अहंममता ॥ देखणा होय निरुता अन्य शरीराचेपरि ॥ ४ ॥

एते हि चिद्विलासांता मनो बुद्धींद्रियादयः ॥
असंतएव सर्वेऽहो अवधानंविना स्थिताः ॥ २ ॥

देहेंद्रिय प्राण मन ॥ बुद्धि चित्त अहंकारगुणें ॥ महत्तत्व माया दिकरून ॥ हे पदार्थ जितुके कांहिं ॥ ५ ॥ असे चिद्विलासु यांचा अंतीं ॥ म्हणोनि चिद्विलासांत बोलिजेति ॥ असो हे समस्त पदार्थ निश्चिति ॥ होउनि ठाकति असंत ॥ ६ ॥ मी पाहे आपणा आपण ॥ ततः स्वयें चिद्विलास संपूर्ण ॥ ते चिद्विलासें अवधान ॥ सहज होय पदार्थांचें ॥ ७ ॥ एवं आपुलिये संतत प्रतीती ॥ हे पदार्थ असंत भासती असोनी नाहीं होति ॥ केवढें रघुपति आश्चर्य ॥ ८ ॥ ज्यांचेनि विषयांचें ग्रहण ॥ जे अजडत्वें प्रतीयमान ॥ तेचि पावली जडपण ॥ ह्मणोनि वाटे आश्चर्य ॥ ९ ॥ तस्मात् मनोबुध्यादिकसाचार ॥ ज्याचेनि करिती व्यवहार ॥ तो मी स्वप्रकाशसार ॥ ह्मणोनि निःसार ये उरली ॥ १० ॥

आपद्यचलचित्तोस्मि जगन्मित्रं च संपदि ॥
भावाभावेषु नैवास्मि तेन जीवात्म्यनामयः ॥३॥

जगासि अरि रूप आपदा ॥ आणी मित्ररूप संपदा ॥ या द्वंद्वोपलब्धि हर्षविषादा ॥ वेंचे अचलचित्त जो मी ॥ ११ ॥ सुखदुःखातें मानितें जे मन ॥ त्याहुनि मी असें विलक्षण ॥

यालागिं आपदादिकंकरून ॥ सुख दुःख बाधु न पावे मज ॥१२॥ प्रकाश परि दृश्य नाहीं ॥ म्हणोनि भावाभाव न लागती कांहीं ॥ भावातीत जे कांहीं ॥ तेंणेंचि मी जिवंतु असे ॥ १३ ॥ जीवत्वनाशें मी निवर्त्तलों ॥ शिवत्वप्रकाशें प्रवर्त्तलों ॥ यापरि मरोनि जियालों ॥ मी अनामय रूपी सदां ॥ १४ ॥

## निरीहोस्मि निराशोस्मि स्ववत्स्वस्थोस्मिनिस्पृहः शांतोहमनुरूपोस्मि चिदेवाहमवस्थितः ॥ ४ ॥

जागृत न देखे स्वप्न जैसा ॥ मज इंद्रिय भासुन भासे तैसा ॥ तो मी चेष्टावंत होईन कैसा ॥ म्हणोनि निरीह मी सत्य ॥ १५ ॥ जैसा क्षीरसागरु नव्हे क्षुधित ॥ कां जीमूत नव्हे तृषाक्रांत ॥ तैसा निजभाग्यरूपि मी भाग्यवंत ॥ तेणें निश्चित आशादैन्य ॥ १६ ॥ आपुलेनि अतिसूक्ष्मपणें ॥ जैसे सर्वी असोनि सर्वातें नेणे ॥ त्यानभाचिसारिखें असणें ॥ मज अचळ आत्मयाचें ॥ १७ ॥ आपुलेनि प्रकाशगुणें ॥ मी मंधीची वार्ताही नेणे ॥ अतएव स्वस्थाचि असणें ॥ मज अचळा आत्मयाचें ॥ १८ ॥ मज अद्वितीयासी कोण ॥ इच्छा उपजेल कोठुन ॥ यालागीं मी आत्मा निर्गुण ॥ निस्पृहरूपी सर्वदां ॥१९॥ उत्पत्ति स्थिति प्रळयव्यापारें ॥ स्वभावापासुनी न विकारे ॥ अतएव मी आत्मा निर्धारें ॥ शांत रूपी सर्वदां ॥ २० ॥ निजगुण न सोडुनी कैसा ॥ अग्नि होय उपाधीसारिखा जैसा ॥ मी आत्मस्वरूपें स्वतंत्र तैसा ॥ सर्वां रूपी

हें जाणे ॥ २१ ॥ ज्ञानाज्ञानेंसि संबंधु न लगे ॥ परि ज्ञाना-ज्ञान माझेनि आंगें ॥ तो मी चिद्रूप सर्वांगें ॥ अखंडत्वें अवस्थित ॥ २२ ॥

चिदेवपंचभूतानिचिदेवभुनत्रयं ॥
विज्ञातमधुना सम्यगहमेव चिदेवहि ॥५॥

तेणें चिद्रूपत्वें पाहतां कैसें ॥ कांहीं न दिसेंनि अवघेंचि दिसे ॥ पंचमहाभूताकृति असे ॥ तेंचि देव भासे निश्चित ॥२३॥ त्यापंचभूतांचें त्रिभुवन रचलें ॥ तें तंव सहजचि चिदत्वा आलें ॥ एवं हें दृश्य जेणें चिन्मय देखिलें ॥ तो द्रष्टा हि चिद्रूप ॥२४॥ आतां सद्गुरुकृपेंकरुन ॥ हेंचि सम्यक् ज्ञान ॥ जे दृश्यद्रष्टासह वर्त्तमान ॥ मी चिद्रूप निश्चयें ॥ २५ ॥

सर्वातीतः सर्वगतःखमिवाहमवस्थितः ॥
यदेवास्ति तदेवास्ति वक्तुं शक्तोमि नेतरत् ॥ ६ ॥

मी चिदाकाश अमूर्तु ॥ सर्वगत परी सर्वातीतु ॥ शून्याचे परी अवस्थितु ॥ स्फुरणाभावें वर्त्ती ॥ २६ ॥ कालत्रयाबाधित निर्वाह ॥ जे स्वभावें आहे तेंचि आहे ॥ असा ऐसा मी निज प्रवाहें ॥ बोलों नशके आणिक कांहीं ॥ २७ ॥

मय्यानंदचिदंभोधावाश्चर्याजीववीचयः ॥
समुल्लसंति खेलती प्रविशंति स्वभावतः ॥ ७ ॥

मज चिदानंदसमुद्रामाझारीं ॥ अनेक प्रकारच्या अनंत जरी ॥ आश्चर्यरूप जीवलहरी ॥ स्वभावेंचि उद्यत ॥ २८ ॥ मज चिदानंदसमुद्रामाझारीं ॥ अनेक प्रकारिच्या अंनत जरि ॥ आश्चर्यरूपा जीवल्हरि ॥ स्वभावेंनि प्रवर्शति ॥२९ ॥ एवं उदय अस्त आणि क्रीडन ॥ होय जिवाचें मज मधुन ॥ परंतु तेणें गुणकार्येंकरून ॥ मी सगुण नव्हे सर्वथा ॥ ३० ॥ उत्पत्ति स्थिति प्रळय साचा ॥ होय स्वभावेंची जिवाचा ॥ परंतु त्या होतपणाचा ॥ विटाळु सर्वथा मज न लागे ॥ ३१ ॥

मय्यानंदचिदंभोधौ विश्ववीच्यादिकल्पना ॥
उदेतु वास्तमायातु न मे वृद्धिर्न मे क्षयः ॥ ८ ॥

मज चिदानंदसमुद्रामाझारी ॥ कल्पनिकया विश्वलहरी ॥ उद्भवती मावळती परी ॥ मी तो नेणे उभयभाव ॥ ३२ ॥ दिवसाचा उदय आणि नाशु ॥ न नेणे जैसा चंडांशु ॥ तैसा मी आत्मा स्वप्रकाशु ॥ नेणें उदय अस्तु विश्वाचा ॥ ३३ ॥ सिंधु भरतें येउनि उचंबळला ॥ तरि तो म्हणों नये अधिक जाला ॥ तोचि भरितें जाय तेणें उणावला ॥ हेंहि सहसा बोलों नये ॥ ३४ ॥ तैसा विश्वाचा उदय जाहला ॥ तेणें मी न घडे उपजला ॥ अथवा विश्वप्रळय नाशला ॥ हेंहि न घडे सर्वात्मना ॥ ३५ ॥ सिंधु आपुलेंनि पूर्णपणें ॥ भरितें आलें गेलें हें नेणें ॥ तैसा म्यां नेणिजे निर्गुणें ॥ गुणकार्याचा उद्भवल्या

॥ ३६ ॥ जो दुसनि देखणा नव्हे निर्धारें ॥ तो स्पर्शेल काय साक्षात्कारें ॥ याल्मगीं विश्वोत्पत्तिनाशविकारें ॥ मी न विकारें निर्विकार ॥ ३७ ॥

# मदज्ञानोदितं विश्वं मय्येव लयमागतं ॥
# अपरोक्षचिदानंदसाम्राज्यमधुनास्म्यहं ॥ ९ ॥

माझें मज अज्ञान पाहीं ॥ तेणें विश्वाभासु जो होत कांहीं ॥ तो लय पावला माझेचि ठाईं ॥ सम्यक्ज्ञानेंकरूनी ॥ ३८ ॥ तववरीची शोभे अंधकारू ॥ जंव उगवला नाहीं प्रभाकरू ॥ तैसा तंववरीची विश्वाकारू ॥ जंव मी न जाणे आपणा ॥ ३९ ॥ तंववरिच शोभतो सरिताओघ ॥ जंव न पावती उदधिचें अंग ॥ तैसें तंववरिचि हें जग ॥ जंव मी न जाणें आपणा ॥ ४० ॥ तंववरिच मरणाची चिंता ॥ जंववरि अमृत नये हातां ॥ तैसी तंववरीचि विश्वाची वार्ता ॥ जंव मीनत्वता आपणासि नेणे ॥ ॥ ४१ ॥ असो माझ्या अज्ञानें विश्व जाहलें ॥ तें माझाठाईं लया आलें ॥ आतां मी अपरोक्ष भलें ॥ चिदानंद साम्राज्य ॥ ४२ ॥

# सर्वभूतांतरस्थाय सत्यमुक्तचिदात्मने ॥
# प्रत्यक्चैतन्यरूपाय मह्यमेवनमोस्तुते ॥ १० ॥

मी सर्वरूपें झालों ॥ होउनि अंतरस्थ राहिलों ॥ म्हणजे विक्षेपावरी नाहीं आलो ॥ आत्मभावातें सोडुनी ॥ ४३ ॥ ज्या

चनि असत्या सत्यपण ॥ तो मी सत्य स्वरूप निर्वाण ॥ जेणें बंध मोक्ष हें बंधन ऐसा मी मुक्त सर्वात्मा ॥ ४४ ॥ जो मी चिदात्मा सर्वांगें ॥ तो मी प्रत्यगात्मा उद्धव नेथें ॥ त्या मज अहमात्मया अभिन्न भागे ॥ नमन माझें असो हें ॥ ४५ ॥ यावरि वसिष्ठ म्हणे रघुनाथासी ॥ अगा बापा परियेसी ॥ सद्गुरु वाक्य श्रवण जासी ॥ तो करी ऐसी आत्मजिज्ञासा ॥ ४६ ॥ आत्म ज्ञानानंतर जाण ॥ ऐसें आत्मानुसंधान ॥ हेंची बोलिजेल साधन ॥ सिद्ध दशा पावावयाचें ॥ ४७ ॥ येणें आत्मनुसंधानें जरी ॥ राहे रघुनाथा तूं अंतरीं ॥ अंतर्निष्ठ होतां लोकाचारीं ॥ कैसा वर्ती हें जरी म्हणसी ॥ ४८ ॥ तरी गा तेंही निरूपण ॥ पुढें कीजेल करीं श्रवण ॥ हृदयग्रंथीचें छेदन ॥ येणें तात्काळ हो उचळे ॥ ४९ ॥ माधवदास प्रार्थी संतां ॥ ऐसा सादर करूनि श्रीरामा श्रोता ॥ वसिष्ठ होय निरूपण कर्ता ॥ तेचि ऐका आतां तुम्ही ॥ ५० ॥ येथूनी संपलें आत्मप्रकरण ॥ पुढें परिसावें ब्रम्ह निरूपण ॥ श्रवणीं आणूनी अवधान ॥ अवध्यांनीं मन लावावें ॥ ५१ ॥ इति श्री योगवासिष्ठ सार माधवदासकृत टीकायां आत्मनः प्रकरणं षष्ठं समाप्त ॥ ६ ॥

---

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरुवसिष्ठेभ्यो नमः ॥

बहिः कृत्रिमसंरंभो हृदि संरंभवर्जितः ॥
कर्त्ता बहिरकर्त्ताऽन्तर्लोके विहर राघव ॥ १ ॥

बहुरूपी ब्राह्मणाचें सोंग ॥ आणुनी क्रिया संपादी सांग ॥ परंतु ते क्रियेच्या संयोग ॥ नपावे त्या बहुरूपियासी ॥ १ ॥ क्रियेवेगळें बहुरूपिपण ॥ स्वांगच पावे क्रियाचरण ॥ येणें दृष्टांतेंकरून ॥ श्रीरामा तूं ऐसा होईं ॥ २ ॥ तुज आत्मयाचाठाईं ॥ शरीराभास जो कांहीं ॥ तो कृत्रिम कल्पित पाहीं ॥ आधुनिक जाहलासे ॥ ३ ॥ तच्छरीरजन्य जे क्रिया ॥ तेचि संरंभ बोलिजे रघुराया ॥ तेणें संरंभेकरूनी आत्मया ॥ नलगे क्रियेचा लवलेश ॥ ४ ॥ शरीराची क्रिया शरीरीं वसे ॥ आत्मा अक्रिय आंत असे ॥ क्रिया नलगे तेथें कैसें ॥ बोलों येईल कर्तृपण ॥ ५ ॥ एवं क्रिया आणि कर्तेपण ॥ देहिंचे देहीं वर्तमान ॥ आत्मा तो क्रियाविहीन ॥ आणि कर्तृत्वासि न संभवे ॥ ६ ॥ यालागीं राघवा तूं तत्वता बाह्यक्रियारंभे होय वर्तता ॥ आरंभवर्जित होत्साता ॥ हृदयीं राहे निश्चळ ॥ ७ ॥ बाह्यशरीरदृष्टि होय कर्ता ॥ अंतरीं आत्मदृष्टी होय अकर्ता ॥ येणेंची प्रमाणें 'यथार्थता ॥ विचरे लौकिकामाझारी ॥ ८ ॥ कर्मदृष्टि लोक बुझावी ॥ अकर्मदृष्टी राहे आत्मभावी ॥ हे तुज वर्मकळा बरवी ॥ सांगत असें अंतरींची ॥ ९ ॥

**अंतस्त्वेको बहिर्नैको त्द्दि बोधो बहिडः ॥**
**अंतस्त्यागी बहिःसंगी लोके विहर राघव ॥ २ ॥**

अंतरीं एकत्व न भंगता ॥ बाहेरी दावी अनेकता ॥ अंतरीं

बोधरूप असता ॥ दावी जाड्य बाधात्कारीं ॥ १० ॥ आत्मयाहुनी विलक्षण ॥ नाहीं प्रमेय प्रमाण ॥ याला आत्मानुभवें जाण ॥ होय त्यागी अंतरीं ॥ ११ ॥ आत्मयाचें अद्वयपण पाहीं ॥ सांडी मांडी न लगे कांहीं ॥ यालागीं बाह्य प्रवाहीं ॥ होय संगी निश्चयें ॥ १२ ॥ यापरी न देखोनी लोका ॥ लोकीं विचरें रघुटिळका ॥ ये अर्थी बाधक शंका ॥ तेचि दवडी सर्वात्मना ॥ १३ ॥

**पूर्णां दृष्टिमवष्टभ्यध्येयत्यागी विलासिनीं ॥**
**जीवन्मुक्ततया स्वस्था लोके विहर राघव ॥३॥**

ध्येयें उपलक्षणें करुनी ॥ ध्याता ध्येय ध्यान हे त्रिनी ॥ या त्रयाच्या निरसनीं ॥ जो विलासे पूर्णत्वें ॥ १४ ॥ ते पूर्ण दृष्टि अंगउनी ॥ जीवन्मुक्तता पावोनी ॥ अगा राघवा धनुष्पाणी ॥ लोकीं विहर स्वस्थरूपें ॥ १५ ॥ तथापि लौकिकामाजीं वि-चरतां ॥ जरी बाधिल किंचिद्देहाहंता ॥ तरी गा एक कौसल्या सुता ॥ सांगत असे ये अर्थी ॥ १६ ॥

**एको विशुद्धबोधोहमिति भावकृशानुना ॥**
**प्रज्वाल्याद्वैतगहनमेकमेव सुखी भव ॥ ४ ॥**

अनेकाकार मी येकु ॥ विशुद्धाभावें निष्कलंकु ॥ बोधस्वरूपें प्रकाशकु ॥ ऐसी भावना जे कांहीं ॥ १७ ॥ तो अद्वैत बहुता

शनु ॥ प्रज्वळुनियां गहनु ॥ जाळी अहंमादी द्वैतधनु ॥ मग पूर्णत्वें होय सुखी ॥ १८ ॥

देहोहंमानपाशेन दृढबद्धोसि सर्वतः ॥
बोधोहंमानखड्गेन तन्निष्कृत्य सुखी भव ॥ ५ ॥

देहाभिमानपाशाचे पाशीं ॥ दृढतर बांधला अहर्निशीं ॥ शोक दुःख पात्र होसी ॥ याचिलागीं श्रीरामा ॥ १९ ॥ आतां बोध येणें खड्गें करून ॥ करुनी देहाहंपाशाचें छेदन ॥ होई सुखी हें वचन ॥ घेईं यथार्थ भावार्थें ॥ २० ॥

अनात्मनिरतिंत्यक्त्वा निर्विभागौ जनस्थितौ ॥
एकनिष्ठतयांतःस्थःसन्चिन्मात्रपरोभव ॥ ६ ॥

आत्मयाहुनी विलक्षण ॥ अनात्मा जें शरीर जाण ॥ त्याची आशा त्यागुन ॥ परमोत्कृष्ट वैराग्य ॥ २१ ॥ जेथें शरीर अनासक्तता ॥ तेथें अहं ममभाग नुरे तत्वतां ॥ निर्विभागत्वें जनीं बर्ततां ॥ एकनिष्ठता सहज योजे ॥२२॥ दृढतर स्वरूपास्तिता ॥ तेची बोलिजे येकनिष्ठता ॥ ते येकनिष्ठेकरुनी पाहतां ॥ होसी द्रष्टा स्वरूपाचा ॥ २३ ॥ स्वरूपदर्शनीं देखे आपणासी ॥ आपणासी देखतां देखे प्रकाशासी ॥ तो प्रकाश निश्चयेंसी ॥ अरूप रूपात्मक असे ॥ २४ ॥ रूप प्रकाशूनी रूपाचा ॥ तो चाळक पैं साचा ॥ ये सत्तादृष्टी तयाचा ॥ रूपभाग गमतसे ॥

॥ २५ ॥ निज प्रकाशाचेनी गुणें ॥ प्रकाशातें कदा नेणें ॥ ह्मणोनि नघडे रूपा येणें ॥ ये अर्थी दृष्टांतु ॥ २६ ॥ कोण्ही येका ठाईचें दर्शन ॥ घ्यावया पृथ्वीसीं न घडे गमन ॥ अथवा बुबुळा भेटावया नयन ॥ कोणे काळें काय येतिल ॥ २७ ॥ तैसा स्वप्रकाश जो त्यासी ॥ येणं न घडे रूपासी ॥ येणें चिदत्वें परियेसी ॥ अंतरात्मा वगमतसे ॥ २८ ॥ परंतु रूप तें अरूपाचें अंग ॥ अरूपें रूप होय सांग ॥ हाचि दाऊ अभिन्न भाग ॥ अभिअयांग न भंगोनि ॥ २९ ॥ प्रकाशें रूप रूपा आलें ॥ अन्यथा रूप ऐसें नवचे बोलिलें ॥ जेणें प्रकाशें रूप केलें ॥ तो तरि असे अरूप ॥ ३० ॥ एवं अरूपा रूप होय ऐसें ॥ आतां रूपें अरूपत्व तें कैसें ॥ एक श्रीरामा कळे तसें ॥ सांगिजल तुज प्रती ॥ ३१ ॥ जें प्रकाशरूपासी अधिष्ठान ॥ तें रूप ऐसें ह्मणेल कवण ॥ रूपेंसी प्रकाशची आपण ॥ रूपें अरूप तें ऐसें ॥ ३२ ॥ तस्मात् रूपवंत जे सत्ता ॥ आणि रूपवंत जो प्रकाश निरुता ॥ या उभयतांसी असे परस्पर भिन्नता ॥ एकमेकांतें सोडितना ॥ ॥ ३३ ॥ रत्नाची प्रभा जसी ॥ सोडूं नेणे सुरंगत्वासी ॥ आणि सुरंगत्व प्रभेसी ॥ सोडूं नेणे सर्वथा ॥ ३४ ॥ सद्रूपचिद्रूप ये तैसी ॥ सोडूं नेणती येरयेरासी ॥ सत्ता उठी चिद्रूपत्वेंसी ॥ चिद्रूपत्व सत्तेसी ॥ रूपा आणी ॥ ३५ ॥ एवं प्रकाशरूपा रूप भासलें ॥ तें सच्चिद्रूप अनुगमलें ॥ सच्चिद्रूप पाहतां विवलें ॥ तिसरें कांहीं एक पैं ॥

॥ ३६ ॥ जैसीं उदका आणि साखरे ॥ भेटि जाहलिया नंतरें ॥ दोन्ही दिसती परी निर्धारें ॥ वेगळीं केलीं न वचती ॥ ३७ ॥ केलीं न वचतां भिन्न ॥ म्हणोनी दोघां अर्थी एकपण ॥ त्या एकपणाचें रूप जाण ॥ जो सर्वांगें स्वादु पैं ॥ ३८ ॥ त्या स्वादाची व्यक्ति कैसी ॥ नव्हे उदक अथवा साखरे ऐसी ॥ निवडाकुनी दोहींसी ॥ पृथग्भिन्न उरलें तें तिसरें ॥ ३९ ॥ तयेपरीची गा रघुपति ॥ सद्रूप चिद्रूप उभय व्यक्ती ॥ दिसतांची परी न दिसती ॥ भिन्न न निवडती म्हणोनी ॥ ४० ॥ हें सद्रूप म्हणों जावें ज्यासी ॥ तंव तें उठि चिद्रूपेसी ॥ आतां चिद्रूप म्हणों जरी निश्चयें ॥ तरी तें सत्तेसी अभिन्न ॥४१॥ एवं दोहिंचेनी येकत्वें कैसा ॥ निवाड केला नवचे सहसा ॥ त्या येकत्वाचा जो ठसा ॥ तो दोहीं सारिखा बोलों नये॥४२॥दोहींसारिखें हो नेणें ॥ परंतु दोहींतेंन सोडी अन्वयगुणें ॥ असो ऐसें उरलें निष्कळपणें ॥तेंचि तिसरें कांहीं येक॥ ४३ ॥ तें सच्चिन्मात्राचेनी भांगें ॥ सच्चिन्मात्र त्याचेनी योगें ॥ परि दोहिंचा विटाळ त्यासी न लगे ॥ यालागीं चिन्मात्र पर ॥४४॥ तस्मात् श्रीरामा तूं आतां ॥ टाकुनी देहिंची अहंममता ॥ अंतरीं निर्वाह होन्साता ॥ येकनिष्ठे करुन ॥ ४५ ॥ सच्चिद्स्वरूपाहुनी पर ॥ जें निरतिशयानंद चिदंबर ॥ जें निर्गुण निर्विकार ॥ तें निजांगें होउनी ठाके ॥ ४६ ॥ येथ बहिर्वृत्तिवरी नलगे येणें ॥ निजरुपामाजी विरोनी जाणें ॥ आपणें आपण आपण होणें ॥ हेंचि पुढें निरूपण ४७ ॥

**अजाग्रत्स्वप्ननिद्रश्च एतद्रूपं सनातनं ॥**
**सचेतनं विशुद्धं च तन्मयः सर्वदा भव ॥ ७ ॥**

जागृत्स्वप्नसुषुप्तीसी ॥ आपुलेनी प्रकाशें प्रकाशी ॥ परंतु हो नेण पारियेसी ॥ जागृती स्वप्न सुषुप्तिरूप ॥ ४८ ॥ सज राहे निद्रा लागली होती ॥ त्यां स्वप्न देखिलें अपूर्वस्थिती ॥ जागा जाहलें निद्रेचे अंतीं ॥ तंव तें स्वप्न वाव झालें ॥ ४९ ॥ ऐसें जो ह्मणत आहे ॥ तो निद्रिस्त ना स्वप्नांत न राहे ॥ ना जागेपणामाजीं न पाहे ॥ साक्षित्वें या तिहींतें ॥ ५० ॥ एवं जे साक्षि अवस्थात्रयाचें ॥ तेंची श्रीराम स्वरूप साचें ॥ जे सनातन म्हणजे पुरातनें ॥ प्रपंचाकारें विस्तुरलें ॥ ५१ ॥ चैतन्य चेतवित तेथुनी चेतवे ॥ ह्मणोनी तें सचेतन स्वभावें ॥ त्याचेनी अशुद्धि शुद्धत्व पावे ॥ ह्मणोनी बोलिलें विशुद्ध ॥ ५२ ॥ रघुनाथा ऐसें तुझें स्वरूप ॥ अपार सच्चिदानंद अनुप ॥ तें होउनी राहे तद्रूप ॥ सर्वदा ह्मणजे निरंतर ॥ ५३ ॥ स्वरूपीं विरउनी सावध ॥ राहे स्वस्वरूपें परीपूर्ण ॥ राहतां जरी होईल चळन ॥ पदार्थदर्शन संयोगें ॥ ५४ ॥ तरी अनुसंधानें संधान करावें ॥ करूनी तत्काळ तन्मय व्हावें ॥ तेंचि अनुसंधान बरवें ॥ पुढिले श्लोकीं अवधारीं ॥ ५५ ॥

**मा भव ग्राह्यभावात्मा ग्राहकात्मा च माभव ॥**
**भावनामखिलां त्यक्त्वा यन्मयस्तन्मयो भव ॥ ८ ॥**

होईल पदार्थदर्शन ॥ तेथें ग्राह्य ग्राहक ग्रहण ॥ ये त्रिपुटीचें संक्रमण ॥ होऊं न द्यावें तयापरी ॥५६॥ ग्राह्य शब्दें पदार्थ जाण ॥ ग्राहक शब्दें बोलिलें मन ॥ इंद्रियाचेंनि होय ग्रहण ॥ तया पदार्थाचें पैं ॥५७॥ तरी गा इंद्रियें आणि मन ॥ हेंहि पदार्थरूपेंचि भान ॥ यालागीं केविं घडे ग्रहण ॥ पदार्थेकरूनी पदार्थाचें ॥ ५८ ॥ आतां आत्मेनि पदार्थ घेणें ॥ तरी आत्म पदार्थ काइ जाणें ॥ जें जाणे तें आत्मपणें ॥ पदार्थ म्हणे कोण तेथ ॥ ५९ ॥ पदार्थज्ञानाचेनि संयोगें ॥ तें ज्ञान आत्मयाचेनि आंगें ॥ तें आत्मयासि भिन्नभागें ॥ पदार्थ असे सत्य कीं ॥ ६० ॥ आत्मयासी पदार्थ अभिन्न ॥ तरी कैचें ग्राह्यग्राहकग्रहण ॥ एवं आत्मस्वरूपें करून ॥ असताचि त्रिपुटि चरपाळे ॥ ६१ ॥ म्हणोनि श्रीरामा तूं परियेसी ॥ ग्राह्यपदार्थ आणुनी भावेंसी ॥ तूं ग्राहकात्मा म्हणी होसी ॥ पदार्थ तुजसी भिन्न असे ॥ ६२ ॥ मागुतेनि श्रीरामा परियेसी ॥ ग्राहकता आणुनी भावासी ॥ तूं ग्राह्यभावात्मा म्हणी होसी ॥ पदार्थ तुजसी अभिन्न असे ॥ ६३ ॥ ग्राहकभावें मनोरूप होणें ॥ ग्राह्यभावें पदार्थावरी येणें ॥ एवं त्रिपुटिरूप भावना गुणें ॥ हे तुज होय द्वंद्वबाधा ॥ ६४ ॥ आतां हे त्रिपुटिरूप भावना ॥ जे रूप करी पदार्थग्रहणा ॥ ते आत्मभावें रघुनंदना ॥ व्यक्त करूनी समस्तहि ॥ ६५ ॥ जेणें प्रकाशें भावना प्रवृत्ति ॥ तूं तन्मय होई यथा निगुति ॥ याचें तात्पर्य हेंचि असे आत्मस्थिति ॥ आणि त्रिपुटि उपशमातें ॥ ६६ ॥ मनाचेनी अंग

विलासें ॥ विषयावरी इंद्रिय बैसे ॥ परंतु पदार्थाचेनी नसे ॥ ग्रहण पैं ॥ ६७ ॥ अथवा तूं स्वस्वरूपें जैसा ॥ आहेसी तन्मय होई तैसा ॥ तेणें त्रिपुटी सहज ये नाशा ॥ हेंचि आतां विशद सांगों ॥ ६८ ॥ तरी ग्राह्यग्राहकग्रहण ॥ जेणें वोतलें असे जाण ॥ तूं तन्मय होउनी राहे पूर्ण ॥ त्रिपुटिमग्न होय तेथें ॥ ६९ ॥ मग विषयांपासुनी जनक जैसा ॥ वृत्ती परावृत्ती न घडे सहसा ॥ भोक्ता भोग्यता भोगणें ठसा ॥ विरोनी जाय जेथिचा तेथ ॥७०॥ जळिंच्या तरंगा जैसें ॥ मागुतें मुरडणें नसे ॥ जेथ जाय तेथची असे ॥ त्याचें लयस्थान पैं ॥ ७१॥ तैसी त्रिगुणात्मक भावना ॥ उपजोनी नये जन्मस्थाना ॥ जेथ लोटली तेथचि आपणा ॥ माजि पावे विलयातें ॥ ७२ ॥ रसनारूप जें होतेंची होणें ॥ तें कासया मुखावरि ग्रास आणणें ॥ तैसें वृत्तीसी नलगे मुरडणें ॥ पदार्थ आलिया ब्रह्मत्वा ॥ ७३ ॥ येथ कैसें अभिनवपणें ॥ जे रूपाचे होउनी ठाकती नयन ॥ शब्दची होतसे श्रवण ॥ रसना आपण रस होय ॥ ७४ ॥ गंध घ्राण होउनी राहे ॥ स्पर्शची त्वचा होत आहे ॥ येणें विचारितां विचार पाहे ॥ विषयभान हें न दिसे ॥ ॥ ७५ ॥ विषय आले अभावस्थिति ॥ तें केवीं बोल्यावी परावृत्ति ॥ याकारणें गा रघुपती ॥ ऐसेंचि निभ्रांति अनुष्ठीं ॥ ७६ ॥ आधीं अरूपीं भावना नाणी ॥ मग भावनाचि अरूपासी आणी ॥ तूं तरी विलक्षण त्याहुनी ॥ येणें तेणें सहित ॥ ७७ ॥ असे

जैसा आहे तैसा ॥ तन्मय होई हाचि निर्णय ऐसा ॥ तन्मय जालिया निर्द्वंद्व दशा ॥ बाणे सहज निजांगीं ॥ ७८ ॥ आतां आणिक येकप्रकारें सुपरी ॥ निरूपिजेल साधनाची कुसरी ॥ ते सादर श्रीरामा अवधारीं ॥ राहोनि अंतरीं हृदयाच्या ॥ ७९ ॥

**संकल्पेनैव संकल्पं मनसैव मनोमनं ॥**
**छित्वात्मन्यवतिष्ठ त्वं किमेतावद्धि दुष्करं ॥ ९ ॥**

जो विषयसंकल्प उद्भयमान ॥ त्याचें संकल्पेंचि करावें छेदन ॥ कैसें ह्मणसी तरी स्पष्ट करून ॥ कळेऐसें सांगिजेल ॥ ८० ॥ विषयालागीं संकल्प उठे ॥ परंतु तो विषयप्राप्ति न तुटे ॥ जैसा अक्दानालागि अग्नि प्रगटे ॥ परंतु न विझे अवदान तोंगें ॥ ८१ ॥ आपुलिया जन्मस्थानाकडे ॥ तोचि जैसा मुरडे ॥ तैं संकल्प हा सर्व्दाह नघडे ॥ येचिविषयीं दृष्टांत ॥ ८२ ॥ जैं सरिताप्रवाह मुरडोनी ॥ मिळे आपुलिये उगमस्थानीं ॥ तैं सरिता ऐसें कोणी ॥ ह्मणेल पाहीं विचारियां ॥ ८३ ॥ एवं अंतर्मुखें मुरडी धरी ॥ करूनि आपुला आपण ग्रास करी ॥ अतएव बोलिलें निर्धारीं ॥ संकल्प छेदी संकल्पातें ॥ ८४ ॥ असो यापरी संकल्पाचें ॥ संकल्पें छेदन होय साचें ॥ संकल्प छेदुनी मनाचें ॥ मनेंचि करावें मनाचें मारण ॥ ८५ ॥ संकल्प आणि प्रकाशु ॥ उभयत्योगें मनोभाव रूपसु ॥ संकल्पाचा जालिया नाशु ॥ येक अंशु क्षीण होय ॥ ८६ ॥ निःसंकल्पप्रकाशें पाहीं ॥ उरला प्रकाश जो

काहीं ॥ तो नयें लेखिचा होइ ॥ म्हणोनि नेहिं बोलिजे मन॥८७॥ तें साचेंचा करूनी ग्रास ॥ मुख्यप्रकाशीं मिळे प्रकाश ॥ मनेंचि भवाचा नाशु ॥ यापरि होय रघुराया ॥ ८८ ॥ ऐसा संकल्पेंचि संकल्प छेदुनी ॥ मनेंचि मनासी मारूनी ॥ अपरिछिन्नभावें करूनी ॥ आत्मस्वरूपीं रहावें ॥ ८९ ॥ मग आत्ममननशिळा ॥ ऐक श्रीरामा जनकनीळा ॥ भोगी आपला आपण सोहळा ॥ वेळोवेळां तेंचि सांगों ॥ ९० ॥ आत्मा म्हणिजे आपण ॥ आपुलेठाई राहतां प्रयास कोण ॥ सर्वथा दुष्कर नव्हे जाण ॥ अत्यंत असे सुलभ ॥ ९१ ॥ रत्नाची प्राप्ति चित्रासी ॥ कीं हेमाची भेटी सुवर्णासी ॥ कीं जळसंयोग तरंगासी ॥ होता कोण प्रयासु ॥ ९२ ॥ तैसा आपणा आपण प्रकाश ॥ आपणा आपण नामरूपात्मक ॥ ते आत्मरूपीं राहतां अडक ॥ काय असे विचारी पां ॥ ९३ ॥ आतुळिय मिथ्याकारणें ॥ जैसें देशांतरासी नलगे जाणें ॥ तैसी नलगती बहिरंगसाधनें ॥ आत्मरूपिं राहावया ॥ ९४ ॥ तस्मात् स्वरूपीं राहतां ॥ दुर्घट नाहीं यथार्थता ॥ परंतु आड असे देहअहंता ॥ तेचि निरसिली पाहिजे ॥ ९५ ॥ वस्तुता ना तुझें शरीर ॥ नाथिला ऐसी देहअहंकार ॥ मी देह कैसा हा करीं विचार ॥ हेंचि पुढें निरूपण ॥ ९६ ॥

क चेवायं जडो मूको देहो भवसि राघव ॥
यदर्थं सुखदुःखाभ्यामावशः पारिभूयते ॥ १० ॥

हा जडदेहो पंचभौतिक ॥ स्वतःप्रवृत्ति अप्रवर्त्तक ॥ नव्हे इंद्रियासि चाळक ॥ अतएव मूक बोलिजे ॥९७॥ जो शब्दजन्य चतुर्वाचा ॥ तो तव असे निरालंबीचा ॥ यालागीं या जडदेहाचा ॥ ठायीं मुकत्व बोलिलें ॥ ९८॥ ऐसा देह जो जडमूक ॥ तूं होसिल कोठें प्रकाशक ॥ देह रूपवंत तूं अरूपक ॥ विचार सम्यक् हाचि करीं ॥ ९९ ॥ बाहुल्या आणि सूत्रधारयासि ॥ विजातीयें विरोध अतिशयेसी ॥ तरी मी बाहुलें खांबसूत्रासी ॥ भावावयासी कोण कारण ॥ १०० ॥ सवितया आणि तमासीं ॥ विजातीयें विरोध अतिशयेसीं ॥ तरी मी अंधकार हें सूर्यासीं ॥ भावावया कोण कारण ॥ १ ॥ तैसें हा आणी आपणासीं ॥ विजातीयें भेद अतिशयेंसीं ॥ तरी मी देह हें तुम्हांसी ॥ भावावयासी कोण कारण ॥ २ ॥ जया शरीराकारणें ॥ सुख दुःख अनुभवणें ॥ असो आतां गुरुवाक्य प्रमाणें ॥ तें तूं नव्हेसि हें सत्य ॥ ३ ॥ अगा रघुवर्या श्रीरामा ॥ ऐसा विचार करूनि बरवा ॥ आत्मरूपीं राहावें तुवां ॥ तुज देहभावाचा संबंध नाहीं ॥ ४ ॥

**क त्वङ्मांसरुधिरादि क्व त्वं चैतन्यविग्रहः ॥**
**विज्ञानं नापि देहेस्मिन्नात्मबुद्धिं जहासि किम्॥११॥**

अस्थि त्वङ्मांसरुधिर ॥ इत्यादि सप्तधातूंचें शरीर ॥ जें मलमूत्रजंतूंचें भांडार ॥ जें सविकार सर्वदां ॥ ५ ॥

ऐसें शरीर अमंगळ फुडें ॥ तें श्रीरामा कोणिकडे ॥ आणि तूं पाहेंपां आपणाकडे ॥ चैतन्यविग्रहस्वरूपी ॥ ६ ॥ सद्रूपत्वें चैतन्याभिधान ॥ चिद्रूपत्वें आथि ग्रहण ॥ आनंदरूपत्वें विशेषवचन ॥ ऐसा पूर्ण सच्चिदानंद ॥ ७ ॥ त्या तुज आणि शरीरासी ॥ अंतर असे अनंतत्वेंसी ॥ भृंगी मृत्युलोकनिवासी ॥ काय विष्णूसी तुळेल ॥ ८ ॥ याल्यागी देहासीं आणि तुज अंतर ॥ असे सर्वांत्मना साचार ॥ तूं परात्पर परमेश्वर ॥ देह नश्वर निर्धारें ॥ ९ ॥ माझा देह ऐसें जाणसी ॥ जाणता परि नेणता होसी ॥ मागुतेन मी देह ऐसें भाविसी ॥ कां न त्यागिसी भावनेतें ॥ १० ॥ देह मीचि आपण ॥ हेंचि ज्ञानाचें अज्ञान ॥ हेंचि मोक्षाचें बंधन ॥ विपरीतान्वययोगें ॥ ११ ॥ देह नव्हें मी आत्माचि संधन ॥ हेंचि अज्ञानाचें ज्ञान ॥ हेंचि बंधाचें मोक्षरूप जाण ॥ सुपरिता न्वययोगें ॥ १२ ॥ मी देह हें दुरस्त गाहे ॥ तें श्रीरामा अभिनव पाहें ॥ येचि अर्थी निरूपण आहे ॥ तें ऐक पुढिले श्लोकीं ॥ १३ ॥

**एतावतैव देवेश परावस्था न गम्यते ॥**
**काष्ठलोष्ठसमत्वेन देहाय मवधार्यते ॥ १२ ॥**

देहाहं निरसिल्यावरी ॥ पाविजे परमावस्थान सुपरी ॥ असे सकळस्थानाआंतबाहेरी ॥ म्हणूनी परमावस्थान ॥ १४ ॥ अथवा विश्वाचें अधिष्ठान ॥ यालागिं बोलिजे परमावस्थान ॥

असो ऐसें आत्मरूप निर्वाण ॥ तो पावन्माहात्म्याचा ॥ १५ ॥ तो काष्ठादिकळ्यांचियेपरी ॥ भौतिकशरीरातें धरी ॥ यांत तात्पर्य हेंच जें शरीरीं ॥ असोनि नसे निर्धारें ॥ १६ ॥ पाषाणासी भेदोनि आकाश ॥ जरी असे संचलें सावकाश ॥ तरी पाषाणासी भाष ॥ व्योमदृष्टि कोण बोले ॥ १७ ॥ तैसा आत्मनिष्ठ जो कोणी ॥ तो जडपिंडास प्रकाशूनी ॥ असे ब्रह्मांडभेदुनी ॥ संचला जगिं स्वतःसिद्ध ॥ १८ ॥ तरी त्याचे दृष्टी सर्वथा पाहीं ॥ पिंडब्रह्मांड बोलोचि नये कांहीं ॥ जें भासे तेणेंविण नाहीं ॥ म्हणोनी तेंठाई दृश्य ॥ १९ ॥ एवं तो आत्मनिष्ठ ऐसियेपरी ॥ देहालागीं न धरोनि धरी ॥ तें न धरुनी धरितो कुसरी ॥ येथपर्यंत निरूपिली ॥ २० ॥ तस्मात् असद्देह निरसलें ॥ सत्यस्वरूप बोधलें ॥ हें सुपरीतज्ञान ज्ञेय झालें ॥ जयासि ते धन्यपुरुष ॥ २१ ॥ आणि जिहीं असद्देह सत्य देखिलें ॥ सत्य आत्मस्वरूप असत्य मानिलें ॥ तेही प्राणी पाहिजती बोलिले ॥ प्रसंगानुसारें पैं ॥ २२ ॥

**अहो नु चित्रं यत्सत्यं तद्ब्रह्म विस्मृतं नृणां ॥**
**यदसत्यमविद्याख्यं तत्पुरः प्रतिवल्गति ॥ १३ ॥**

अहो विचित्र पाहापां केवढें ॥ जें सत्यज्ञान सुखस्वरूप फुडें ॥ तें ब्रह्म विसरोनी मूढें ॥ असत्याकडे अनुसरली ॥ २३ ॥ असत्य म्हणिजे नव्हे विद्यमान ॥ यालागीं अविद्या हें तेथ अभि-

आन ॥ साडेतीनहस्त प्रमाण ॥ हें देह तेंचि अविद्या ॥ २४ ॥ भ्रमनिद्रें निजेले असती ॥ ह्मणोनि असत्य तें सत्य देखती ॥ नाथिल्या देहाची अहंकृती ॥ घेऊनि होती सविकार ॥ २५ ॥ अहंकाराचेनियोगें ॥ होऊनि मनोरूप स्वांगें ॥ पंचविध विषय- विभागें ॥ शरीरापुढें नाचती ॥ २६ ॥ ते अनेकरागांचिया मूर्छना ॥ हर्षविषादा तालरचना ॥ जन्ममरणभ्रमरी नाना ॥ देऊनि भेद तळपती ॥ २७ ॥ असो ऐसे अज्ञानप्राणी ॥ सत्य- ब्रह्म विसरोनी ॥ नाचती विषयरंगणीं ॥ अविद्यात्मक देहापुढें ॥ ॥ २८ ॥ सकळप्रकाश सकळाधिष्ठान ॥ स्वयं राजाधिराज आपण ॥ असोनि कर्मे पावल्या नीचपण ॥ ह्मणोनि वाटे विचित्र ॥ २९ ॥ एवं हा विषमाचार भ्रमाचा ॥ आतां एक समाचार बोधाचा ॥ जेथ सर्वब्रह्म ये भावनेचा ॥ उदय होय निजभावें ॥ ३० ॥

**सर्वब्रह्मेति यस्यांतर्भावना सविमुक्तिदः ॥**
**भेदबुद्धिरविद्येयं सर्वथांतःपरित्यज ॥ १४ ॥**

प्रबोधलेनि अंतरें ॥ विश्व भासे ब्रह्माकारें ॥ तेंचि सर्वब्रह्म भावना बारे ॥ भावना ह्मणिजे आस्तिकता ॥ ३१ ॥ मुळिंचेनी उमजे फुडें ॥ स्वयंब्रह्मत्व उघडें ॥ तेंचि अंतर्भावनेचें रूपडें ॥ सर्वब्रह्माकारपें ॥ ३२ ॥ असो सर्वब्रह्म ऐसी ॥ उपजे अंतर्भा- वना जयासी ॥ तो मोक्षस्वरूप मोक्षासीं ॥ त्यरी त्यासी कृता-

थता ॥ ३३ ॥ कां जे मुक्ति ऐसी बोलिजे जियेसी ॥ ते होय सर्वब्रह्मभावनेची दासी ॥ ते भावना आलिया अंतरासी ॥ मुक्ति चरणासी सहज लागे ॥ ३४ ॥ एवं सर्वब्रह्मभावना मुक्तिदाती ॥ ऐसें जाणोनी निश्चयें रघुपती ॥ ते अंतरस्थ होय यथानिगुती ॥ तोची करीं प्रयत्न ॥ ३५ ॥ देह आपण ऐसी भेदबुद्धी ॥ हेची अविद्या प्रसिद्धी ॥ जे सकळआशांचा निधी ॥ दृश्यसंबंधी सादर ॥ ३६ ॥ प्रबोधलेनी अंतरें सुपरी ॥ ये अविद्येचा ग्रासु करी ॥ मग तूंची ब्रह्म सर्वाकारी ॥ सर्वांपरि सर्वदा ॥ ३७ ॥ आतां याची आत्मदर्शनालागुनी ॥ पुष्टी दीजे पुढिले प्रक- रणीं ॥ तें तूं श्रीरामा आकर्णी ॥ अवधानयोगें प्रांजळ ॥ ३८ ॥ ऐसा वल्लभ अरुंधतीचा ॥ जो ऋषिसमूहवंत साचा ॥ अतिगंभीर सुललित वाचा ॥ श्रीरामाप्रति बोलिला ॥ ३९ ॥ येर सनकादि- भृंगाचा मकरंदु ॥ शुकादिकांचा फळस्वादु ॥ तो काकुत्स्थ परमानंदु ॥ ब्रह्मानुवादु सादर परिसे ॥ १४० ॥ जो विश्रांतिचा परम विश्रामु ॥ जो सुखांचा परम सुखआरामु ॥ ज्याचेनि आगमासी घडे आगमु ॥ निगमा निर्गमु ज्याचेनि पैसे ॥ ४१ ॥ जो कल्याण सकळकल्याणांचें ॥ जो मंगळ मंगळांचें ॥ जो परम ध्येय स्मरह- राचें ॥ जो नारदाचें परम ज्ञेय ॥ ४२ ॥ ऐसा श्रीराम परिपूर्ण ॥ तो स्वयें श्रोता होऊनि आपण ॥ ऐके ब्रह्मनिरूपण ॥ वसिष्ठवा- क्यप्रवाहें ॥ ४३ ॥ अवाप्तसकळकाम तरि पाहे ॥ निरूपणाचि

आर्ति वाहे ॥ जसा वापिया उत्कटित आहे ॥ निराळीं जीवनालागी ॥ ४४ ॥ आधिच ब्रह्मनिरूपण ॥ त्यावरी रघुनाथ करी श्रवण ॥ ते गोडिचा पार करी कवण ॥ रामचा आपण पारु जिचा ॥४५॥ श्रीमन्नारायणांकित ॥ माधवदास संतां प्रार्थित ॥ सावधचित्त परिसा वृत्तांत ॥ पुढें आठवे प्रकरणांचा ॥ १४६ ॥ इति श्री-योगवासिष्ठसारे माधवदासकृतटीकायां शुद्धब्रह्म निरूपणं नाम सप्तमं प्रकरणं समाप्तम ॥ श्लो० ॥ १४ ॥ ओंव्यासंख्या ॥ १४६॥ ॥ एवं ॥ १६० ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

॥ श्रीगणेशाय नमः ॥

# यदि देहं पृथक् कृत्य चित्तं विश्राम्य तिष्ठति ॥ तदा तूर्णीकृताशेषः स्वयमेको भविष्यति ॥ १ ॥

वसिष्ठ म्हणे जलदनीळा ॥ एक रघुराया भूपाळा ॥ देह असोनि देहावेगळा ॥ करिजे गुरुवाक्या प्रमाणें ॥ १ ॥ माझेनि शरीरास चळण ॥ माझेनि शरीरासि इत्यर्पण ॥ मज सर्वथा नव्हे खंडण ॥ शरीराचेनि उत्पत्तिनाशें ॥ २ ॥ रविनभा साजणें नसे पाहीं ॥ तसा मजदेहासि बंध नाहीं ॥ कैसें मरण अमृताच्या ठाईं ॥ तैसा मी कांहीं नेणें देह ॥ ३ ॥ येणें गुरुशास्त्रविचारें ॥ देह पृथक् करुनी निर्धारें ॥ हें चपळ चित्त थिरे ॥ आत्मविश्रांति माझारीं ॥ ४ ॥ असो विश्रांति पावोनि ऐसी ॥ जेव्हां राहिजे

सुखस्वरूप अहर्निशीं ॥ तेव्हां सकळ प्रपंचासी ॥ देखोनिच न देखिजे ॥ ५ ॥ तृणीकृत म्हणजे अवगणना ॥ अवगणना म्हणिजे भावना ॥ एवं न देखिजे प्रपंचभाना ॥ आत्मभावेंकरूनी ॥ ६ ॥ आत्मत्वाची लागलिया सोय ॥ अनेक तें हरपोनी जाय ॥ स्वयें एक आपण होय ॥ एकानेकसहित ॥ ७ ॥ आणिक एक प्रकारें करून ॥ बोलिजे आत्मसाधन ॥ एक श्रीरामा सावधान ॥ पुढिले श्लोकीं उत्तम ॥ ८ ॥

येनेदं वस्तुसद्भावं कुरु प्रत्यङ्मुखं मनः ॥
ततः प्रकाशरूपत्वमीक्षसे स्फुटमात्मनः ॥ २ ॥

जें वस्तुचेनी प्रकाशें ॥ हे विश्व वोतलें असे ॥ त्या वस्तुसद्भावासरिसें ॥ मन करीं प्रत्यङ्मुख ॥ ९ ॥ इंद्रियद्वारा विषयग्रहण ॥ करी तें बहिर्मुख बोलिजे मन ॥ आणि आपणपां साच मुरडोन ॥ धरी सोय निजमुखाची ॥ १० ॥ आपण ज्याचेनी प्रकाशें ॥ परतोनी त्यामाजीं समरसें ॥ असो तें प्रत्यङ्मुख ऐसें ॥ बोलिजे पैं मानस ॥ ११ ॥ मन निजमुळीं सामावे ॥ तें स्वप्रकाशाचेनी भावें ॥ श्रीरामा तूं गा स्वभावें ॥ प्रगट देखसी आपणातें ॥ १२ ॥ तो आपण कैसा ये शरीरीं ॥ आहे ऐसें म्हणसी जरी ॥ सांगेन विमळा उत्तरीं ॥ तें अवधारीं एकाग्रें ॥ १३ ॥

येन रूपं रसं गंधं शब्दं जानासि राघव ॥
तमात्मानं परं ब्रह्म जानीहि परमेश्वरं ॥ ३ ॥

नयनद्वारा होय रूपग्रहण ॥ त्यारूपातें जाणसी जेणेंकरून ॥ तो तूं परब्रह्म आपण ॥ जाणपा ये शरीरीं ॥ १४ ॥ रसनेंद्रिय द्वारा रसग्रहण ॥ त्या रसातें जाणसी जेणेंकरून ॥ तो तूं परब्रह्म आपण ॥ जाणपा ये शरीरीं ॥ १५ ॥ घ्राणेंद्रियद्वारा गंध ग्रहण ॥ त्यागंधातें जाणसी जेणेंकरून ॥ तो तूं परब्रह्म आपण ॥ जाणपा ये शरीरीं ॥ १६ ॥ कर्णेंद्रियद्वारा शब्दग्रहण ॥ त्या शब्दातें जाणसी जेणेंकरून ॥ तो तूं परब्रह्म आपण ॥ जाणपा ये शरीरीं ॥ १७ ॥ येचि अर्थीं प्रमाण ॥ असे वेदोक्त निरूपण ॥ शाखा जे आश्वलायन ॥ आरण्यक तैत्तिरें ॥ १८ ॥ श्रुतिर्येनवापश्यतियेनवाशृणोतियेनवागंधानाजिघ्रति येनवावाचंव्याकरोति येनवास्वादुस्वादुविजानातितत्प्रज्ञानंब्रह्म ॥ इत्यादिश्रुति ॥ जेणें रूपातें पाहे नयनीं ॥ जेणें शब्दातें ऐके श्रवणीं॥ जे गंध घेतसे घ्राणीं ॥ ज्याचेनि व्याकरणीं वाचा वर्ते ॥ ॥ १९ ॥ जयाचेनि जाणतेपणें ॥ जिव्हेसि स्वादु अस्वादु जाणणें ॥ ते प्रज्ञानब्रह्म येणें ॥ अर्थे असे श्रुत्यर्थ ॥ २० ॥

याकारणें रघुवीरा ॥ ऐक राघवा परमेश्वरा ॥ जो विषयाचा स्फुरा ॥ तो तूं आपण परब्रह्म ॥ २१ ॥ याचि प्रमेयासी दृढी-करण ॥ कीजेल पुढिले श्लोकें करून ॥ ते गोड गोष्टीचें निरूपण ॥ श्रवणीं श्रवण करावें ॥ २२ ॥

**यत्र भावाः स्पदंतेऽमि निमील्यंते च येन वै ॥**
**तमेवात्मानमात्मानं परं जानीहि राघव ॥ ४ ॥**

इंद्रियदशक आणि पंचप्राण ॥ अंतःकरणपंचक तन्मात्र जाण ॥ या पंच विमा भावांचें चेष्टन ॥ होय जियें अधिष्ठानें ॥ २३ ॥ हाचि भावसमूह मागुता ॥ ज्याचेनि लयातें होय पावता ॥ तो तूं आपण परमात्मा निरुता ॥ जाण राघवा निश्चयें ॥ २४ ॥ एवं क्रिया ज्याचेनि रूपवंत ॥ कर्तृत्व ज्याचेनि अभिव्यक्त ॥ असो आतां ब्रह्मांड समस्त ॥ चळे ज्याचेनि तोची तूं ॥ २५ ॥ यापरी आत्मयाचें ॥ रूप करूनि दाविलें साचें ॥ आतां सांगों ओळखीचें ॥ अंतर्दृष्ट्या वृत्तिसमाण ॥ २६ ॥

**यदा ज्ञेयगतं तत्वं नेति संत्यज्य युक्तिभिः ॥**
**प्राप्यावशिष्टं चिन्मात्रं तदेवास्मीति भावय ॥५॥**

जडरूप पिंडब्रह्मांड जें ॥ तें ज्ञानाग्नि होय बोलिजे ॥ तें ज्ञेय ज्याचेनि जाणिजे ॥ तें तत्व ज्ञान आत्मयाचें ॥ २७ ॥ तरी ज्ञेया आंतु बाहेरी ॥ आत्मत्वचि निर्धारीं ॥ यालागीं बोलिजे सुपरी ॥ ज्ञेयगततत्व तें आत्मा ॥ २८ ॥ असो ऐसें जें ज्ञेयगततत्व पूर्ण ॥ ज्यासि जाणे तें हो नेणें आपण ॥ एवं याचिलागीं श्रुतिवचन ॥ नेतिनेति प्रवर्त्तलें ॥ २९ ॥ अंतर्दृष्ट्या वृत्तिविवेचना ऐसी ॥ करितां ज्ञान नये चि ज्ञेयासी ॥ मग तेणेंचि विचारें प्रतीसी ॥

मौन पदें अनुभवें ॥ ३० ॥ हें होय अथवा नव्हे ॥ उभयरूप वाक्यें न संभवे ॥ जैसें नववधूबाळेसि स्वभावें ॥ होय भर्तारदर्शनीं ॥ ३१ ॥ जंव भर्तारदर्शन नव्हतें जालें ॥ पुसता होय तो नव्हे ऐसें बोले ॥ मग दर्शनानंतर संचलें ॥ नव्हे होय हें बोलणें ॥ ३२ ॥ होय याल्यागिं नव्हे ह्मणावें ॥ होय ऐसेंहि लाजें न बोलावें ॥ एवं भर्तारदर्शनें न संभवें ॥ कांहिंएक तटस्थ ॥ ३३ ॥ तैसेंचि जालें वेदासीं ॥ ज्ञान नयेचि ज्ञेयासीं ॥ मग ज्ञेय निडाळुनी आपणेसीं ॥ अभिन्न ज्ञान देखिलें ॥ ३४ ॥ जेणें जालेंनि अनुभवें ॥ ज्ञानभावें नव्हे न ह्मणवे ॥ ज्ञेयाभावेंच बोलावें ॥ होय ऐसेंहि सर्वथा ॥ ३५ ॥ तस्मात् होयनव्हे बोलावें वचन ॥ ह्मणोनि श्रुतिसी पडिलें मौन ॥ सर्वांगें निज सुख आपण ॥ होउनी राहिल्या तटस्थ ॥ ३६ ॥ याल्यागिं श्रीरामा पाहीं ॥ ज्ञेयगत तत्त्व जें कांहीं ॥ तें ज्ञेय हो नेणों कांहीं ॥ ह्मणोनि प्रवर्त्तली नेतियुक्ति ॥ ३७ ॥ त्या नेतियुक्ति ज्ञेय त्यजुनी ॥ जें ज्ञान चिन्मात्र पावोनी ॥ उरलें अवशिष्ट निर्वाणीं ॥ तेंचि मी ऐसें भाविपां ॥ ३८ ॥

## ज्ञानं न भवतो भिन्नं ज्ञेयं ज्ञानात्पृथङ्गहि ॥ अतो नास्तीतरत्किंचित्तस्माद्भेदो न विद्यते ॥ ६ ॥

ज्ञान तुजसीं भिन्न नसे॥ज्ञेय ज्ञानेसीं अभिन्न असे॥ह्मणोनि तूंचि तूं स्वप्रकाशें॥ज्ञेयज्ञानेंसहित॥३९॥सागरीं ज्ञानासी विगलें लवण ॥

हे लहरी रूपेंहि होय आपण ॥ तैसें स्व ज्ञानस्वरूप पूर्ण ॥ ज्ञालिया भिन्न नुरेचि ज्ञेय॥४०॥जैसें पटावरी चित्र जालें॥तें काय तंतुनें असे सोडलें ॥ तैसें निजज्ञानें ज्ञेय जालें ॥ तें नव्हे वेगळे आपणाहूनी॥४१॥एवं ज्ञेयज्ञानेंसि आपण॥आपणाहुनी कांहीं नसे भिन्न ॥ जलतरंगन्यायें करून ॥ तस्मादृद्दद नाहीं नाहीं ॥४२॥ याउपरी जिकडे पाहों जासी ॥ तिकडे आपणातेंसाचि देखसी ॥ येणें आश्चर्य तटस्थ होसी ॥ जालें श्रुतिसी तेंचि होईल ॥ ४३ ॥ ऐसें निरूपितां वसिष्ठमुनी ॥ प्रार्थिता जाहला कार्मुकपाणि ॥ जी जीवभेद अनुग्रहें करूनी ॥ सत्तास्वरूप मज कळलें ॥ ४४ ॥ तो मी सद्रूप सर्वांसि असे ॥ हें मज बाणलें नाहीं दृढ ऐसें ॥ यालागिं हेंचि दृढतर राहे कैसें ॥ कांहिएक साधन निरूपावें ॥ ४५ ॥ ऐसीं ऐकोनि श्रीरामवचनें ॥ वसिष्ठ सुखावला मनें ॥ त्याचे सुखार्चनि वोसंडगुणें ॥ करिताझाला निरूपण ॥ ४६ ॥

**ब्रह्माविष्णुशिवेंद्राद्याः सद्यः कुर्वंति सर्वदा ॥**
**सदाहं चिद्वपुः सर्वं करोमीत्येव भावय ॥ ७ ॥**

अगा दाशरथि जाण ॥ भावनात्मक अनुसंधान ॥ हेंचि येथ मुख्य साधन ॥ व्हावें साधन ये अर्थी ॥ ४७ ॥ माझिये सत्तें सकळासी चळण ॥ तरी सकळ काय असे मजहुनी भिन्न ॥ माझेनी चित्प्रकाशें करून ॥ सकळ निर्माण होत असे ॥ ४८ ॥ माझिया चित्प्रकाशाचा अंश ॥ ज्या मनाचा ठाईं निवास ॥ ब्र-

ब्रह्मविष्णुशिवसुरेश ॥ तेणें केले प्रकाशांश ॥ ४९ ॥ मग तो कि-
रंची स्वसत्ता ॥ तत्काळ सृष्टिचा होय कर्त्ता ॥ स्वसामर्थ्यें ते
सृष्टी पाळितां ॥ विष्णुसी सर्वथा नलगे वेळु ॥ ५० ॥ रुद्र आ
पुले सामर्थ्य प्रौढी ॥ रचिली सृष्टी तात्काळ मोडी ॥ इंद्राची
सत्ता केवढी ॥ चाले अष्टलोकपाळांविगीं ॥ ५१ ॥ एवं मत्प्र-
काशें जे होती ॥ ते सत्तारूपें सर्व ऐसें करिती ॥ मी मुख्यप्र-
काश मीची मूर्ति ॥ अनुस्यूत अगाध ॥ ५२ ॥ सर्वंकरी येणें
नवल कोण ॥ माझेनी दृश्यासीं दृश्यपण ॥ चाळितें चळतें आणि
चळण ॥ येणेंची पूर्ण मीचि असे ॥ ५३ ॥ मीची देखतां वि-
श्वाच्या नयनीं ॥ मीचि ऐकतां विश्वाच्या श्रवणीं ॥ मीची
सकळांच्या घ्राणीं ॥ गंधग्राहक सर्वात्मना ॥ ५४ ॥ सर्वांचा
रसनेंद्रियद्वारें ॥ मीची रसस्वाद घेतां निर्धारें ॥ सकळांच्या
त्वगिंद्रियाकारें ॥ मीच घेतसे स्पर्श पैं ॥ ५५ ॥ मीच सर्वांच्या
करें करणीं ॥ मीची चाले विश्वाच्या चरणीं ॥ सर्वांचे वाचे
करूनी ॥ बोलत असें मीची पैं ॥ ५६ ॥ सर्वांच्या गुदद्वारें करी ॥
मीची विसर्गकर्म करी ॥ सकळ गुह्येंद्रियव्यवहारीं ॥ मीची
संपादीं आनंदु ॥ ५७ ॥ एवं शब्दस्पर्शरूपरसगंधु ॥ वक्तव्यदान
गमनविसर्गआनंदु ॥ हा मम विलासाचा विनोदु ॥ जैसा शब्द
अक्षरेंसीं ॥ ५८ ॥ तस्मात्सर्वरूपें मीची असतां ॥ सर्वाकारें
मीची वर्त्तता ॥ सर्वव्यापार मीची कर्ता ॥ येअर्थीं गीता
प्रमाण ॥ ५९ ॥

थता ॥ ३३ ॥ कां जे मुक्ति ऐसी बोलिजे जियेसी ॥ ते होय सर्वब्रह्मभावनेची दासी ॥ ते भावना आलिया अंतरासी ॥ मुक्ति चरणासी सहज लागे ॥ ३४ ॥ एवं सर्वब्रह्मभावना मुक्तिदाती ॥ ऐसें जाणोनी निश्चयें रघुपती ॥ ते अंतरस्थ होय यथानिगुती ॥ तोची करीं प्रयत्न ॥ ३५ ॥ देह आपण ऐसी भेदबुद्धी ॥ हेची अविद्या प्रसिद्धी ॥ जे सकळआशांचा निधी ॥ दृश्यसंबंधी सादर ॥ ३६ ॥ प्रबोधलेनी अंतरें सुपरी ॥ ये अविद्येचा ग्रासु करी ॥ मग तूंची ब्रह्म सर्वाकारी ॥ सर्वोपरि सर्वदां ॥ ३७ ॥ आतां याची आत्मदर्शनालागुनी ॥ पुष्टी दीजे पुढिले प्रकरणीं ॥ तें तूं श्रीरामा आकर्णीं ॥ अवधानयोगें प्रांजळ ॥ ३८ ॥ ऐसा वल्लभ अरुंधतीचा ॥ जो ऋषिसमूहवंत साचा ॥ अतिगंभीर सुल्लित वाचा ॥ श्रीरामाप्रति बोलिला ॥ ३९ ॥ येर सनकादिभृंगाचा मकरंदु ॥ शुकादिकांचा फळस्वादु ॥ तो काकुत्स्थ परमानंदु ॥ ब्रह्मानुवादु सादर परिसे ॥ १४० ॥ जो विश्रांतिचा परम विश्रामु ॥ जो सुखांचा परम सुखआरामु ॥ ज्याचेनि आगमासी घडे आगमु ॥ निगमा निर्गमु ज्याचेनि पैसे ॥ ४१ ॥ जो कल्याण सकळकल्याणांचें ॥ जो मंगळ मंगळांचें ॥ जो परम ध्येय स्मरहराचें ॥ जो नारदाचें परम ज्ञेय ॥ ४२ ॥ ऐसा श्रीराम परिपूर्ण ॥ तो स्वयं श्रोता होऊनि आपण ॥ ऐके ब्रह्मनिरूपण ॥ वसिष्ठवाक्यप्रवाहें ॥ ४३ ॥ अवाप्तसकळकाम तरि पाहे ॥ निरूपणाचि

आर्ति वाहे ॥ जैसा वापिया उत्कंटित आहे ॥ निराळीं जीवनालागी ॥ ४४ ॥ आधिंच ब्रह्मनिरूपण ॥ त्यावरी रघुनाथ करी श्रवण ॥ ते गोडिचा पार करी कवण ॥ रामची आपण पारु जिचा ॥४५॥ श्रीमन्नारायणांकित ॥ माधवदास संतां प्रार्थित ॥ सावधचित्त परिसा वृत्तांत ॥ पुढें आठवे प्रकरणांचा ॥ १४६ ॥ इति श्रीयोगवासिष्ठसारे माधवदासकृतटीकायां शुद्धब्रह्म निरूपणं नाम सप्तमं प्रकरणं समाप्तम् ॥ श्लो० ॥ १४ ॥ ओंव्यासंख्या ॥ १४६ ॥ ॥ एवं ॥ १६० ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

॥ श्रीगणेशाय नमः ॥

# यदि देहं पृथक् कृत्य चित्तं विश्राम्य तिष्ठति ॥ तदा तृणीकृताशेषः स्वयमेको भविष्यति ॥ १ ॥

वसिष्ठ ह्मणे जलदनीळा ॥ ऐक रघुराया भूपाळा ॥ देह असोनि देहावेगळा ॥ करिजे गुरुवाक्या प्रमाणें ॥ १ ॥ माझेनि शरीरास चळण ॥ माझेनि शरीरासि दृश्यपण ॥ मज सर्वथा नव्हे खंडण ॥ शरीराचेनि उत्पत्तिनाशें ॥ २ ॥ रवितमा साजणें जैसे पाहीं ॥ तैसा मजदेहासि बंध नाहीं ॥ कैसें मरण अमृताच्या ठाईं ॥ तैसा मी कांहीं नेणे देह ॥ ३ ॥ येणें गुरुगम्यविचारें ॥ देह पृथक् करूनी निर्धारें ॥ हें चपळ चित्त विरे ॥ आत्मविश्रांति माझारीं ॥ ४ ॥ असो विश्रांति पावोनि ऐसी ॥ जेव्हां राहिजे

सुखस्वरूप अहर्निशीं ॥ तव्हां सकळ प्रपंचासी ॥ देखोनिच न देखिजे ॥ ५ ॥ तृणीकृत म्हणजे अवगणना ॥ अवगणना म्हणिजे भावना ॥ एवं न देखिजे प्रपंचभाना ॥ आत्मभावेंकरूनी ॥ ६ ॥ आत्मत्वाची लागल्या सोय ॥ अनेक तें हरपोनी ठाय ॥ स्वयें एक आपण होय ॥ एकानेकरहित ॥ ७ ॥ आणिक एक प्रकारें करून ॥ बोलिजे आत्मसाधन ॥ ऐक श्रीरामा सावधान ॥ पुढिले श्लोकीं उत्तम ॥ ८ ॥

येनेदं वस्तुसद्भावं कुरु प्रत्यङ्मुखं मनः ॥
ततः प्रकाशरूपत्वमीक्षसे स्फुटमात्मनः ॥ २ ॥

जें वस्तुचेनी प्रकाशें ॥ हे विश्व वोतलें असे ॥ त्या वस्तु-सद्भावासरिसें ॥ मन करी प्रत्यङ्मुख ॥९॥ इंद्रियद्वाराविषयग्रहण ॥ करी तें बहिर्मुख बोलिजे मन ॥ आणि आपणपां साच मुरडोन॥ धरी सोय निजमुखाची ॥ १० ॥ आपण ज्याचेनी प्रकासें ॥ परतोनी त्यामाजीं समरसें ॥ असो तें प्रत्यङ्मुख ऐसें ॥ बोलिजे पैं मानस ॥११॥ मन निजमुळीं सामावे ॥ तें स्वप्रकाशाचेनी भावे ॥ श्रीरामा तूं या स्वभावें ॥ प्रगट देखसी आपणातें ॥१२॥ तो आपण कैसा ये शरीरीं ॥ आहे ऐसें ह्मणसी जरी ॥ सांगेन विमळा उत्तरीं ॥ ते अवधारीं एकाग्रें ॥ १३ ॥

येन रूपं रसं गंधं शब्दं जानासि राघव ॥
तमात्मानं परं ब्रह्म जानीहि परमेश्वरं ॥ ३ ॥

नयनद्वारा होय रूपग्रहण ॥ त्यारूपातें जाणसी जेणेंकरून ॥ तो तूं परब्रह्म आपण ॥ जाणपां ये शरीरीं ॥ १४ ॥ रसनेंद्रिय द्वारा रसग्रहण ॥ त्या रसातें जाणसी जेणंकरून ॥ तो तूं परब्रह्म आपण ॥ जाणपां ये शरीरीं ॥ १५ ॥ घ्राणेंद्रियद्वारा गंध ग्रहण ॥ त्यागंधातें जाणसी जेणेंकरून ॥ तो तूं परब्रम्ह आपण ॥ जाणपां ये शरीरीं ॥ १६ ॥ कर्णेंद्रियद्वारा शब्दग्रहण ॥ त्याशब्दातें जाणसी जेणेंकरून ॥ तो तूं परब्रह्म आपण ॥ जाणपां ये शरीरीं ॥ १७ ॥ येचि अर्थीं प्रमाण ॥ असे वेदोक्त निरूपण ॥ शाखा जे आश्वलायन ॥ आरण्यक तेथिचें ॥ १८ ॥ श्रुतिः येनवापश्यतियेनवाशृणोतियेनवागंधाना जिघ्रति येनवावाचंव्या करोति येनवास्वादुस्वादुविजानातितत्प्रज्ञानंब्रह्म ॥ इत्यादिश्रुतिः ॥ जेणें रूपातें पाहे नयनीं ॥ जेणें शब्दातें ऐके श्रवणीं ॥ जे गंध घेतसे घ्राणीं ॥ ज्याचेनि व्याकरणीं वाचा वर्ते ॥ ॥ १९ ॥ जयाचेनि जाणतेपणें ॥ जिव्हेसि स्वादु अस्वादु जाणणें ॥ तें प्रज्ञानब्रह्म येणें ॥ अर्थे असे श्रुत्यर्थे ॥ २० ॥ याकारणें रघुवीरा ॥ ऐक राघवा परमेश्वरा ॥ जो विषयाचा स्वरा ॥ तो तूं आपण परब्रह्म ॥ २१ ॥ याचि प्रमेयासी दृढी-करण ॥ कीजेल पुढिले श्लोकें करून ॥ ते गोड गोष्टीचें निरूपण ॥ श्रवणीं श्रवण करावें ॥ २२ ॥

**यत्र भावाः स्पंदंतेऽमि निमील्यंते च येन वै ॥**
**तमेवात्मानमात्मानं परं जानीहि राघव ॥ ४ ॥**

इंद्रियदशक आणि पंचप्राण ॥ अंतःकरणपंचक तन्मात्र जाण ॥ या पंच विसा भावांचें चेष्टन ॥ होय जिये अधिष्ठानें ॥ २३ ॥ हाचि भावसमूह मागुता ॥ ज्याचेनि लयातें होय पावता ॥ तो तूं आपण परमात्मा निरुता ॥ जाण राघवा निश्चयें ॥ २४ ॥ एवं क्रिया ज्याचेनि स्पर्वत ॥ कर्तृत्व ज्याचेनि अभिव्यक्त ॥ असो आतां ब्रह्मांड समस्त ॥ चळे ज्याचेनि तोची तूं ॥ २५ ॥ यापरी आत्मयाचें ॥ स्वरूप करूनि दाविलें साचें ॥ आतां सांगों ओळखीचें ॥ अंतर्दृष्टया वृत्तिनिमाणें ॥ २६ ॥

**यदा ज्ञेयगतं तत्वं नेति संत्यज्य युक्तिभिः ॥**
**प्राप्यावशिष्टं चिन्मात्रं तदेवास्मीति भावय ॥५॥**

जडरूप पिंडब्रह्मांड जें ॥ तें ज्ञानाग्नि होय बोलिजे ॥ तें ज्ञेय ज्याचेनि जाणिजे ॥ तें तत्व ज्ञान आत्मयाचें ॥ २७ ॥ तरी ज्ञेया आंतु बाहेरी ॥ आत्मतत्वचि निर्धारीं ॥ याल्यागिं बोलिजे कुपरी ॥ ज्ञेयगततत्व तें आत्मा ॥ २८ ॥ असो ऐसें जें ज्ञेयगततत्व पूर्ण ॥ ज्यासि जाणे तें हो नेणें आपण ॥ एवं याचिल्यागिं श्रुतिवचन ॥ नेतिनेति प्रवर्तलें ॥ २९ ॥ अंतर्दृष्टया वृत्तिविवेचना ऐसी ॥ करितां ज्ञान नेयचि ज्ञेयासी ॥ मग तेणेचि विचारें ध्रुतीसी ॥

मौन पडे अनुभवें ॥ ३० ॥ हें होय अथवा नव्हे ॥ उभयरूप वाक्यें न संभवे ॥ जैसें नववधूबाळेसि स्वभावें ॥ होय भर्तारदर्शनीं ॥ ३१ ॥ जंव भर्तारदर्शन नव्हतें जालें ॥ पुसता होय तो नव्हे ऐसें बोले ॥ मग दर्शनानंतर संचलें ॥ नव्हे होय हें बोलणें ॥ ३२ ॥ होय यालागिं नव्हे ह्मणावें ॥ होय ऐसेंहि लाजें न बोलावें ॥ एवं भर्तारदर्शनें न संभवें ॥ कांहिंयेक तटस्थ ॥ ३३ ॥ तैसेंचि जालें वेदासीं ॥ ज्ञान नयेचि ज्ञेयासीं ॥ मग ज्ञेय निडाळुनी आपणेसीं ॥ अभिन्न ज्ञान देखिलें ॥ ३४ ॥ जेणें जालेनि अनुभवें ॥ ज्ञानभावें नव्हे न ह्मणवे ॥ ज्ञेयाभावेंच बोलावें ॥ होय ऐसेंहि सर्वथा ॥ ३५ ॥ तस्मात् होयनव्हे बोलावें वचन ॥ ह्मणोनि श्रुतिसी पडिलें मौन ॥ सर्वांगें निज सुख आपण ॥ होउनी राहिल्या तटस्थ ॥ ३६ ॥ यालागिं श्रीरामा पाहीं ॥ ज्ञेयगत तत्व जें कांहीं ॥ तें ज्ञेय हो नेणों कांहीं ॥ ह्मणोनि प्रवर्त्तली नेतियुक्ति ॥ ३७ ॥ त्या नेतियुक्ति ज्ञेय त्यजुनी ॥ जें ज्ञान चिन्मात्र पावोनी ॥ उरलें अवशिष्ट निर्वाणीं ॥ तेंचि मी ऐसें भाविपां ॥ ३८ ॥

## ज्ञानं न भवतो भिन्नं ज्ञेयं ज्ञानात्पृथङ्नहि ॥ अतो नास्तीतरत्किंचित्तस्माद्भेदो न विद्यते ॥ ६ ॥

ज्ञान तुजसीं भिन्न नसे ॥ ज्ञेय ज्ञानेसीं अभिन्न असे ॥ ह्मणोनि तूंचि तूं स्वप्रकाशें ॥ ज्ञेयज्ञानेंसहित ॥ ३९ ॥ सागरीं ज्ञानासी विगलें लवण ॥

हे लहरी रूपेंहि होय आपण ॥ तैसें स्व ज्ञानस्वरूप पूर्ण ॥ ज्ञालिया भिन्न नुगेचि ज्ञेय॥४०॥जसें पटावरी चित्र जालें॥तें काय तंतुनें असे सोडलें ॥ तैसें निजज्ञानें ज्ञेय जालें ॥ तें नव्हें वेगळे आपणाहूनी॥४१॥एवं ज्ञेयज्ञानासि आपण॥आपणाहुनी कांहीं नसे भिन्न ॥ जलतरंगन्यायें करून ॥ तस्माद्वैद नाहीं नाहीं ॥४२॥ याउपरी जिकडे पाहों जासी ॥ तिकडे आपणातेंसाचि देखसी ॥ येणें आश्चर्य तटस्थ होसी ॥ जालें श्रुतिसी तेंचि होईल ॥ ४३ ॥ ऐसें निरूपितां वसिष्ठमुनी ॥ प्रार्थिता जाहला कार्मुकपाणि ॥ जो जीवभेदअनुग्रहें करूनी ॥ सत्तास्वरूप मज कळलें ॥ ४४ ॥ तो मी सद्रूप सर्वांसि असे ॥ हें मज वाणलें नाहीं दृढ ऐसें ॥ यालागिं हेंचि दृढतर राहे कैसे ॥ कांहिएक साधन निरूपावें ॥ ४५ ॥ ऐसीं ऐकोनि श्रीरामवचनें ॥ वसिष्ठ सुखावला मनें ॥ त्याचे सुखाचेनि वोसंडगुणें ॥ करिताझाला निरूपण ॥ ४६ ॥

**ब्रह्माविष्णुशिवेंद्राद्याः सद्यः कुर्वंति सर्वदा ॥**
**सदाहं चिद्वपुः सर्वं करोमीत्त्येव भावय ॥ ७ ॥**

अगा दाशरथि जाण ॥ भावनात्मक अनुसंधान ॥ हेंचि येथ मुख्य साधन ॥ व्हावें साधन ये अर्थीं ॥ ४७ ॥ माझिये सत्तें सकलासी चळण ॥ तरी सकळ काय असे मजहुनी भिन्न ॥ माझेनी चित्प्रकाशें करून ॥ सकळ निर्माण होत असे ॥ ४८ ॥ माझिया चित्प्रकाशाचा अंश ॥ ज्या मनाचा ठाई निवास ॥ ब्र-

ब्रह्माविष्णुशिवसुरेश ॥ तेणें केले प्रकाशांश ॥ ४९ ॥ मग तो कि-रंची स्वसत्ता ॥ तत्काळ सृष्टिचा होय कर्त्ता ॥ स्वसामर्थ्यें ते सृष्टी पाळितां ॥ विष्णुसी सर्वथा नलगे वेळु ॥ ५० ॥ रुद्र आ-पुलें सामर्थ्य प्रौढी ॥ रचिली सृष्टी तात्काळ मोडी ॥ इंद्राची सत्ता केवढी ॥ चाले अष्टलोकपाळांवरी ॥ ५१ ॥ एवं मत्प्र-काशें जे होती ॥ ते सत्तारूपें सर्व ऐसें करिती ॥ मी मुख्यप्र-काश मीची मूर्ति ॥ अद्भुत अगाध ॥ ५२ ॥ सर्वकरी येथ नवल कोण ॥ माझेनी दृश्यासीं दृश्यपण ॥ चाळितें चळतें आणि चळण ॥ येणेंची पूर्ण मीचि असे ॥ ५३ ॥ मीची देखतां वि-श्वाच्या नयनीं ॥ मीचि ऐकतां विश्वाच्या श्रवणीं ॥ मीची सकळांच्या घ्राणीं ॥ गंधग्राहक सर्वात्मना ॥ ५४ ॥ सर्वांचा रसनेंद्रियद्वारें ॥ मीची रसस्वाद घेतां निर्धारें ॥ सकळांच्या त्वगिंद्रियाकारें ॥ मीच घेतसे स्पर्श पैं ॥ ५५ ॥ मीच सर्वांच्या करें करणीं ॥ मीची चाले विश्वाच्या चरणीं ॥ सर्वांचें वाचे करूनी ॥ बोलत असे मीची पैं ॥ ५६ ॥ सर्वांच्या गुदद्वारें करीं ॥ मीची विसर्गकर्म करी ॥ सकळ गुह्येंद्रियव्यवहारीं ॥ मीची संपादीं आनंदु ॥ ५७ ॥ एवं शब्दस्पर्शरूपरसगंधु ॥ वक्तव्यदान गमनविसर्गआनंदु ॥ हा मम विलासाचा विनोदु ॥ जैसा शब्द अक्षरेंसी ॥ ५८ ॥ तस्मात्सर्वरूपें मीची असतां ॥ सर्वाकारें मीची वर्त्तता ॥ सर्वव्यापार मीची कर्त्ता ॥ येअर्थी गीता प्रमाण ॥ ५९ ॥

सर्वतः पाणिपादांतं सर्वतोक्षिशिरो मुखम् ॥
सर्वतःश्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥ ८ ॥

त्रयोदशाध्यांई आपण ॥ काय बोलिला नारायण ॥ सर्वत्र त्याचे हस्तचरण ॥ सर्वत्र नयन त्यासी असती ॥ ६० ॥ सर्वत्र त्याचीं वदनें शिरें ॥ सर्वत्र त्याचे श्रवण निर्धारें ॥ एवं सर्वातें आवरूनी बरें ॥ अर्जुना असे चिद्रूप ॥ ६१ ॥ हे गीतासंमती घालुनी ऐसी ॥ टीकाकार ह्मणे श्रोतयांसीं ॥ ऐका काय श्रीरामासी ॥ वसिष्ठऋषी बोलतसे ॥ ६२ ॥ मीची सर्व सर्वांपरी ॥ मीची सर्वव्यापारें सर्व करीं ॥ ऐसी भावना निरंतरीं ॥ करावी तुवां श्रीरामचंद्रा ॥ ६३ ॥

अहं सर्वमिदं विश्वं परमात्माहमव्ययं ॥
न भूतो नास्ति नो भावोऽन्यदिति भावतः ॥९॥

मी हें होय विश्व सकळ ॥ परंतु विश्वविकारें नव्हे समळ ॥ ह्मणोनी मी परमात्मा केवळ ॥ अव्यय ह्मणिजे अविनाश ॥ ॥ ६४ ॥ भूतभविष्यवर्त्तमान ॥ मजहूनी कांहीं नसे आन ॥ भावनारूप अनुसंधान ॥ ऐसें करीं रघुनंदना ॥ ६५ ॥

एवं ब्रह्म चिदाकारं सर्वात्मकमखंडितं ॥
नीरंध्रं भूरि चाशेषमिति भावय यत्नतः ॥ १० ॥

अद्वितीय अतएव एक ॥ वरिष्ठ अतएव ब्रह्म सम्यक् ॥ आपणासची आपण प्रकाशक ॥ अतएव चिदाकारपें ॥ ६६ ॥ चिदाकार अतएव सर्वात्मक असे ॥ निर्विकार अतएव खंडन नसे ॥ खंडन नाहीं ह्मणोनि वसे ॥ निरंध्रत्व त्याच्याठाई ॥६७॥ एवं एक ब्रह्म चिदाकार ॥ सर्वात्मक अखंडित साचार ॥ तेंचि तें अशेषचराचर ॥ सानथोर तेंचि तें ॥ ६८ ॥ तें ब्रह्म मजसी अभिन्न ॥ तरी मीचि मी सकळपूर्ण ॥ ऐशामहत्प्रयत्नें करून ॥ अखंडभावना करावी ॥ ६९ ॥

**नाहं न त्वन्यदस्तीति ब्रह्मैवास्ति निरंतरं ॥**
**आनंदपूर्णः सर्वत्रेत्यनुद्वेगोनुपश्यति ॥ ११ ॥**

पिंडस्वरूपें जें अहंस्फुरण ॥ त्यासिच जीव हें अभिधान ॥ तो मी न दिसे ह्मणोन ॥ नाहं ऐसें बोलिलें ॥ ७० ॥ मजहूनी ब्रह्मांड आन ॥ तेणें ब्रह्मांडस्वरूपें ईश्वरपण ॥ तेंहि न दिसे ह्मणोन ॥ नान्यदस्ति बोलिलें ॥ ७१ ॥ जीवेश्वरविभाग न दिसे ॥ न दिसे तें ब्रह्मची दिसे ॥ एवं दिसतें न दिसणें यासी असे ॥ ब्रह्म सर्पसे निरंतर ॥७२॥ प्रकाश ह्मणतां निराभासु ॥ निराभास ह्मणतां प्रकाशु ॥ हा परस्परानुप्रवेशु ॥ निवडिला नवचे सर्वथा ॥ ७३ ॥ एवं प्रकाशनिराभासावेगळें ॥ उभययोगें तिसरें जालें ॥ तें काय बोलावें बोलें ॥ ह्मणोनी बोले आनंद ऐसे ॥ ॥ ७४ ॥ असो तेणें आनंदें परिपूर्ण ॥ ब्रह्म सर्वत्र विराजमान ॥

तें ब्रह्म पजसी अभिन्न ॥ हेचि भावना करावी ॥ ७५ ॥ भावनेनें पैं साचा ॥ उद्वेग सरेल अंतरिंचा ॥ मग अनुद्वेगें त्रिवाचा ॥ सर्वत्र देखसी आपणातें ॥ ७६ ॥ तस्मात्सर्वदा सावधानपणें ॥ हेंची येथ मुख्य साधन ॥ सावधानतें करून ॥ योगीयासी रूप पैं ॥ ७७ ॥ योगी अखंड सावधान पाहीं ॥ आणि सामान्यत्वें वर्तती इतरदेहीं ॥ येथ श्रीरामा तूं कांहीं ॥ ऐसी जरी घेसी आशंका ॥ ७८ ॥ योगी सावधान कां निरंतर ॥ सामान्यत्वें कां वर्तती इतर ॥ ऐसें भाविसी तरी प्रत्युत्तर ॥ ऐक सादर महामती ॥ ७९ ॥

## ग्राह्यग्राहकसंबंधात्सामान्यं सर्वदेहिनं ॥
## योगिनः सावधानत्वं यतो दर्शनमात्मनः ॥ ३ ॥

ग्राह्यग्राहकग्रहण ॥ येणें त्रिपुटीसंबंधें करून ॥ सकळदेहीं जें स्फूर्तीजाण ॥ सामान्यत्व असे पैं ॥ ८० ॥ तुमजोनी सहज स्वभावें ॥ असणें तेंची सामान्यत्वें पाहें ॥ असो सुषुप्ती जे आहे ॥ तेची सामान्यत्व पैं ॥ ८१ ॥ येणें सामान्यत्वें पाहीं ॥ वर्त्तताती सर्वदेही ॥ आतां जो योगी त्याच्याठाईं ॥ सावधानत्व कोण अर्थे ॥ ८२ ॥ त्रिपुटी ग्रासुनियां देख ॥ वृत्तिकारणें स्वरूपोन्मुख ॥ हाची प्रयत्न पैं चोख ॥ बोलिजे आत्मदर्शनाचा ॥ ॥ ८३ ॥ तेणें आत्मदर्शनप्रयत्नभावें ॥ योगी सावधान पावे ॥ त्या सावधानत्वाचे बरवें ॥ रूप करुनी दाविजेल ॥ ८४ ॥

निरसुनी अज्ञानसुषुप्ती ॥ जागृत होणें बोधस्थिती ॥ ते जागणें ये परम जागृती ॥ त्याचेनी नाम सावधान ॥८५॥ तेणें सावधानत्वें निरंतर ॥ वर्तताहोय योगीश्वर ॥ आणि त्यावेगळें प्राणी जे इतर ॥ ते सामान्यत्वें वर्तती ॥ ८६ ॥ यालागीं अयोध्यापुरपती॥ तूं अखंड राहें सावधानस्थिती ॥ हेंची सांगों स्फुटतर पुढती ॥ हाची कळस निरूपणाचा ॥ ८७ ॥ एवं आत्मदर्शनप्रकरण ॥ येथुनी जालें संपूर्ण ॥ आतां चिद्रूपनिरूपण ॥ कीजेल तें अव-धारीं ॥ ८८ ॥ ऐसा वसिष्ठमहामुनी ॥ जो महर्षिमाजी वरिष्ठ-पणीं ॥ जैसा माळेमाजी मुख्यमणी ॥ मेरुरूपें विराजे ॥ ८९ ॥ तो बोलोनी आचार्यपदासनीं ॥ वदत असे सुधाचाजन्यवचनीं ॥ नानापरीचीं गुणकल्पनी ॥ ते अमृततुषार अवगमले ॥ ९० ॥ वसिष्ठचंद्राचे स्फुर्तिकर ॥ श्रवणीं वचनामृततुषार ॥ तेणें स्वानंदें श्रीरामचकोर॥आनंद निर्भर होत असे ॥९१॥ नानाऐसीनव्हे उत्पत्ति श्रीरामचंद्रपूर्णमूर्ती ॥ देखोनी वसिष्ठसरितापती ॥ आनंदभरित उचंबळला ॥ ९२ ॥ असो तोची उचंबळला ॥ निरूपणमुखें रूपासी आला ॥ येउनी सहज समर्पिला ॥ श्रीरामाचा श्रीरामीं ॥ ९३ ॥ सद्गुरुचरणरजांकित ॥ माधवदास कृष्णनामांकित ॥ ह्मणेंपरियेसा काय जानकिकांत ॥ वसिष्ठमुखें ऐकता जाला ॥ ॥ ९४ ॥ इति श्रीयोगवासिष्ठसारे माधवदासकृतटीकायां आत्म-दर्शनप्रकरणन्नाम अष्टमप्रकरणं संपूर्ण ॥ ८ ॥ श्लो० १२ ॥ टी० ॥ ९४ ॥ एवं ॥ १०६ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसूर्यवरद ॥ योगीवर्ते सावधानस्थिति ॥ इतर सुषुप्तीभावें वर्तता ॥ हें प्रकरणाच्या अंतीं ॥ वसिष्ठें केलें निरूपण ॥ १ ॥ तें अवधारूनी रघुपती ॥ सुषुप्ति ह्मणजे जीव स्थिति ॥ इयेची स्पष्ट अभिव्यक्ति ॥ पुन्हां ऐकों इच्छिताजाहला ॥ ॥ २ ॥ रामेच्छा अंतगत ऐसी ॥ कळों आली वसिष्ठासी ॥ कां जे इच्छा आणि कळणें उभयांसीं ॥ एक असे अधिष्ठान ॥ ३ ॥ अक्षरें उच्चारितां जैसा ॥ अकारु असे अक्षराची सरिसा ॥ इच्छेचेनी सन्निधानें तसा ॥ असे जाणतां प्रकाशु ॥ ४ ॥ जैसा कुसुमीं असे मकरंदु ॥ कीं गुळीं असे गोल्यता स्वादु ॥ तैसा स्वप्रकाश आनंदकंदु ॥ इच्छेच्या ठाई वर्त्ततसे ॥ ५ ॥ ह्मणोनी श्रीरामें जो भाव कल्पिला ॥ तो वसिष्ठासी कळों आला ॥ कळोनी मग बोलता झाला ॥ एक श्रीरामा जीवाचें रूप ॥ ६ ॥

यस्मिन्देहेंद्रियादीनां संबंधः स्फुरति स्वतः ॥
अयं सोहमहमिति स जीवो मलगुंठितः ॥ १ ॥

स्वतः प्रवृत्तीचें जें स्फुरण ॥ तेणें स्फुरणेंकरून ॥ ज्याच्या ठाई भासमान ॥ देहेंद्रियादि संबंधु ॥ ७ ॥ तेणेंची आपणा आपण ॥ नकळे स्वतःप्रवृत्तीचें स्फुरण ॥ ह्मणोनी घेतला वेष्टून ॥ देहइंद्रियाभावें ॥ ८ ॥ त्याचेंनी प्रकाशें झाली ॥ परंतु त्यातें आवरून ठेली ॥ जैसीं नभिंहूनी अभ्रें उपजलीं ॥ परी आच्छादुनी ठेलीं नभातें ॥ ९ ॥ असो देहेंद्रियभावें आवरिला ॥

तो सहजची एकदेशी जाला ॥ एकदेशी ह्मणोनी भेदा आला ॥ आलिंगिला द्वंद्वभावीं ॥१०॥ मग ह्मणे तो मी साचा ॥ जो जन्मला उदरीं मायेचा ॥ हा प्रपंच अनेकरचनेचा ॥ मजसी असे वेगळा ॥ ११॥ अमुका नामरूपात्मक मी ॥ ऐसी पावोनि नाथिली ऊर्मी ॥ रूतला असंदेहधर्मी ॥ आपण आत्मा हेंचि विसरोनी ॥ १२ ॥ जैसा आरिसा मळें ग्वतेला ॥ तैसा संसारें जो आंवरिला ॥ एवं ऐसा समळ जाला ॥ तो जीव जाण निश्चयें ॥ १३ ॥ त्या जीवाचें निरसन ॥ आइक रघुपती सावधान ॥ सुरसवाक्प्रवाहें करून ॥ निरूपिजेल पुढिले श्लोकीं ॥ १४ ॥

## सर्वमेकं चिदाकारं ब्रह्मेति घननिश्चये ॥
## स्थितिं याते शमं याति जीवो निःस्नेहदीपवत् ॥२॥

हें जितुकें कांहीं दृश्य सकळ ॥ तितुकें चिद्रूपब्रह्म निखिल ॥ येणें निबिडनिश्चयें अमल ॥ स्वरूपस्थिति पाविजे ॥ १५ ॥ सर्वप्रकाश ब्रह्मचिद्घन ॥ तें ब्रह्म मजसी असे अभिन्न ॥ ह्मणोनि सकळात्मा मी परिपूर्ण ॥ हा अनुभव स्वरूपस्थितीचा ॥ १६ ॥ अनुभवलिया स्वरूपस्थिति ऐसी ॥ होय उपशमन जिवासी ॥ स्नेहाभावें दीकलिका जैसी ॥ विलयो पावे तत्काळ ॥ १७ ॥ तैसी जंववरी अज्ञानस्थिति ॥ तंववरी वर्त्ते जीववृत्ति ॥ अज्ञान सरलिया निश्चितीं ॥ राहों न शके जीवत्व ॥ १८ ॥ जीवाचा जीवभाव होय परता ॥ तें जीवचि ईश्वर आइता ॥ जैसें किडाळ

घोर्भूनि टाकितां ॥ असे सिद्धता साडंबरें ॥ १९ ॥ वसिष्ठ म्हणे गा रघुनाथा ॥ पूर्वी हा ईश्वरचि होता ॥ तो कैसा म्हणसी जरी आतां ॥ दृष्टांतेंसि अवधारीं ॥ २० ॥

स्वमहत्वं यथोपेक्ष्य कश्चिद्विप्रो दुरीहया ॥
अंगीकरोति शूद्रत्वं तथा जीवत्वमीश्वरः ॥ ३ ॥

जैसें आपुलें ब्राह्मण्य थोरपण ॥ टाकूनी कोणीएक ब्राह्मण ॥ अंगिकारी शूद्रत्व हीन ॥ दुराचारी होत्साता ॥ २१ ॥ तैसा जो सर्वेश्वर ॥ तो विसरोनी आपुलें पूर्णत्व ॥ पावला हीनजीवत्व ॥ देहाहंकारयोगें ॥ २२ ॥

असत्यमेवसंकल्पभ्रमेणेदं शरीरकं ॥
जीवः पश्यति मूढात्मा बालो यक्षमिवोत्थितः ॥ ४ ॥

जें नव्हे तें नव्हेचनाहीं ॥ ऐसें शरीर असत्य पाहीं ॥ संकल्पभ्रमें त्याच्याठाईं ॥ सत्यबुद्धि मानिली ॥ २३ ॥ सत्य शरीर मानून ॥ जीव करी अवलोकन ॥ असें आपुलें अज्ञान ॥ म्हणोनि मूढात्मा बोलिला ॥ २४ ॥ जैसें असत्यबागुलीं सत्यपण ॥ मानी बाळ करी अवलोकन ॥ जीवस्वरूपीं जो अज्ञान ॥ तो सत्यशरीर देखे तैसा ॥ २५ ॥ शरीर दृश्य तरी देखोंजाणे ॥ परी आपुलिया दृष्टत्वा नेणे ॥ तस्मात् शरीररूपेंचि त्याचें असणें ॥ हेंचि येथीचें तात्पर्य ॥ २६ ॥

हितबुध्या यथा पंके शिशुरभ्यस्य वल्पति ॥
अध्यस्यात्मनि देहादि मूढस्तद्वद्विचेष्टिति ॥ ५ ॥

जैसें बाळक अवधारीं । हितबुद्धि मानूनी अंतरीं ॥ चिखलामाजी क्रिया करी ॥ तेंचि परिसा रघुनाथा ॥ २७ ॥ देहेंद्रिय इत्यादि करून ॥ आपल्याठाईं आरोपून ॥ येकदेशित्व अवलंबून ॥ आचरे करणी अज्ञानजीव ॥ २८ ॥ कर्मकर्तेपणाचेनी आंगें ॥ शुभाशुभकर्म फळ भोगूं लागे ॥ त्या फळाचेनीयोगें ॥ लागे सुखदुःख समागम ॥ २९ ॥ तें सुखदुःखभोगावयाकारणें ॥ सदसच्छरीरें भोगयातनें ॥ धरी मग प्रसंगें तेणें ॥ जन्ममरणें अनंत पावे ३० ॥ मांडला जन्ममरणाचा ठसा ॥ ह्मणोनी वाढली जीवदशा ॥ स्नेहासिचनेंकरूनी जसा ॥ हुताशनु होय प्रज्वळित ॥ ३१ ॥ ये जीवदशेचा जेथूनी आरामु ॥ तोतरी मिथ्या संकल्पभ्रमु ॥ तेणे संकल्पभ्रमें जीवाश्रमु ॥ जन्ममरणात्मक मांडिला ॥ ३२ ॥ असत्य असे भ्रमरूप मूळ ॥ ह्मणोनी जीव हा असत्य केवळ ॥ हेंची कळे तै तत्काळ ॥ जीवत्व किडाळ हरपे ॥ ३३ ॥

चित्रसर्पत्वज्ञानेन न सर्पो भयदो भवेत् ॥
जीवःसर्पपरिज्ञातो न तथा सुखदुःखदः ॥ ६ ॥

चित्रीं सर्प लिहिला असे ॥ तो चित्रसर्प जैं कळे ऐसें ॥ तें सर्पजन्मभय कैसें ॥ देईल तो चित्रव्याळ ॥ ३४ ॥ तैसा शरी-

गाधिष्ठानीं भला ॥ आत्मसंगेंकरूनी लिहिला ॥ तो जीव सर्प कळों आला ॥ आत्मसंगाचाची ह्मणोनी ॥ ३५ ॥ तैं कैचें उ-रलें जीवसर्पपण ॥ सुखदुःभय देईल कोण ॥ तस्मादात्मतत्वें होय नाशन ॥ सुखदुःखेंसीं जीवत्वाचे ॥ ३६ ॥ जीवभ्रम आत्म यापासूनी झाला ॥ आणि आत्मत्वींची लयातें आला ॥ येची अर्थे येक स्मरला ॥ असे दृष्टांत तो आइक ॥ ३७ ॥

स्रजि सर्पो यथाऽध्यस्तस्तस्यामेवविलीयते ॥
आत्मनःप्रोत्थितो भेद आत्मन्येव विलीयते ॥७॥

जैसें अध्यस्त जें सर्पपण ॥ तें माळेचिपासाव उत्पन्न ॥ आणि माळेचिमाजी होय लीन ॥ हे माळा ऐसी कळलिया ॥ ३८ ॥ कीं भूषणें सुवर्णाचेपासुनी ॥ आणि सुवर्णची होय त्याची आ-टणी ॥ कीं तरंग निघे उदकाचेमधुनी ॥ आणि उदकींची विरे मागुता ॥ ३९ ॥ तो आत्मस्वरूप जो आपण ॥ त्याचेपासाव जीवभेद उत्पन्न ॥ आणि तेथेंचि पावे अस्तमान ॥ अहमात्मा येणेंनामें ॥ ४० ॥ यालागीं येक आत्माची साचार ॥ झाला असे अनेकाकार ॥ हेंची निरूपण सादर ॥ पुढिले श्लोकीं अवधारीं ॥ ४१ ॥

नैकरूपांगदाद्यश्चयथैकाहेमवास्थिता ॥
उपाधिभिरनेकोपि तथात्मैकस्वरूपकः ॥ ८ ॥

जसीं मुकुटकुंडलें आणि कंकणें ॥ नाग मुद्रादिक बाहुभू-

षणें ॥ इत्यादि अनेकरूपें नेणें ॥ येकची हेम विलासे ॥ ४२ ॥ तैसा जरी उपाधिभेद अनेक ॥ विचित्र नामरूपात्मक ॥ तरी आत्मा जो अरूपक ॥ त्याचाचि तो विलासु ॥ ४३ ॥

**शरीरावयवा यद्वद्विकाराश्च यथा मृदः ॥**
**अद्वैतं द्वैतवद्भाति तथा स्थावरजंगमं ॥९ ॥**

जैसे येकाची शरीराचे ॥ हस्तपादादि अवयव साचे ॥ कित्येकची मृत्तिकेचे ॥ घटभांडादी विकार ॥ ४४ ॥ तैसे ब्रम्ह जे अद्वैत ॥ त्याचेनि विलासले असे द्वैत ॥ त्या द्वैताचें रूप निश्चित ॥ जे स्थावरजंगमात्मक विश्व ॥ ४५ ॥ म्हणोनि द्वैताचियेपरी ॥ अद्वैतचि भासे निर्धारी ॥ अद्वैतचि द्वैताकारी ॥ येथ संदेह नाहीं नाहीं ॥ ४६ ॥ अद्वैतीं द्वैतरूप भासे ॥ यासी कारण काय असे ॥ ऐसें जरी म्हणसी तरी सुमानसें ॥ ऐक वा रामा रघुराया ॥ ४७ ॥ जे मनाचिया आंगामाझारी ॥ राहोनि संकल्पाचा निश्चय करी ॥ तेचि बुद्धि गा दशाननारी ॥ येथ कारण बोलावी ॥ ४८ ॥ संकल्पाचें दृढीकरण ॥ तेंचि बुद्धीचें लक्षण ॥ असो बुद्धीचेनियोगें करून ॥ द्वैतरूपें अद्वैत भासे ॥ ४९ ॥ मूळीं अहं हा संकल्प उठिला ॥ त्याचा बुद्धीनें निर्वाह केला ॥ येथुनी बोध चालिला ॥ द्वैतरूपें अद्वैताचा ॥ ५० ॥ एवं बुद्धिचेनी योगें अनेकाकार ॥ झाला येक आत्मा साचार ॥ पुढिले श्लोकीं हाची निर्धार ॥ दृष्टांतेंसि बोलिलासे ॥ ५१ ॥

मणितोयघृतादर्शेष्वेकमण्याननं यथा ॥
सममेकमिवात्मापि तथाधिष्ठानविंवतः ॥ १० ॥

सतेजमणी अथवा स्थीरजल ॥ अथवा आदर्श पैं अमल ॥ यांत पाहतां मुखकमल ॥ एकाचि दिसे दुसरेपणें ॥ ५२ ॥ तैसा येक असे संचला ॥ बुद्धिच्या ठाई द्वैतरूप विंबला ॥ असो ऐसा बुद्धियोगें जाला ॥ येकाचि अनेकाकार ॥ ५३ ॥ बुद्धिच्या गुणीं झाला सगुण ॥ ह्मणोनि पावला अनेकपण ॥ बुद्धीच गुण म्हणसी कवण ॥ तरी महत्तत्वादि तत्वें ॥ ५४ ॥ एवं बुद्धिचेनि गुणें सगुण ॥ झालासे ये अर्थी दृष्टांत कवण ॥ म्हणसी तरी सादर करी श्रवण ॥ पुढिले श्लोकीं श्रीरामा ॥ ५५ ॥

धूलिधूमांबुदैर्यद्वन्मलिनं क्रियते नभः ॥
परामृष्टस्तथैवात्मा विशुद्धः प्रकृतेर्गुणैः ॥ ११ ॥

धूलिधूमांबुधरीं कवण ॥ जैसें समळ होय अमळ गगन ॥ तैसा आत्मा विशुद्ध निर्गुण ॥ होय सगुण प्रकृतिचा गुणीं ॥ ॥ ५६ ॥ बुद्धि आणि प्रकृती ॥ ये नामेंचि भिन्न असती ॥ परंतु दोन्ही मिळोन व्यक्ति ॥ येकरूपची जाणावी ॥५७॥ असो स्त्रियेचागुणीं लोधला ॥ लोधोनी गुणवंत झाला ॥ कैसा पाहाहो हा दादुला ॥ जो उदरा आला स्त्रियेच्या ॥ ५८ ॥ मज पुरुषाचा जो प्रकाशु ॥ तो प्रकृतीचा विलासु ॥ ऐसे गाई-

स्थ महापुरुषु ॥ करी प्रकृतिचेनी संगें ॥ ५९ ॥ त्रीन्ही हातीं मुख्य करण ॥ म्हणोनी पुरुष तिये अधिष्ठान ॥ ते जैसें जैसें करी वर्त्तन ॥ तैसातैसा आपण अनुसरे ॥ ६० ॥

आद्यंतवर्ति देहेसौ तथाभूत इवेक्ष्यते ॥
वीचिमत्यंभसि स्तब्धो यथा भात्यचलोपि वा॥१२॥

आद्यंतवंत शरीरप्रमाण ॥ जें हा प्रकृती होउनी ठाय आपण ॥ तैं पुरुषही तेथ तैसाची होऊन ॥ अवलोकन करीतसे ॥ ६१ ॥ द्रष्टेपण तरी व्यक्ती ॥ आणि प्रकाश तरी न हरवी ॥ असो प्रकृतिरूपेंची दावी ॥ आपणातें पुरुष ॥ ६२ ॥ आपुलेनि देखणेपणें भूपाळा ॥ तो प्रकृतिसारिखा होय आंधळा ॥ आपुलेनि आइकतपणें जाला ॥ प्रकृतिसारिखा बधिर ॥ ६३ ॥ आपुलेनि वाचकत्वेंकरून ॥ धरी प्रकृतिसारिखें मुकेपण ॥ आपुलेनि ज्ञातृत्वें जाण ॥ होय अज्ञान प्रकृतिसारिखा ॥ ६४ ॥ आपुलेनि अभोक्तेपणें जगीं ॥ प्रकृतिसारिखा होय भोगी ॥ आपुलेनि अकर्तृत्वें प्रकृतियोगीं ॥ प्रकृतिसारिखा होय कर्त्ता ॥ ६५ ॥ आपुलेनि अरूपत्वें निश्चित ॥ प्रकृतिसारिखा रूपवंत ॥ आपुलेनि निर्गुणत्वें होत ॥ प्रकृतिसारिखा गुणवंतु ॥ ६६ ॥ आपुलेनि अनामत्वें जरी ॥ होय प्रकृतिसारिखा नामधारी ॥ आपुलेनि पंगुत्वें व्यवहारीं ॥ चाले प्रकृतिसारिखा ॥ ६७ ॥ जैसें न सांडोनि आपुलें स्थिरपण ॥ लहरी रूपें चंचळ जिवन ॥

तैसी निश्चळता सोडून ॥ प्रकृतिरूपें चळे पुरुष ॥ ६८ ॥ एवं प्रकृति योगें पुरुष चळे ॥ पुरुषाचेनि देखती प्रकृतीचे डोळे ॥ तस्मात् पुरुषभोग मेळे ॥ प्रकृति होय पुरुषरूप ॥ ६९ ॥

अग्निसंगाद्यथालोहमग्नित्वमुपगच्छति ॥
आत्मसंगात्तथा गच्छत्यात्मानमिंद्रियादिकं ॥१३॥

अग्निचेनि सन्निधानें जसें ॥ लोह अग्नित्वपावे कैसें ॥ पुरुषाचेनि संयोगें तसें ॥ प्रकृति पावे पुरुषत्वा ॥ ७० ॥ इंद्रियादिसमुदावो ॥ हा बोलिजे प्रकृतिभावो ॥ असो आत्मयोगें करूनि पाहाहो ॥ आत्मरूप होती इंद्रियादिकें ॥७१॥ एवं प्रकृतियोगें पुरुष न भासे ॥ परंतु पुरुषाचेनि प्रकृतिविलासे ॥ आणि पुरुषयोगें प्रकृति ग्रासे ॥ परि पुरुष नसे तियेविण ॥ ७२ ॥ म्हणोनि आत्मावलोकन ॥ न घडे दृश्यावलोकना वांचून ॥ हाचि प्रमेय निरूपण ॥ पुढिल श्लोकीं कीजेल ॥ ७३ ॥

अदृश्यो दृश्यते राहुर्गृहीतेन यथेंदुना ॥
तथानुभवमात्रात्मा दृश्यानात्मावलोकते ॥१४॥

जसा चंद्रयोगें चंद्रग्रहणीं ॥ अदृश्य राहु देखिजे नयनीं ॥ कीं उपाधियोगें करूनी ॥ होय अग्नीचें दर्शन ॥ ७४ ॥ तसा जो अदृश्य आत्मा अगुण ॥ जो न साहे तर्काचें अनुमान ॥ त्याचें अनुभवेंची घडे दर्शन ॥ म्हणोनी अनुभवमात्रात्मा ॥७५॥

त्याचें अवलोकन म्हणजे प्रतीती ॥ जे या दृश्याचेनीच निश्चिती ॥ दृश्यशब्दें बोलिजे प्रकृति ॥ अदृश्यशब्दें पुरुष पैं ॥ ७६ ॥ तस्मात् अदृश्याचें दर्शन ॥ नघडे दृश्यरूपप्रकृतिविण ॥ दृश्येंची अदृश्यावलोकन ॥ होय येथ संदेह नाहीं ॥ ७७ ॥ जैसीं अक्षरें दवडूनी परती ॥ शब्द बोलतां नये व्यक्तीं ॥ तैसी दृश्य निडारूनी प्रतीती ॥ नघडे अरूपा आत्मयाची ॥ ७८ ॥ एवं दृश्यरूप अदृश्यासी ॥ आतां अदृश्यें रूप दृश्यासी ॥ कैसें म्हणसी तरी आदरेंसी ॥ पुढिले श्लोकीं अवधारीं ॥ ७९ ॥

# आत्मनो जडसंयोगादनात्मत्वंजडस्य च ॥ स्यादात्मयोगादात्मत्वं जलाग्न्यो संगवन्मिथः १५

आत्मयाचेनी आडपणें ॥ जडदृश्यासी अनात्मा म्हणणें ॥ अतएव आत्मयातें सोडूं नेणे ॥ जडदृश्यरूपी अनात्मा ॥ ८० ॥ अनात्मा न सोडी आत्मयासी ॥ तैं अनात्म हें बोलणें नघडे त्यासी ॥ एवं आत्मयोगें आत्मत्वासी ॥ पावे जडदृश्य निर्धारें ॥८१॥ जैसा आपुलेनी जडत्वें जाण ॥ जळातें भेदी हुताशन ॥ परंतु सर्वथा आपण ॥ उदकासारिखा हो नेणें ॥ ८२ ॥ आणि अजडांशरूपी जो आपण ॥ तो आपणासारिखें तरी करी जीवन ॥ तेव्हां जळ आणि उष्णपण ॥ दोन्ही मिळोनी अग्निची होय ॥ ८३ ॥ तैसा आत्मा आपुलेनी अजडपणें ॥ अजडदृश्यासी भेदूं जाणे ॥ परंतु जडासारिखा हों नेणें ॥ अजडरूपी

आपणा ॥ ८४ ॥ आणि आपुलेनी प्रकाशें चांगें ॥ दृश्यासी तरी करी आपणासारिखें ॥ ह्मणोनी श्रीरामा तुवां देखे ॥ आत्माची असे स्वतःसिद्ध ॥ ८५ ॥ निर्विभाग चिद्रूप संचलें ॥ तें जडाजडरूपें कां भासलें ॥ ऐसें जरी ह्मणसी तरी भलें ॥ ऐक श्रीरामा प्रत्युत्तर ॥ ८६ ॥

अमत्यजडचेत्यांशलयनाचिद्वपुर्जडां ॥
महाजलगतत्वमिरपिरूपंसमुद्याति ॥ १६ ॥

असत्य चेत्य जडरूप जें ॥ त्यांत चेतवी तें चिद्रूप बोलीजे ॥ तें चिद्रूप दृष्टी देखीजे ह्मणोनी आलें जडपणा ॥८७॥ दृष्टीचे डोळची प्रकाश ॥ अत एव दृष्टी लेचिाहत्याशु ॥ आणि दृष्टीनें जो भासे भासु॥तोही असे चिद्रूप॥८८॥ चिद्रूप दृष्टिसी दृश्य जालें॥ हें याचि लागीं बोलतां आलें ॥ आणि दृष्टिविषयें विभागलें॥ ह्मणोनी पावलें जडत्व ॥ ८९ ॥ जैसा कल्पांतीं जलगत अग्नि असे ॥ असे परी स्वरूपें न दिसे ॥ न दिसे तरी ह्मणों वसे ॥ कल्पांवृतें त्याचे पोटीं ॥ ९० ॥ जडातें व्यापक चिद्रूप तैसें ॥ जडत्वीं कदा न दिसे ॥ न दिसे ह्मणों तरी असे ॥ जड तें चिद्रूपाचे पोटीं ॥ ९१ ॥ एवं दृष्टिचेनियोगें परीयेसी ॥ चिद्रूप आलें जडत्वासीं ॥ आणि जडत्वयोगें निश्चयासी ॥ अजड अशी झाली सज्ञान ॥ ९२ ॥ परंतु जड जडसी तत्वतां ॥ येकची प्रकाश निरुता ॥ ह्मणूनी अजडीं असे जडता ॥ जडत्वाआड वर्त्तमान ॥ ९३ ॥

इक्षौ गुडस्तिले तैलं काष्ठे वन्हिर्यदृच्छया ॥
धेनावाज्यं वपुष्यात्मा लभते तत्प्रयत्नतः ॥१७

जैसा इक्षुदंडींजाण ॥ गुड असे वर्त्तमान ॥ कीं तिळाच्या
आंगीं अलिप्तपणें ॥ तेलचि असे जैसें ॥ ९४ ॥ कीं काष्ठामाजी
अग्नी वसे ॥ कीं पाषाणीं लोह जैसे ॥ किं धेनुच्याठांई आज्य
असे ॥ ये शरीरीं तैसें आत्मस्वरूप ॥ ९५ ॥ तें तुज श्रीरामा ये
शरीरीं ॥ प्राप्त होईल सुपरी ॥ तो प्रयत्न ह्याची जो निरंतरीं ॥
सद्गुरुचरणसेवन ॥ ९६ ॥ जैसा इक्षुदंड घाणा गाळिजे ॥ तैं
गुळलाभ प्रत्यक्ष पाविजे ॥ तैसा ये देहीं आत्मा अनुभविजे ॥
गुरुचरणसेवा येणें प्रयत्नें ॥ ९७ ॥ जैसा काष्ठ मंथोनी अग्नी
उपजिजे ॥ किं पाषाणघार्कीं लोह पाविजे ॥ तैसा या देहीं आत्मा
अनुभविजे ॥ गुरुचरणसेवा येणें प्रयत्नें ॥ ९८ ॥ जैसें तिला-
चें मर्दन कीजे ॥ मग स्नेहलाभ प्रत्यक्ष पाविजे ॥ तैसें
ये देहीं आत्मा अनुभविजे ॥ गुरु चरणसेवा येणें प्रयत्नें ॥ ९९ ॥
जैसें धेनूचें दोहन राकीजे ॥ मग आज्यलाभ प्रत्यक्ष पाविजे ॥
तैसा ये देहीं आत्मा अनुभविजे ॥ गुरुचरणसेवा येणें प्रयत्नें ॥
॥१००॥ अगा आकर्णी रघुवीरा ॥ देहीं आत्मबोध होय पुरा ॥
तें शरीर इंद्रिय मनोधारा ॥ प्रबोधचि बोमंड ॥ १ ॥ बोमंड
असें बोलिलें ॥ तरी झणी ह्मणसील कोठूनि आलें ॥ नानाठाय
तेथेंच संचलें ॥ इंद्रियांचें प्रकाशक ॥ २ ॥

स्फटिकात्मनिरंध्रंचस्थितंखङ्गस्यतेयथा ॥
तथासर्वपदार्थेषुचिद्रूपःपरमेश्वरः ॥ १८ ॥

जैसा पाहतां स्फटिकग्रहविलासु ॥ बाहेर दिसे अंतरींचा प्रकाशु ॥ तैसा आत्मा देहीं स्वयंप्रकाशु ॥ इंद्रियद्वारा बाहिर दिसे ॥ ३ ॥ अथवा पाहतां सच्छिद्रग्रहाभासु ॥ रंध्रीं दिसे अंतरिंचा अवकाशु ॥ तैसा देहिंचा आत्मा स्वयंकाशु ॥ इंद्रियद्वारा बाहेर दिसे ॥ ४ ॥ असो इंद्रियें करून उपलक्षण ॥ बोलिलों देहेंद्रियप्रमाण ॥ या पदार्थांचे ठाईं परिपूर्ण ॥ नांदे चिद्रूप परमेश्वर ॥ ५ ॥

बहिरंतःस्फुरज्ज्योतिरंतःकुंभप्रदीपवत् ॥
स्वप्रकाशस्तथैवैकरूपआत्मा मनोगतः ॥ १९ ॥

जैसा सच्छिद्रघटींचा दीपकु ॥ बाह्यांतरीं प्रकाशयेकु ॥ तैसा शरीरस्थ आत्म प्रकाशकु ॥ बाह्यअंतरीं विराजे ॥ ६ ॥ प्रकाश रूपें अंतरीं वसे ॥ इंद्रियमनोमयें बाहेर दिसे ॥ तव बाह्याभ्यंतरीं असे ॥ चिदेकरसें संपूर्ण ॥ ७ ॥

दर्पणे बिंबितो ह्यर्कः प्रकाशं कुरुते यथा ॥
तथा प्रकाशमत्यात्मा स्वछंदी प्रतिबिंबितः॥२०॥

दर्पणीं बिंबे चंडांशु ॥ जैसा प्रकाशीं मुख्य प्रकाशु ॥ तैसा आत्मा चिद्विलासु ॥ अंतर्यामीं होतसे ॥ ८ ॥

यत्र स्थितेयं विश्वश्रीः प्रतिभामात्ररूपिणी ॥
रज्जौ भुजंगवद्भाति योयमात्मा सदोदितः ॥२१॥

त्या आत्मया नभसन्निभा ॥ त्याच्याठाई ईश्वरशोभा ॥ असे कैसी जैसी प्रतिभा ॥ आपुलिया आंगिंची ॥ ९ ॥ रज्जुसर्प बोलिजे दोरी ॥ ते जैसी भासे भुजंगाचियेपरी ॥ तैसी हे विश्वशोभा अवधारीं ॥ प्रतिभारूप असे जेथ ॥ १० ॥ तोचि हा आत्मा सदोदितु ॥ जाण अयोध्याधिप तूं ॥ हा घोडा हा गाउतू ॥ करूनि वसिष्ठ दावीतसे ॥ ११ ॥

आद्यंतरहितः शुद्धश्चिद्रूपो निर्विकल्पकः ॥
आत्मा निरूपिताकारो जीवस्याद्यः परात्परः ॥२२॥

पुनरपि ह्मणे रामचंद्रासी ॥ तो आत्मा कैसा परियेसीं ॥ जो नातळे आद्यंतासी ॥ नित्य सदोदित ह्मणोनी ॥ १२ ॥ शुद्ध अद्वयानंदपणें ॥ चिद्रूप अखंड बोधगुणें ॥ सदा कल्पिला नवचे स्वमनें ॥ अतएव निर्विकल्पक ॥ १३ ॥ अंतर्यामीं ह्मणोनि आत्मतत्वखरें ॥ आत्मा ह्मणोनि व्यापक निर्धारें ॥ व्यापक ह्मणोनि निरोपिताकारें ॥ थोर वडिवारें विराजे ॥ १४ ॥ जो हा जैसा निरूपीला ॥ तैसा त्यातें समाधानातें आला ॥ ह्मणोनि निरूपिताकारें निरूपीला ॥ सर्वत्र चिद्रूपपणें ॥ १५ ॥ मीमांसक काळनिरूपण करिती ॥ कर्मचीं प्रधान बोलती ॥ कर्मरूपची

तयाप्रती ॥ समाधानस्थिति बोलिला ॥ १६ ॥ नैय्यायीक नि-
रूपण करिती ॥ जीवेश्वरभेद प्रतिपादिती ॥ भेदरूपेंची तया
प्रती ॥ समाधानस्थिति बोलिला ॥१७॥ बौद्ध निरूपण करिती ॥
शून्यची प्रधान बोलती ॥ शून्यरूप तयांप्रती ॥ समाधानस्थिति
बोलिला ॥ १८ ॥ जैन निरूपण करिती ॥ अर्हन् ऐसें प्रति-
पादिती ॥ अर्हनरूपेंची तयांप्रती ॥ समाधानस्थिति बोलिला ॥
॥ १९ ॥ सांख्य निरूपण करिती ॥ तत्वविभाग बोलती ॥
तत्वविभागरूपेंची तयांप्रती ॥ समाधानस्थिति बोलिला ॥ २० ॥
वेदांती निरूपण करिती ॥ सकलांसी ब्रह्म प्रतिपादिती ॥ ब्रह्म-
रूपेंची तयाप्रती ॥ समाधानस्थिति बोलिला ॥ २१ ॥ त्याग
योगी निरूपण करिती ॥ त्यागच प्रधान बोलती ॥ त्याग
योगें तयांप्रती ॥ समाधान स्थिति बोलिला ॥ २२ ॥ भोगीयोगी
निरूपण करिती ॥ राजयोगच प्रधान बोलती ॥ तेणेंची
रूपें तयांप्रती ॥ समाधानस्थिति बोलिला ॥ २३ ॥ योगयोगी
निरूपण करिती ॥ हठयोगची प्रतिपादिती ॥ तेणेंचिरूपें तयां
प्रती ॥ समाधानस्थिति बोलिला ॥ २४ ॥ असो निरूपिताकारें
एवंविध ॥ विराजे आत्मा स्वतःसिद्ध ॥ तस्मात् एकपणाचा संबंध
तत्लागे अतएव निरोपिताकारें ॥ २५ ॥ ऐसनी सर्वदिशन्वेंपाहीं ॥
अभावासी ठाव नाहीं ॥ याल्लागीं अज्ञान जीव जो कांहीं ॥
आत्मयाचेंही अधिष्ठान ॥ २६ ॥ निजरूपें सुषुप्तिसी अधिष्ठिता ॥

अतएव परावाचेहुनी परता ॥ परात्पर हें बोलतां ॥ आलें याचि कारणें ॥ २७ ॥

**आत्मा विशुद्धचैतन्य स्वरूपः शाश्वतो विभुः ॥**
**स्वयंज्योतिस्वभावोर्कः प्रकाशेत प्रकाशकः ॥२३॥**

मागुतेन तो आत्मा कैसा पाहे ॥ जो ईश्वरत्वही न साहे ॥ सदा द्वंद्वातीत राहे ॥ ह्मणोनी विशुद्ध बोलिजे ॥ २८ ॥ चेत्य चेतव्य चेतांशगुणें ॥ अतएव त्यासी चैतन्य ह्मणें ॥ आपुलेनी स्वरूपें अन्यरूप नेणे ॥ याकारणें तो चित्स्वरूप ॥ २९ ॥ जैसें डोळे उघडित मिळविता ॥ नव्हे प्रगट डोळे त्याविनां ॥ तसा विश्वोदय नाशें निजसत्ता ॥ परोक्षापरोक्ष नव्हे जे ॥ ३० ॥ हा शाश्वत या पदार्थाचा अर्थ ॥ आतां विभु ह्मणजे समर्थ ॥ समर्थाचा भावार्थ ॥ हाची जो सकलद्रष्टा ॥ ३१ ॥ जसें अल्प यौवन वार्धक्य शरीरीं ॥ पावे त्यासी नानकें शरीरधारी ॥ तसा ज्ञाता ज्ञान विकारी ॥ जो निर्विकार न विकारें ॥ ३२ ॥ निजप्रकाशीं ज्याची प्रवृत्ती ॥ ह्मणोनी बोलिजे स्वयंज्योती ॥ स्वयं-म्हणजे निश्चिती ॥ स्वभावरूपी बोलिला ॥ ३३ ॥ नुमजतां अथवा उमजतां ॥ बुद्धिबोधक असे सत्ता ॥ म्हणोनी आलें बोलतां ॥ अर्कप्रकाश ऐसा ॥ ३४ ॥

**आत्मानुभवमात्रात्मा सर्वगः सर्वसंश्रयः ॥**
**आकाशोपमचैतन्यव्यतिरिक्तो न लोष्टवत् ॥२४॥**

मागुतेन तो अंकिलक्षण ॥ अनुभवकरणीं प्रमाण ॥ प्रमेयरूप असे आपण ॥ ह्मणोनि अनुभवमात्र आत्मा ॥ ३५ ॥ अनुभव सर्वसाधारण ॥ असे सर्वदेहीं जाण ॥ तोचि करूनी प्रमाण ॥ नांदे आपण सर्वगतत्वें ॥ ३६ ॥ आतां जें केलें प्रमाण ॥ त्यासी आधार असे कवण ॥ ऐसें ह्मणसी तरी तोचि अधिष्ठान ॥ अतएव आश्रय सर्वांचा ॥ ३७ ॥ जैसी सांडूनि उदकाची संगती ॥ होऊं न शके रसनिष्पत्ती ॥ तैसी नचले विश्वप्रवृत्ती ॥ आत्माश्रयावेगळी ॥ ३८ ॥ जैसी महाभूतें पृथकभूतीं ॥ प्रविष्टें परी अप्रविष्ट असती ॥ तैसा प्रवृत्तिचा आश्रयो परी नये व्यक्ती ॥ वृत्तिसंयोगें करूनी ॥ ३९ ॥ प्रवृत्तियोगीं अयोग्यता ॥ ह्मणोनि त्याच्याठाईं अरूपता ॥ अरूपतेस्तव तत्वतां ॥ आकाशासारिखा बोलिजे ॥ ४० ॥ आकाशासारिखा असे ॥ परी निबिडप्रकाशें वसे ॥ निबिडप्रकाश अतएव नसे ॥ जडाजडाची कल्पना ॥ ४१ ॥ चेत्य जें चैतन्य त्याहूनी अतीत ॥ असे जें कांहीं जडलोष्टवत् ॥ त्यातेंहि सोडूं नेणें निश्चित ॥ जो नभोपम प्रकाशरूपी ॥ ४२ ॥ यालागीं जडाजड कल्पना ॥ आकळों न शके त्या निर्गुणा ॥ या व्यतिरेकाच्या खुणा ॥ अन्वयसुजाणा दाविला ॥ ४३ ॥

**ब्रह्मणीदं यथा वायुः सर्वभूतगतस्तथा ॥**
**स एवभगवानात्मा तंतुभूतो यथा पटः ॥ २५ ॥**

जैसीं वायुचेनि आश्रयभूतें सकळ ॥ असती चेष्टती सर्वकाळ ॥ तैसें ब्रह्मीं हें जगद्व्याळ ॥ असे चेष्टे ब्रह्मसत्त्वें ॥ ४४ ॥ वायुदृष्टांतें ऐसें तरी आहे ॥ परी जगत्वाची घाणी न साहे ॥ कां जें भेदाचें मुख न पाहे ॥ अखंड राहे स्वप्रकाशें ॥ ४५ ॥ एवं आत्मत्वाचेनि निबिडपणें ॥ जगद्रूप असोनी जगातें नेणें ॥ पटरूप असे परी पटाचें देखणें ॥ नलगे जैसें तंतूतें ॥ ४६ ॥ तंतु न देखे पटातें ॥ तैसा जो नेणे जगातें ॥ श्रीरघुनाथा जाण निरुतें ॥ तोचि आत्मा भगवंत ॥ ४७ ॥ जो दृष्टिप्रकाशाहून अतौता ॥ जो महातेजाहून परता ॥ हेंचि सांगिजेल आतां ॥ अग्रे सावधान होईं ॥ ४८ ॥

**यथैव चिद्घनाभोगं भूपणे व्योम्नि भास्करे ॥**
**धराविवरकोशस्थाः सैव चित्कीटकोदरे ॥ २६ ॥**

चिद्गगनाचें अंग गगन ॥ त्या गगनाचें भास्कर भूपण ॥ त्या भास्कराचे ठाईं वर्तमान ॥ असे महातेज ॥ १४९ ॥ चतुर्दशभुवनकुहरीं ॥ जें नांदत असे आंतबाहेरीं ॥ येवढें जें तेंहि मनाच्या उदरीं ॥ असो सूपरी सांठवलें ॥५०॥ तें मन पाहतां चिदंबरीं ॥ असे खद्योताचियेपरी ॥ एवं महातेजाहूनि दूरी ॥ आत्मस्वरूप तें असें ॥ ५१ ॥ आतां चिदंबरापासूनि मन ॥ त्या मनाआंत चिदंबर जाण ॥ मनापासुनी महातेज गहन ॥ त्यातें जाण तूं चिद्रूप ॥ ५२ ॥ तेजापासूनि सूर्य प्रकाशे ॥ त्या सूर्याआंत

चिद्रूप असे ॥ सूर्यापासाव दृष्टि विलासे ॥ आत्मा असे दृष्टिही अांत ॥७३॥ एवं दृष्टीनें जो देखता ॥ तोचि असे दृष्टिअतीता ॥ आणि तोचि महातेजातून परता ॥ पाव रघुनाथा येचिखुणें ॥७४॥ तस्मात् स्वप्रकाशें अकल्पपूर्ण ॥ तेथ अधऊर्ध्वभाग बोलेल कवण ॥ हेंचि पुढें निरूपण ॥ करीं श्रवण भरताग्रजा ॥ ७५ ॥

न बंधोस्ति न मोक्षोस्ति ब्रह्मैवास्ति निरंतरं ॥
नैकमस्तिन वैद्वैतं संवित्स्फारविजृंभते ॥ २७ ॥

अधोर्ध्वभाग नदिसती ॥ कोणासी बंध कोणासी मुक्ति ॥ ब्रह्मणोनि संबंधमोक्षस्थिति ॥ ब्रह्मास्थाननिरंतर ॥ ७६ ॥ जीवनाशें केवी पीडी तृषा ॥ रवि अंधारीं बुडेल कसा ॥ तेवी आत्मया स्वप्रकाशा ॥ बंधभाव बोलोंचि नये ॥ ७७ ॥ एवं बंधमोक्षाअतीत ॥ ब्रह्मचि असे अखंडित ॥ अतएव तेथ द्वैताद्वैत ॥हेउपपत्ति नसमावे ॥ ७८ ॥ संवित्स्वरूपें साचार ॥ सकळहि ब्रह्माचा विस्तार ॥ तेथ बंधमोक्षादि विकार ॥ कोठूनि कैसें बोलावें ॥ ७९ ॥ पीयूषाचे सागरीं ॥ बोलोंचि नये विषाच्या लहरी ॥ तैसीबंधमोक्षाची कुसरी ॥ नये चिदंबरीं बोलतां ॥ ८० ॥

ब्रह्मचिद्ब्रह्मभुवनं ब्रह्मभूतपरंपरा ॥
ब्रह्माहं ब्रह्म मच्छत्रुर्ब्रह्ममन्मित्रबांधवाः ॥ २८ ॥

तें चिदंबर ब्रह्म पूर्ण ॥ ह्मणोनि चिद्ब्रह्म हें अभिधान ॥ तेंचि चिद्ब्रह्म त्रिभुवन ॥ येथ संशय नधरीं गा ॥६१ ॥भुवनाहूनी परता प्रकाशु ॥ एवं अवकाश प्रकाशु भुवनाभासु ॥ ह्या अवघा विलासु ॥ चिद्ब्रह्माचा ॥६२॥ तेणेंचि ब्रह्में आवरलें ॥ ह्मणोनी मीपण ब्रह्मत्वा आलें ॥ असो आतां मी ब्रह्म हेंचि भलें ॥ येणेंचि विचारें बोलों आतां ॥ ६३ ॥ ब्रह्ममय झालें मीपण ॥ तरी रितें काय उरलें माझें पण ॥ अहंमम येणेंसीं ब्रह्म पूर्ण ॥ हेंचि वचन निर्णयाचें ॥६४॥ संसार हाचि शत्रु निर्धारें ॥ सत्यभावार्थ हेंचि मित्र सोयरें ॥ मी ब्रह्म या स्थिति पाहीं जेवनपुरें ॥ तव देखे ब्रह्माकारें अरिमित्र ॥६५॥ अगाश्रीरामा रणकर्कशा॥ एक बापा कोशल्येशा ॥ मीपण मुसींब्रह्मठसा ॥ ओतितेंऐसें होय ॥ ६६ ॥ ह्मणोनी ब्रह्मसंयोग मीपणीं ॥ करीसर्वथा कार्मुकपाणी ॥ अन्यथा वियोगें करुनी ॥ बंधातेंचि पाविजे ॥ ६७ ॥

**विचैत्यकलनाबंधस्तन्मुक्तिर्मुक्तिरुच्यते ॥**
**चिदचैत्याखिलात्मेति सर्वसिद्धांतसंग्रहः ॥ २९ ॥**

जें ज्ञान देहामाजी कोंडलें ॥ तेंचि चिद्रूपचैत्यें आकळिलें ॥ त्यासीचि बंधु ऐसें बोलिलें ॥ जीवत्व आलें तेणेंचि योगें ॥ ६८ ॥ आणि ज्ञेय ग्रासूनि ज्ञान उरलें ॥ तेंचि चिद्रूप चैत्यें सोडिलें ॥ ऐसी जे मुक्ति तेंची भलें ॥ मुक्तिपद बोलिजे ॥ ६९ ॥ एवं पिंडज्ञान मिळे ब्रह्मांडासी ॥ ब्रह्मांडज्ञान मिळे अवकाशीं ॥ यावरी चिद-

चिदात्मक सकळेंसी ॥ उरे येक चिदंबर ॥ ७० ॥ यालागीं चिदचिदात्मक अखिल ॥ आत्मस्वरूपची जाण निखिल ॥ हाची वक्तव्य किरीटी अमल ॥ सर्व सिद्धांतसंग्रह ॥ ७१ ॥ आणि येक चमत्काराचें बोलणें ॥ श्रवण करी येकाग्रमनें ॥ अखंडित समाधी तेणें ॥ तुझ्याठाई वाणेल ॥ ७२ ॥

यदा तु यद्भाति यदा स्वरूपं यच्चात्मना भाति यदेतदस्ति ॥ स्वभावसंवित्प्रतिभाति केवलं ग्राह्यं ग्रहीतेति मृषाविकल्पः ॥ ३० ॥

निरवयव म्हणोनी सूक्ष्मगुणें ॥ जें असे परिपूर्णपणें ॥ आणि सचळनी मनें ॥ दृश्याकारें जें दिसे ॥ ७३ ॥ जें सर्वात्मना आपणची आपण ॥ अतएव आत्मरूपत्वें प्रतीयमान ॥ तेणें आत्मप्रत्ययें करून ॥ निदर्शनीं जें दिसे ॥ ७४ ॥ दिसोनी हें जें असे कांहीं ॥ पाहतां अन्वयव्यतिरेकें इतुकेंही ॥ सर्वथा आणिक दुजें नाहीं ॥ संवित्प्रभेवांचुनी ॥ ७५ ॥ अनन्यप्रकाशें विण ॥ सम्यक्प्रकारें जें ज्ञान ॥ तेंची संवित्स्वरूप जाण ॥ प्रतिभा ह्मणजे प्रभा पैं ॥ ७६ ॥ एवं सम्यक्ज्ञानाची जे प्रभा ॥ तेची निर्धारेंसी संवित्प्रभा ॥ ते स्वभावस्वरूपीं केवळ नभा ॥ हुनी असे निरुपाधिक ॥ ७७ ॥ रात्री नाशावयाकारणें ॥ दिवाकर जैसा प्रगटों नेणें ॥ कीं मरण देखोन पीयूषें तेणें ॥ अमृतपण

अनुष्ठिलें नाहीं ॥ ७८ ॥ तैसी नव्हे संवित्प्रभा ॥ जे ज्ञेयाभावें ज्ञानशोभा ॥ यालागींगा जानकीवल्लभा ॥ स्वभावरूपी बोलिजे ते ॥ ७९ ॥ पैसाची ये मांदुसे ॥ ते स्वभावें केवळ भरली असे ॥ नाना आपण मांदुस होउनी पैसे ॥ भरलें असे अंतर ॥ ८० ॥ तिये अधिष्ठानी जो भासू ॥ तो संवित्स्वरूपाचा विलासू ॥ हाही संधिचाचा वाच्यांशू ॥ संविती सर्वथा संधी नेणे ॥ ८१ ॥ निजप्रभे सर्व हा जाणे ॥ निजप्रभे सर्वातें नेणे ॥ निजप्रभे तिये नें असणें ॥ निजप्रभेची नसणें तिचाठाईं ॥ ८२ ॥ ते स्वानुभूतिचिया ग्रहासी ॥ होउनी स्वानुभूतीतें ग्रासी ॥ निजांगप्रभेची प्रौढी ऐसी ॥ जे कदा दृश्यासी न साहे ॥ ८३ ॥ ग्राह्यां गृहीत हा विकल्पु ॥ बोलती मिथ्याच हा जल्पु ॥ तरणीच्याठाईं तमारोपु ॥ नघडे तैसें असे तेथ ॥ ८४ ॥ एवं सर्व न होनि सर्व भावे ॥ नसतें संवित्स्वरूप बोलावें ॥ आतां चिद्रूप तें ऐसें जाणावें ॥ सर्व न होनी सर्वी असे ॥ ८५ ॥ संविति आणि चिद्रूप अभिन्न ॥ असती परी विलासें बोलिलीं भिन्न ॥ असो आतां सांगो चिद्घन ॥ सर्वरूपें असे कैसें ॥ ८६ ॥

**चिदहोस्तीति चिन्मात्रमिदं चिन्मयमेव च ॥**
**चित्तं चिदहमेवेति लोकश्चिदिति संग्रहः ॥ ३१ ॥**

अहो आश्चर्य येथ केवढें आहे ॥ जें चिन्मात्र तेंही चिद्त्वें राहे ॥ तेथ स्फुरणदृश्यप्रवाहें ॥ तेंही निश्चयें चिन्मय ॥ ८७ ॥

स्फुरणयोगें चित्तवृत्ती ॥ तेही केवळ चिद्व्यक्ती ॥ आणि चित्ताचेनी उपजे अहंस्फूर्ती ॥ तेही निश्चिती चिद्रूप ॥ ८८ ॥ अहंस्फुरणें लोक दिसे ॥ तेही सकळ चिद्रूप असे ॥ एवं स्थूळसूक्ष्मदृश्य ऐसें भासे ॥ तितुकेंही न दिसे चिद्रूपाविण ॥ ८९ ॥ तस्मात् श्रीरामा जगजेठी ॥ सर्वांचें सार हेची गोष्टी ॥ जे पदार्थात्मक सकळसृष्टी ॥ चिन्मयदृष्टी पाहें पाहें ॥९०॥ ये नववे प्रकरणींचा ॥ हाची निर्णय गा त्रिवाचा ॥ विलास चित्स्वरूपाचा ॥ विश्वाकारें यथार्थ ॥ ९१ ॥ येथूनी पूर्ण हें प्रकरण ॥ पुढें ऐकें सावधान ॥ तुझें अवधान तेंची जीवन ॥ ममवाक्सरितेचें ॥ ९२ ॥ जीवनेविण जानकीकांता ॥ केवी प्रवाहें वाहेल सरिता ॥ तैसें अवधानजीवन नसतां ॥ ममवाक्सरिता कुंठित ॥ ९३ ॥ जैसें वसंत ऋतूचें आगमन ॥ सुशोभित करी सतद्रुमवन ॥ तैसें शोभे ममवाग्वन ॥ तवावधानवसंतें ॥ ९४ ॥ रविवंशनभस्थ दिनमणी ॥ तुझिये अवधानकिरणीं ॥ माझी बुद्धिदृष्टी उघडोनी ॥ देखे विचारदृश्यातें ॥ ९५ ॥ नानाकौशल्या हेची पौर्णिमासी ॥ तिच्या ठाईं निजप्रभेसी ॥ तूं श्रीरामचंद्र उदेजसी ॥ कळा दाविसी पूर्णत्वाच्या ॥ ९६ ॥ ती पूर्णकळीं प्रकाशमान ॥ शीतळ तुझें अवधानकीरण ॥ तें स्पर्शतां होय विकासमान ॥ ममवाक्लक्षण कुमुदिनी ॥ ९७ ॥ नातरी रामचंद्र तूं पूर्णचंद्रसी ॥ अवधानव्योमीं उदित होसी ॥ होऊनी ममवाग्वचनसमुद्रासी ॥ भरितें आणिसी

अधिकाधिक ॥ १८ ॥ आतां असो हें बोलणें ॥ तूं आत्माची प्रकाशपणें ॥ अंतरीं राहोनी वचनें ॥ वागेंद्रियद्वारा बोलविसी ॥ ॥ ९९ ॥ जेंसं वाद्य स्वतां वाजां नेणे ॥ कीं स्वयें बाहुल्यासी न घडे नृत्य करणें ॥ तसें माझे वाचेसी स्वतां बोलणें ॥ नघडे त्वत्प्रकाशराहित्यें ॥ २०० ॥ जैसी कल्पना न घडे नसतां मन ॥ कीं देखणें नघडे डोळियाविण ॥ तसें मनबुद्धीचें स्फुरण ॥ नघडे त्वत्प्रकाशराहित्यें ॥ १ ॥ जैसा दीपप्रकाशें गा मनुष्यपाणी ॥ स्वगृहींचि पदार्थ देख घरधनी ॥ तैसी त्वत्प्रकाशें त्वदयस्थानीं ॥ ममबुद्धि देखणें प्रमेयाची ॥ २ ॥ असो हें वाक्य वाढवसे ॥ तुवां बोलविलें गियामिसें ॥ याउपरी न दिसे ॥ वक्तयाश्रोतयासि भेद ॥ ३ ॥ वक्ता असे श्रोतयाच्या श्रवणीं ॥ श्रोता असे वक्तयाच्या वदनीं ॥ एवं श्रवणाचें मुख्य करूनी ॥ पुढें निरूपणीं सावध होइजे ॥ ४ ॥ एवं वसिष्ठ महामुनी ॥ बोले श्रीरामाप्रतीसुवचनीं ॥ टीकाकर्ता विनवुनी ॥ संतांप्रती हेचि प्रार्थी ॥ ५ ॥ आतां कूर्मीचियापरी ॥ मज अवलोकावें तुह्मीं चतुरीं ॥ तेणें अवलोकनें सुपरीं ॥ बोलेन पुढें वासिष्ठव्याख्या ॥ ६ ॥ तुह्मी कल्पतरूची छाया ॥ निवावित असा माझिया काया ॥ वासिष्ठव्याख्या बोलावया ॥ तरिच मातें योग्यता ॥ ७ ॥ माझें हृदयसरोवर अमळ ॥ तेथें तुमचें कारुण्यकमळ ॥ विकासलें ह्मणोनि परिमळवहळ ॥ उठिला टीकास्फुरणरूप हा ॥९॥ ना ना तुम-

घा अनुग्रहचिंतामणि ॥ म्यां धरिला त्हृदयस्थानीं ॥ यालागिं टीकासंकल्प त्हृदयांतुनी ॥ उठतांचि जाला साचार ॥ ९ ॥ ना ना तुह्मी मेघ गाझे त्हृद्गगनीं ॥ वोळिलेति कृपाजळें करुनी ॥ तेणें आप्यायन होउनी ॥ मी चातक निवालों ॥ १० ॥ निवाळोंपणें धाले हाले ॥ डोलोनि कांहींयेक तैसेंचि बोले ॥ त्या बोलासी रूप झालें ॥ वसिष्ठोक्तिव्याख्यामिसें ॥ ११ ॥ कां ममत्हृदयांबरीं निश्चित ॥ तुह्मी चंद्र श्रवलां कृपामृत ॥ तेणें मी चकोर होऊनि तृप्त ॥ करींहे अद्भुत निरूपणक्रीडा ॥ १२ ॥ ना ना या निरूपणवृक्षाची लावणी ॥ तुमचीचजी असे ह्मणुनी ॥ निजकृपाजळ घालुनी ॥ तात्पर्यवाडा लावितसे ॥ १३ ॥ आतां असो हें वाग्वल्गन ॥ जावो परतें हें धीटपण ॥ तुह्मां समर्थांपुढें कवण ॥ वाचाळत्व करील ॥ १४ ॥ मुक्तार्थ हाचि जे तुह्मी जळधरीं ॥ गर्जावें नभीं उदरीं ॥ तेणें मम वाचा हे मयूरी ॥ नाचे सुपरी निरूपणरंगीं ॥ १५ ॥ यापरी नारायणानुचरें ॥ सत्पुरुषाप्रति बोलता उत्तरें ॥ हें परिसोनि येरी नाभिकारें ॥ बोलते झाले सुकलित ॥ १६ ॥ अगा तुझे हे गोड बोल ॥ गहनविवेकें वाटती सखोल ॥ धन्य सद्गुरुकृपेंची बोल ॥ स्फूर्ति अमोल जेथूनि ऐसी ॥ ॥ १७ ॥ शब्द तरी विषयश्रवणासी ॥ परि हा शब्द निववी सर्वेंद्रियासी ॥ सुंदर पदप्रबंधरूपें परियेसी ॥ डोळ्यासि निववीतसे ॥ १८ ॥ अक्षराचे हळुवारपणें ॥ श्रवणा करी संतप्तपणें ॥

गौरसमाधुर्यगुणें ॥ रसना ह्मणे बाप माझा ॥ १९ ॥ कोमलत्व
ोनि आंगें ॥ त्वगिंद्रियासी निवऊं लागे ॥ दुरी जाय अर्थपरागें॥
घ्रणोनी विषयो घ्राणांचा ॥ २० ॥ प्रकटे साहित्यउत्पत्तीसी ॥
व्हां आश्चर्य मानी मानसीं ॥ एवं मन मुख्य सकळेंद्रियासी ॥
ुझेनि शब्दें निववीलें ॥२१॥ धन्य सुरस तुझी वाणी ॥ ना ना हे
अमृतसंजीवनी ॥ श्रवणें हृदयीं प्रवेशोनी ॥ जीवजिवा जीवपै॥२२॥
॥ ना हे वाक्य पद्माचा पद्मिणी ॥ ह्मणोनि निववी हंसालागुनी ॥
॥ ना वाचा नव्हे खाणी ॥ अनर्घ्य शब्दरत्नांची ॥२३॥ आतां
असो हा प्रकारू ॥ पुढें बोलता वाटेल उपचारू ॥ मुक्तार्थ
अनिर्वाच्य वाढिवारू ॥ या तुझिया निरूपणाचा ॥ २४ ॥
आतां अग्रीं दशमप्रकरण ॥ त्याचें अर्थभरित करी निरूपण ॥
निरूपणें निजसुखपूर्ण ॥ करीं श्रवण ऐकतयाचें ॥ २५ ॥
असे उदारकृपापुतळें ॥ जें ब्रह्मरसेंचि ओतलें ॥ जें उद्बोधमतें
ाजलें ॥ सप्रेमबोलें बोलती ॥ २६ ॥ तो ऐकोनी शब्दविलासु
। नारायणकिंकर माधवदासु ॥ संतचरणीं आधिवासु ॥ चित्त-
त्तीचा करूनी ॥ २७ ॥ पुढिले दशमप्रकरणिचें ॥ करी निरूपण
रदवाचें ॥ मागें जें निरूपण केलें त्याचें ॥ सारोद्धारप्रकरण
। ॥ २८ ॥ इति श्रीयोगवासिष्ठसारे माधवदासकृतटीकायां चिद्रू
निरूपणप्रकरणं नवमं समाप्तं ॥ ९ ॥ श्लो० ॥ ३१ ॥ टी०
। २२८ ॥ एवंसंख्यायेकंदर ॥ २५९ ॥

---

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरुभ्यो नम ॥ जयजय सद्गुरुब्रह्मानंदा ॥ जयजय सद्गुरुपरमसुखदा ॥ जयजय सद्गुरुचिदचिद्भेदा ॥ अतीत सदा ध्यानमूर्ति ॥ १ ॥ जयजय सद्गुरु अलक्षलक्षा ॥ जयजय सद्गुरु अपक्षपक्षा ॥ जयजय सद्गुरु अमोक्षमोक्षा ॥ अतीतापरोक्षा सहजरूपा ॥ २ ॥ जयजय सद्गुरु अतींद्रियकरुणा ॥ जयजय सद्गुरु अभावस्फुरणा ॥ जयजय सद्गुरु भुवनभरणा ॥ अपवर्गार्ति.तर्पणं ॥ ३ ॥ जयजय सद्गुरु परमात्मया ॥ जयजय सद्गुरु परमाद्वया ॥ जयजय सद्गुरु परमान्वया ॥ अनामया अपूर्णा ॥ ४ ॥ जयजय सद्गुरु दृश्यवेषा ॥ जय सद्गुरु परात्परेशा ॥ जयजय सद्गुरु व्यावृत्तिशेषा ॥ ज्ञेयाविशेषा ज्ञातया ॥ ५ ॥ जयजय सद्गुरु अगण्या ॥ जयजय सद्गुरु अभण्या ॥ जयजय सद्गुरु अंभजन्या ॥ अमन मान्या अनावरा ॥ ६ ॥ जयजय सद्गुरु जितदूपणा ॥ जयजय सद्गुरु विश्वभरणा ॥ जयजय सद्गुरु नभशोपणा ॥ विशेषणअक्षरा ॥ ७ ॥ जयजय सद्गुरु चिद्विकाशा ॥ जयजय सद्गुरु चित्प्रकाशा ॥ जयजय सद्गुरु चिद्विलासा ॥ चिदाभासा चिन्मया ॥ ८ ॥ यापरी एवं विधु ॥ पद्याष्टक सुरस प्रबंधु ॥ येऊनि वाक्प्रवाहा सुखसिंधु ॥ नारायण स्तविला ॥ ९ ॥ नारायण स्तविला हेंहि वचन ॥ स्थापावया प्रमाण कवण ॥ अजळासि झालें मज्जन ॥ ऐसें काय येईल बोलों ॥ १० ॥ अरूपा आलें गगन ॥ हें केंवी बोलवेल वचन ॥ तें अरूपेंचि

वर्तमान ॥ रूपपणें पावेल कैसें ॥ ११ ॥ कीं पीयूषा चाखिलें पीयूषें ॥ हें बोलणें अप्रमाण जैसें ॥ नारायण स्तविला हेंहि तैसें ॥ तेचि पंक्ति बैसावें ॥ १२ ॥ जो वक्ता वाच्य वचना ॥ व्यापूनि असे सर्वात्मना ॥ तोचि विषयो कैंवी होईल सर्वात्मना ॥ कासेनि कोणा स्तवावें ॥ १३ ॥

**शिवः सर्वं शिवः सर्वं शिवः सर्वं पुनःपुनः ॥**
**वचः शिवमयं ज्ञेयं वक्ता वाच्यं न तन्मयं ॥१॥**

येणें स्मृति वाक्यें करून ॥ फिटलें शब्दाचें शब्दपण ॥ बोल बोलतांचि उगेपण ॥ तेथ स्तवन काय कैंचें ॥ १४ ॥ असो नारायणस्तवन निरुतें ॥ नारायणें पावविलें समाप्तीतें ॥ आतां अवघेपणाचेनि संकेतें ॥ उरलें जें कांहीं उगेपण ॥ १५ ॥ तेणें उगेपणें तत्वता ॥ नारायणचरण वंदूं जातां ॥ वंदनीं झाली अभिन्नता ॥ समर्पी माथा श्रीचरणीं ॥ १६ ॥ माथा समर्पिल्या चरणीं ॥ चरण कोण देखेल नयनीं ॥ ह्मणोनि चरणमस्तक ये दोन्ही ॥ अभिवंदनीं हरपलीं ॥ १७ ॥ एवं स्तवितांचि स्तवन सरलें ॥ वंदितांचि वंदन निमालें ॥ भजतांचि भजन आलें ॥ उपशमातें आश्चर्य ॥ १८ ॥ आतां नेणे आश्चर्य निरूपण ॥ निरूपिजेल अति गहन ॥ तें सावध अवधारूनि सज्जन ॥ मना चें श्रवण करूनियां ॥ १९ ॥ या लघुवासिष्ठाचें सार ॥ नववे प्रकरणीं झालें शरीर ॥ आतां दहावें प्रकरण हेंचि शिर ॥

अति सुंदर श्रेष्ठत्वें ॥ २० ॥ याचें तात्पर्य हेंचि जाण ॥
जें मंथूनि नवांही प्रकरण ॥ अर्थ काढिला तो निरूपण ॥
आला दहावें प्रकरणीं ॥ २१ ॥ सकळ वसिष्ठार्थ अलोटुन ॥
जो करूं ह्मणेल विचक्षण ॥ तेणें हें दशम प्रकरण ॥ अवलोका-
वें सद्बुद्धीं ॥ २२ ॥ जितुका अर्थ नवम प्रकरणीं असे ॥ तितु-
काहि मिथ्या येथें गवसे ॥ असो आतां ऐक कैसें ॥ बोलिलें
वसिष्ठें महाराजें ॥ २३ ॥ ह्मणोनि पारिस गा मैथिलीपति ॥
बोलिजेल गा जें उत्कंठोक्ति ॥ जें परिसतां बद्धमुक्ति ॥ उपर-
तायि कळेल तूतें ॥ २४ ॥

दृश्यदर्शनसंबंधादुद्भवेत्परमं सुखं ॥
दृश्यसं चलितो बंधस्तन्मुक्त्या मुक्तिरुच्यते ॥२॥

जाहालिया इंद्रियां पदार्थदर्शन ॥ दृश्य हें पदार्थासि होय अभि-
धान ॥ आणि इंद्रियांचे ठाईं जाण ॥ दर्शनसंज्ञान बोलावें
॥ २५ ॥ या दृश्यदर्शनसंबंधादि आत्मयासी ॥ लावूनि आणिलें
द्रष्टृत्वासी ॥ तेंचि मन बोलिलें जें निर्धारेंसी ॥ सुखदुःखासीं
कारण जें ॥ २६ ॥ एवं दृश्यदर्शनें संबंधाप्रति ॥ द्रष्टृत्व आणूनि
आत्मयाप्रति ॥ आपुलिया संकल्प ब्रह्मवृत्ति ॥ सुखदुःखातें
उपजवी मन ॥ २७ ॥ जेथें सुखदुःखासि अधिवासु ॥ तेथें कैंचा
परमसुखाचा लवलेशु ॥ सुखदुःख विलक्षण उल्हासु ॥ तेंचि
बोलिजे परमसुख ॥२८ ॥ यावरी सद्गुरुखुणा ॥ तरी ठाव कैंचा

हरेल मना ॥ मनोभावें सुखदुःख नसे ॥ २९ ॥ जेथें सुखदु-
खाची नास्तिकता ॥ तेथेंचि परमसुखाची आस्तिकता ॥ तस्मात्
कारण तूं आतां ॥ इदं निश्च्या रघुपति ॥ ३० ॥ आत्मा दृश्य
येणेंकरून ॥ पावे दृष्टत्वाचें बंधन ॥ तेंचि बंधाचें लक्षण ॥
आतां मुक्ति ते ऐसी ॥ ३१ ॥ सोडी आत्मयानें दृश्यभ्रांति ॥
तें दृष्टत्वाची होय उपशांति ॥ द्रष्टीपशमनी मोक्षप्राप्ति ॥ तेचि मुक्ति
बोलिजे ॥ ३२॥ म्हणोनी श्रीरामा तूं आपण ॥ गाळूनि दृश्यद्रष्टा
दर्शन ॥ राहें परमसुखा परिपूर्ण ॥ हें सांगों अन्यप्रकारें ॥ ३३ ॥

## दृश्यदर्शनसंबंधान्न भवेत्परमं सुखं ॥
## तस्य एकांतसंवित्या मनोनाशः परं पदं ॥३॥

अनुभव करूनी प्रमाण ॥ जगीं झालें आत्मदर्शन ॥ तरी नें
असें मन ॥ दृश्यदर्शनसंबंधें ॥ ३४ ॥ सुखची बोलिजे नि[illegible]
स्थानीं ॥ परंतु परमसुखाची शिराणी ॥ आतां परमसुख जेणें [illegible]
रूनी ॥ होय तो मार्गें प्रकारूं ॥ ३५ ॥ प्रमेयत्त्व पावे प्रमा-
णत्वा ॥ तें प्रमाणची नुरे वार्त्ता ॥ एव येणें विचारें पाहतां ॥
अनुभव तत्वता भिन्नानुसारें ॥ ३६ ॥ अनुभव आत्मयासी अ-
भिन्न ॥ असतां न योजे दृश्यदर्शन ॥ दृश्यदर्शन नसतां मन ॥
पावे उपशमन अनायासें ॥ ३७ ॥ मुरालिया मनोवृत्ती ॥ हर
पोनी जाय सुखस्फूर्त्ती ॥ परंतु पावे अभावाप्रती ॥ अतएव सं-
विती एकांतरूप ॥ ३८ ॥ असो मनोनाशाचिये अंतीं ॥ गा-

ऊनियां सुखस्फूर्ती ॥ उरली जे एकांतसंवित्ती ॥ तिचे आस्तिकते करूनी॥३९॥ शेष जें कांहीं निर्वाण॥परमसुख हें ज्याचें अभिधान॥ तूं एकांत संवित्त करून ॥ हेंचि निरूपण पुढती ॥ ४० ॥ तस्माद्र घुनाथा सावधान ॥ राहें परमपद पावोन ॥ परमपद तेंचि जाण ॥ नचढे निरूपण यावरी ॥ ४१ ॥

# शुद्धं सदसतोर्मध्ये पदं लब्ध्वा विलंबयेत् ॥ सबाह्याभ्यंतरं विश्वं मा गृहाण विमुंच मा ॥४॥

संतशब्दें अदृश्यमान ॥ या दोहींस जें अधिष्ठान ॥ असंतशब्दें दृश्यमान ॥ मध्यस्थाननिवासी ॥ ४२ ॥ अदृश्यत्वीं नाहीं प्रकाशगुण ॥ दृश्यत्वीं नाहीं अरूपपण ॥ यालागीं दृश्यादृश्य विलक्षण ॥ असणें परी दोहींतें जाणणें निजसत्ता ॥ ४३ ॥ अन्वय ना व्यतिरेकु ॥ नेमितां नये भाव येकु ॥ ह्मणोनि सदसद्विवेकु ॥ मध्यस्थाननिर्देशी ॥ ४४ ॥ ऐसें मध्यस्त पद जे अमळ ॥ तें पावे श्रीरामा तात्काळ ॥ पावोनि होई निराळ ॥ ते युक्ति हाती निरोपूं ॥ ४५ ॥ त्या मध्यस्तपदाचें हेंचि पावणें ॥ जें स्वयें ते पदातें आपण होणें ॥ मग आपुलेनि निजज्ञानें ॥सदसद्रूपासि जाणिजे ॥ ४६ ॥ जें सदसद्रूपाचें जाणतें ज्ञान ॥त्यासी तेंव नाहीं उदयास्तमान ॥ उदयास्त नसतां खंडन ॥ बोलवेल केवि कोणासी ॥४७॥ खंडन जरी कांहीं नसे ॥ तरी सदसद्रूप केउतें असे ॥ उभयाचेनी अभावें कैसें ॥ मध्यस्थान बोलावें॥ ४८ ॥

एवं सदसद्रूप आणि मध्यस्थान ॥ आसूनी चित्स्वरूपें तूंची आपण ॥ नाहीं सर्वथा स्थानमान ॥ अखंडैकरस ह्मणोनी ४९ येणें विचारें निर्धारीं ॥ तूंचे विश्वास बाह्याभ्यंतरीं ॥ विश्वनामाची कुसरी ॥ सर्वांपरी तूंची तूं ॥ ५० ॥ गिळूनी सर्वा सर्ववस्तुता ॥ सर्वा सर्वरूपें तूंची असतां ॥ सांडी मांडी पैं उभयतां ॥ तुज तत्वतां नलगेनलगे ॥ ५१ ॥ चंद्रें ताप कोठूनि सांडिजे ॥ आणि शीतळता कोठूनि मांडिजे ॥ सूर्यंतप्रकैंचें दवडिजे कैंचें आणिजे नाथिलें तेज ॥ ५२ ॥ गगनासी कोठूनी रूपत्यागु ॥ आणि कोठूनी घडे अरूपयोगु ॥ तसा तुज अखंडैकरसासी प्रसंगु ॥ सांडी मांडीचा बोल्यावा ॥ ५३ ॥ ह्मणोनी सर्वात्मना रघुपती ॥ तुवां राहावें सहजस्थिती ॥ कांहीं घेणें टाकणें हे भ्रांती ॥ तुझ्या ठाईं नस्पर्शे ॥ ५४ ॥ एवंविधप्रकारें जें हें भलें ॥ ये श्लोकीं म्या निरोपिलें ॥ ऐसें नसेल प्रबोधलें ॥ पुढती हेंची निरूपिजेल ॥ ५५ ॥

जडाजडदृशोर्मध्ये यत्तत्त्वंपारमार्थिकं ॥
अनंताकाशहृदयं तत्सदाश्रयसर्वदा ॥ ५ ॥

जडदृश्य ह्मणिजे अधिभूत ॥ अजड अदृश्य ह्मणिजे अधिदैवत ॥ उभयाच्या अंतरीं असे वर्तत ॥ पारमार्थिक जें तत्व ॥ ॥ ५६ ॥ जडाजडात्मक जें कांहीं ॥ तें पारमार्थिक तत्व पाहीं ॥ आणि प्रकाशक जडाजडाच्या ठाईं ॥ तें तत्व पारमार्थिक ॥ ५७ ॥

पादार्थिक अवलोकितां ॥ भासे पारमार्थिक तत्वतां ॥ पारमार्थिक विचारें पाहातां ॥ पादार्थिक न दिसे त्याच्याठाईं ॥ ५८ ॥ ते हृदयानुलेख स्वरूपीं जैसे ॥ निरामयत्वें आकाश तैसें ॥ तें अवकाशहृदय ऐसें ॥ त्या तत्वासी आलें बोलतां ॥ ५९ ॥ आकाशरूपी हृदय झालें ॥ तरी जडाजड तेथें कोण बोले ॥ जडाजड ग्रासूनि संचलें ॥ निवाळिलें अनंत ॥ ६० ॥ ऐसें पारमार्थिक तत्व निष्कळ ॥ तें तूंचि आश्रयीं सर्वकाळ ॥ आश्रयाचें हेंचि रूप प्रांजळ ॥ तें तन्मय होउनी राहावें ॥ ६१ ॥ मुक्तार्थदृश्यदृष्टोपशमन ॥ हेंचि मुक्तीचें लक्षण ॥ आणि या विलयें तेंचि बंधन ॥ हेंचि निरूपण पुढें ॥ ६२ ॥

**दृश्यदर्शनसंबंधो बंध इत्यभिधीयते ॥**
**द्रष्टा दृश्यवशाद्बद्धो दृश्याभावाद्विमुच्यते ॥ ६ ॥**

दृश्येंकरूनि द्रष्टृत्वाचा ॥ संबंध द्रष्टयाचा ॥ तोचिरूप भवबंधाचा ॥ तेथें संशय नाहीं ॥ ६३ ॥ तस्मात् दृश्याचेनि गुणें ॥ द्रष्टा बंध देखणेपणें ॥ आणि दृश्याचेनि अभावने ॥ द्रष्टा मुक्तपणें विराजे ॥ ६४ ॥

**द्वयोर्मध्यगतं नित्यमस्ति नास्तीति भावना ॥**
**प्रकाशनं प्रकाशानामात्मानं शुद्धचात्मनः ॥ ७ ॥**

दृश्य आणि द्रष्टेपणे ॥ यामाजीजे संधीजाण ॥ तत्संधिगतवर्त्तमान ॥ आस्ति नास्ति उभयतां ॥ ६५ ॥ सद्गुरुवाक्य

करूनि प्रमाण ॥ जैसें संधीचें होय संधान ॥ संधिनाशें अस्तमान ॥ संधिसंधान जालिया ॥ ६६ ॥ जैसा प्रकाशेंचि प्रकाशमान ॥ तैसें आपणेंचि आपणातें आपण ॥ शुद्धत्वें अखंड भासमान ॥ संधिसंधान जालिया ॥ ६७ ॥ दृश्य नसोनि देखणेपण ॥ अत-एव पावों न शके खंडण ॥ खंडणाभावें करून ॥ अस्तिनास्ति हरपे ॥ ६८ ॥

द्रष्टदर्शनदृश्यादि त्यक्त्वा वासनया सह ॥
दर्शनं प्रथमाभासमात्मानं केवलं भजे ॥ ८ ॥

यालागीं तूं चापपाणी ॥ द्रष्टादर्शनदृश्य ये तीन्ही ॥ वासनेसीं व्यक्तकरूनी ॥ पाहें आपण आपणातें ॥ ६९ ॥ पाहतां आप-णातें आपण ॥ प्रथमभासु गमे दर्शन ॥ दर्शनाची अभिव्यक्ति कवण ॥ ह्मणसील तरी श्रवण कर पुढें ॥ ७० ॥

निद्रादौ जागरस्यांते यो भाव उपजायते ॥
तं भावं भावयेत्साक्षादक्षय्यानंदमश्नुते ॥ ९ ॥

निरसोनि ज्ञेयज्ञानोपपत्ति ॥ स्वप्रकाशें उरे जे ज्ञप्ति ॥ जैसा जीव गगनाकृति ॥ तोचि अंतु जागृतीचा ॥ ७१ ॥ वृत्तिरूपें जागृतीचें अवसान ॥ तेंचि वृत्तिशून्यनिद्रेचें आदिस्थान ॥ एवं दोहींमाजीवर्त्तन ॥ उपज नानुपज ऐसा जो भावो ॥ ७२ ॥ तो भाव श्रीरामा निर्धारें ॥ होईल स्वयें साक्षात्कारें ॥ मग तेणेंचि

चमत्कारें ॥ अक्षयानंद भोगिजे ॥ ७३ ॥ तो आनंद कैसा कवण ॥ ह्मणसी तरी ऐक सावधान ॥ जे निद्रा आणि जागरण ॥ असे ग्रासूनि सर्वात्मना ॥ ७४ ॥ आनंद ना निरानंद ऐसा ॥ भाव जेथें नपवे सहसा ॥ तस्मात् निराकृति ह्मणे विनयें नाशा ॥ अतएव तो अक्षयानंद ॥ ७५ ॥ जैसें गोडरूपें असो जाणे ॥ ह्मणोनी कडूगोड हें अमृत नेणे ॥ भानूचें प्रकाशरूपचि असणें ॥ अतएव न देखे तमप्रकाशु ॥ ७६ ॥ तैसा पूर्णानंदें जो आनंदु ॥ तो तेणें आनंद अथवा विषादु ॥ द्वंद्वें कदा नपवे भेदु ॥ ह्मणोनि बोलिला अक्षय ॥ ७७ ॥ एवं भावजागृतीच्या अवसानीं ॥ जाणिजे निद्रेचें आदिस्थानीं ॥ तो भाव स्वयें होउनी ॥ अक्षयानंद भोगणें ॥ ७८ ॥ मागुती हेची स्वरूपस्थिती कैसी ॥ सांगिजेल रघुनाथा परियेसी ॥ तत्काळ ये बोधासी ॥ ऐसें सोपान निरोपू ॥ ७९ ॥

## प्रशांतसर्वसंकल्पा या शिलावस्थितिःपराः ॥
## जाड्यनिद्राविनिर्मुक्ता सा स्वरूपस्थितिःपरा १०

सर्वसंकल्पांची उपशांती ॥ ह्मणोनी नसे स्फुरणाची संगती ॥ स्फुरणभावें अतएव निगुती ॥ चहुंवाचें वेगळी ॥ ८० ॥ वाग्विषयासी न गवसे ॥ यालागीं जडाविषयापरि असे ॥ जडोपम परंतु निद्रालेशें ॥ न माखे आंग जियेचें ॥ ८१ ॥ निद्रेचेनी अभावें सर्वथा ॥ जागृती बोलोंनये तत्वता ॥ एवं निद्राजागृती

हे कथा ॥ न साहे तत्वतां जे ठाई ॥ ८२ ॥ ऐसें जे स्थिती परमोत्कट ॥ निर्विकार निविड निघोट ॥ तेची स्वरूपस्थिती चोख्ट ॥ जाण अविट परात्पर ॥ ८३ ॥

जडतां वर्जयित्वैका शिलाया हृदयं च यत् ॥
अमनस्कं महाबाहो तन्मयः सर्वदा भव ॥११॥

आत्मत्वाचेनी निविडपणें ॥ त्हृदयशून्यत्वें तिचें असणें ॥ त्हृदयशून्यत्वाचेनी गुणें ॥ ते जडपणें वर्जिली ॥ ८४ ॥ जडपणाचेनी अभावें ॥ मन कवणेंपरी खोल्हावें ॥ अमनस्क हें स्वभावें ॥ याचिलागीं बोलिलें ॥ ८५ ॥ अगा महाबाहो परियेसी ॥ हे परममर्यादा जाणोनी ऐसी ॥ तूं तन्मय होई सर्वभावेंसी ॥ सर्वप्रकारें सर्वदा ॥ ८६ ॥ जाली पाहीं तन्मयता ॥ उरे निष्कळ निर्बोधता ॥ तेची सांगिजेल आतां ॥ ऐक ताता रघुवर्या ॥८७॥

नित्यानंदचिदाकाशस्वरूपः परमेश्वरः ॥
मृद्भाजनेषु मृद्वित्सर्वत्रास्त्यपृथक्पृथक् ॥ १२ ॥

जो नाशा नेणे सर्वात्मना ॥ तो नित्यानंद रघुनंदना ॥ आकाशरूपें देखणा ॥ ह्मणोनी चिदानंद आकाशपें ॥ ८८ ॥ चिदाकाशत्वें असणें ॥ यालागीं स्वरूपें ऐसें ह्मणणें ॥ व्याप्य व्यापकभाव नेणे ॥ अतएव तो परमेश्वरु ॥ ८९ ॥ तरी सर्वत्र असे कैसा ॥ मृद्भांडीं मृद्भाव जैसा ॥ व्याप्यव्यापक दोहीं सरिसा ॥ वर्त्ते पृथक्‌पृथक्‌पणें ॥ ९० ॥ विकाररूपीं शरीर दावी ॥ प्राण

रूपीं शरीर वागवी ॥ अभिमानरूपें शरीर वागवी ॥ संरक्षण करितसे ॥ ९१ ॥ चैतन्यरूपी शरीर चाळितां ॥ चित्स्वरूपी शरीरीं जाणतां ॥ ऐसा पृथक्त्वें सर्वत्र सत्ता ॥ पृथक्भावें खंडों नेदी ॥ ९२ ॥ शरीरादि भान ॥ तें असे न सोडोनी अधिष्ठान ॥ यालागीं सर्वत्र वर्त्तमान ॥ चिदात्मा आपण पृथक् ॥ ९३ ॥ घट पाहतां ते मृत्तिका नकळे ॥ परी मृत्तिकेवांचुनी घट न संभवे ॥ एवं पृथक् आणि पृथक्भावें ॥ घटाच्या ठाईं मृत्तिका ॥ ९४ ॥ तैसें शरीरादि पाहतां आत्मा नव्हे ॥ परी आत्मयावांचूनी शरीर न संभवे ॥ पृथक् आणि अपृथक्भावें ॥ सर्वत्र असे चिदात्मा ॥ ९५ ॥ तस्मात् व्याप्यव्यापकपणेंसी ॥ आत्माची सर्वदेशी ॥ आत्मा निबिड परियेसी ॥ आले विलयासी सर्व पैं ॥ ९६ ॥

## आपारावारविस्तारं संवित्सलिलवल्गनैः ॥
## चिदेकार्णव एवायं स्वयमात्मा विजृंभते ॥ १३ ॥

जैसें मृगजळनदीचें प्रमाण ॥ सर्वथा केलें नवचे जाण ॥ कीं वंध्यापुत्राचें देहावसान ॥ बोलेल कवण चतुरपैं ॥ ९७ ॥ मुळींच अभाव जयाचा ॥ पार केंवी करवेल तयाचा ॥ ह्मणोनी असत्य या संसाराचा ॥ पार नवचेल जिला ॥ ९८ ॥ जैसें रज्जुसर्पाचें मरण ॥ हा शब्दचि अप्रमाण ॥ तैसें घडो विवरण ॥ या असत्यसंसाराचें ॥ ९९ ॥ मुळिंच तरी याची नास्ति ॥ परंतु मनाचेनि आंगें संविति ॥ ते होय यातें जाणति ॥ ह्मणोनी हा

विस्तार मनाचा ॥ १०० ॥ नाना आपारावार संसार ॥ हा मनो-
जळाचा तरंग विस्तार ॥ तो मनोसलिल ओघ सत्वर ॥ चिदे-
कार्णवीं मिळालिया ॥ १ ॥ अपारसंसारभान ॥ नव्हे सर्वथा
भासमान ॥ ज्यासी भान होतें तें मन ॥ चिदेकार्णवीं समरसलें
॥ २ ॥ तेव्हां संसारपणें आकारें ॥ स्वयं चिदाभासचि विस्तारें
॥ हेंचि परमसाक्षात्कारें ॥ पुढिले श्लोकीं निरोपिजेल ॥ ३ ॥

**भरिताशेषदिक्कुंजमनंताकाशनिर्भरं ॥**
**एवं वस्तुगतं सर्वं चिन्मात्रं वारिचांबुभिः ॥१४॥**

दिक्कुंज ह्मणजे आकाश साचार ॥ तें समस्त अनंताकाशें
निर्भर ॥ अनंताकाश ह्मणिजे चिदंबर ॥ जें आकाशाचें अंतक
॥ ४ ॥ असो तेणें अनंताकाशचिदंबरें ॥ दुमदुमित आकाशभरें
॥ मग जगाआंतबाहेरें ॥ तेंचि संचरे संचलेंविण ॥ ५ ॥ तेव्हां
चिदंबरीं जग नदिसे ॥ जगीं चिदंबर हेंही नसे ॥ एवं वस्तु-
चिन्मात्र जें निजपैसे ॥ तद्रूपचि असे सकळ जें ॥ ६ ॥ एवं
भावित जें आकाशपण ॥ तें अनंताकाशीं होय लीन ॥ लीन-
जालिया उरे जैसें जीवन ॥ जीवनामाजी मिळालिया ॥ ७ ॥
यालागीं आकाश आणि ब्रह्म ॥ अभिन्न हें जाणवीं सुवर्म ॥
हेंचि निरूपण उत्तम ॥ पुढिलिये श्लोकीं कीजेल ॥ ८ ॥

**निरंशत्वाद्विभुत्वाच्च तथानैश्वरभावतः ॥**
**ब्रह्मव्योम्नोर्न भेदोस्ति चैतन्यब्रह्मणोधिकं ॥ १५ ॥**

जेंकां कांहीं स्थूळसूक्ष्मभासु ॥ तितुका व्योमाचाचि विलासु ॥ परंतु व्योम कोणाचा अंशु ॥ हें सर्वथा बोलों न ये ॥ ९ ॥ येणें निरंशत्वें पाही ॥ व्योम असे ठाईंच्या ठाईं ॥ याकारणें भेद नाहीं ॥ ब्रह्मव्योमासि सर्वदा ॥ १० ॥ भूतभविष्यवर्तमान ॥ जितुकें कांहीं भासमान ॥ तितुक्यासि व्योम आवरीजाण ॥ परि व्योमासि आवरण कांहीं नसे ॥११॥ येणें विभुत्वें करूनि पाहीं॥ व्योम असे ठाईंच्याठाईं ॥ याकारणें भेद नाहीं ॥ ब्रह्मव्योमासि सर्वदा ॥ १२ ॥ रूपाचेनि पैं अभावें ॥ विकारातें कदा न पावे ॥ विकाराचेनि अभावें ॥ नाशानेणें सर्वात्मा ॥ १३ ॥ येणें नैश्चल्यभावें पाहीं ॥ व्योम असे ठाईंच्या ठाईं ॥ याकारणें भेद नाहीं ॥ ब्रह्मव्योमासि सर्वदा ॥ १४ ॥ परंतु ब्रह्मीं गुणविशेष असे ॥ जें चैतन्य रूपें सर्वदा वसे ॥ व्योमीं चैतन्यभाव नसे ॥ ह्मणोनी व्योम असे भेदा आलें ॥ १५ ॥ आणि जें तेंची व्योम निश्चित ॥ होय चैतन्यसंवलित ॥ तेंतेंची ब्रह्म सदोदित ॥ येथें संशय नाहीं ॥ १६ ॥ मुक्तार्थ निर्जीव तें आकाश ॥ सजीव तें चिदाकाश ॥ हें सत्य श्रीरामा मानीं भास ॥ सविश्वास होउनियां ॥ १७ ॥

निस्तरंगोस्ति गंभीरसांद्रानंदसुधार्णवः ॥
माधुर्यैकरसाधार एकएवास्ति सर्वतः ॥ १६ ॥

पुनरपि कैसें तें चिदंबर ॥ ऐक रघुनाथा सादर ॥ जें सरसानंदसुधेचा सुंदर ॥ समुद्रचि काय केवळ ॥ १८ ॥ स्फुरणमौनाचा सांचलु जरी ॥ बोलोचि नये तया अंतरीं ॥ आणि द्व्यवायांवाह्यात्कारी ॥ त्याचाचि नसे संचारु ॥ १९ ॥ सांचलु नसावया हेंचि कारण ॥ जे अखंड असे गंभीरपणें ॥ तेणें गंभीरपणें करून ॥ उपाधियोग न हालवे ॥ २० ॥ न हालवे ह्मणौनि उपाधियोगू ॥ नसे अत एव तो निस्तरंगु । निस्तरंग ह्मणौनि नेणे वियोगु ॥ निजस्वरूपमाधुर्याचा ॥ २१ ॥ माधुर्ययोगी निर्विकार ॥ याल्लागिं माधुर्यकरसाधार ॥ अद्वितीयपणें निरंतर ॥ सर्वत्र असे निश्चयें ॥ २२ ॥

**समस्तं खल्विदं ब्रह्म सर्वमात्मेति भावयन् ॥**
**अहमन्यदिदंचान्यदित्येषा खंडखंडधीः ॥ १७ ॥**

तस्मात्कारणात्सर्वप्रकारें ॥ हें समस्त सब्रह्मरूपचि निर्धारें ॥ येचि अर्था अतिवाडिवारें ॥ बोलॆ आदरें श्रुतियेसी ॥ २३ ॥ श्रुतिवाक्यं ॥ सर्वंखल्विदंब्रह्मनेहनानास्तिकिंचन ॥ जेथें ऐसी निविड ब्रह्मस्थिति ॥ तेथें आत्मत्वाची कैंची उपपत्ति ॥ आत्मत्वपावे ब्रह्मत्वाप्रति ॥ मग आपुलिची व्याप्ति सर्वत्र ॥ २४ ॥ एवं आत्मत्व ब्रह्मैक्यभावें ॥ हें अखंड जाण पावे ॥ जे अहंच त्वंच येणें विपयत्वें ॥ नांदत होती संधीसी ॥ २५ ॥

**येदेवब्रह्मणोरूपंतंतंबोधमखंडितं ॥**
**तदा विस्तीर्णसंसारः परमेशगतांगतः ॥ १८ ॥**

जालिया खंडबुद्धिचें खंडण ॥ सर्वत्र ब्रह्मचि वर्तमान ॥ जेथेंजेथें ब्रह्माधिष्ठान ॥ तेथेंतेथ बोध अखंडित ॥ २६ ॥ एवं पूर्णबोधें भरलें गगन ॥ काय निवडावें भिन्नाभिन्न ॥ तेव्हां विस्तीर्ण संसारभान ॥ परमेश्वरतें प्रति पावे ॥ २७ ॥ जो पाहातां अपार संसारु ॥ तोचि जाला परमेश्वरु ॥ ह्मणौनि सकळा प्रकारु ॥ भावनियें साधकानें ॥ २८ ॥

समस्तमेव ब्रह्मेति भाविते ब्रह्म वै पुमान् ॥
पीतेमृतेमृतमयः को नाम नभवेदिति ॥१९॥

ते सर्व ब्रह्मभावना ऐसी ॥ दृढतर आणि हृदयासी ॥ तो पुरुषगा निश्चयेंसीं ॥ स्वयें पावे ब्रह्मत्व ॥ २९ ॥ जैसें केलिया अमृतपान ॥ अमृतमय नव्हेल कवण ॥ तैसें सर्वब्रह्मभावें करून ॥ कोण न पवे ब्रह्मत्वातें ॥ ३० ॥

भव्योसि चेत्तदेतस्मात्सर्वमाप्नोति निश्चयात् ॥
नाचेद्रस्त्वयिसंप्रोक्तं यथा भस्मनि हन्यते ॥२०॥

एवं सर्वब्रह्म येणें निश्चयें ॥ तूं ब्रह्मरूप होसी स्वयें ॥ स्वयं-ब्रह्म नव्हतां नये ॥ तो पुरुष समाधान ॥ ३१ ॥ जरी वस्तु विचार बोलितां वाचे ॥ दावी लाघव निरूपाचें ॥ तरी स्वयं ब्रह्मत्व जाणतां साचें ॥ समाधानातें न पावे ॥ ३२ ॥ जैसें अभ्राचियेप्राप्ती ॥ आकाश सर्वथा नये व्यक्ती ॥ तैसी केवळ जे ब्रह्मवचनोक्ती ॥ तेणें नये स्थिति समाधाना ॥ ३३ ॥ जैसें

अमृतकुपीचें सन्निधान ॥ देवां नशके अमरपण ॥ तैसें केवळ जे शुष्क ब्रह्मवचन ॥ नेदी समाधान यथार्थ ॥ ३४ ॥ जैसें भस्मामाजी हविलें ॥ तें कवणकार्यासी आलें ॥ तैसें स्वानुभवें विण वृथा गेलें ॥ शाब्दिकाचें निरूपण ॥ ३५ ॥

**अपविज्ञानतत्वेन त्वयाभ्यस्तमिदं सदा ॥**
**न नाममात्रात्कनकं फलमंबुप्रसाधकं ॥ २१ ॥**

जरी तूंगा रघुपती ॥ करूनी अभ्यास अखंडस्थिती ॥ युक्तिकौशल्य यथानिगुती ॥ तत्वज्ञान शिकलासी ॥ ३६ ॥ तरी स्वयं ब्रह्मानुभव नसतां ॥ न पाविजे समाधान सर्वथा ॥ उदक मनीं घेतां ॥ तृषा काय हरों शके ॥ ३७ ॥ अन्नाचेनी दर्शनें ॥ र्वां तृप्ती पाविजे प्राणें ॥ तैसें शिकलेनी ब्रह्मज्ञानें ॥ समाधान ाविजे ॥ ३८ ॥ जैसें पाहाटगणाचें नाम घेणें ॥ रूपप्रतीति कदा णें ॥ तैसें तत्व शाब्दिकाचें जिणें ॥ स्वयं तत्वानुभवें विचक्षण ॥ ३९ ॥ जैसें धनलोभियाचें धन ॥ शरीरभोगासी नव्हे कारण ॥ सें शाब्दिकाचें शब्दज्ञान ॥ नव्हे समाधानातें ॥ ४० ॥ शर्करे र्जी पाषाण जैसा ॥ असे परी अंतर गोडी नये सहसा ॥ ह्मविचारी शाब्दिक तैसा ॥ असे परी अंतर न विनवे ॥ ४१ ॥ सी कन्येचियेपरी साचें ॥ तेणें पाळण केलें आत्मविद्येचें ॥ र्थ श्रम करी वाचे ॥ ब्रह्म ऐसेंतैसें बोलोनी ॥ ४२ ॥ मी ह्म हा निश्चय नाहीं ॥ म्हणोनी स्वभावें स्वयं ब्रम्हत्व न णे पाहीं ॥ स्वयें ब्रम्हत्व नपतां अवघेंही ॥ शब्दज्ञान वाव

होय ॥ ४३ ॥ तस्मात् मी ब्रम्ह निष्कळ ॥ हाच निश्चय पाहिजे सर्वकाळ ॥ तेणें निश्चयें तत्काळ ॥ पावणे अमळ ब्रम्हत्व ॥ ४४ ॥

## अहमेवं परं ब्रह्म वासुदेवाख्यमव्ययं ॥
## इति स्यान्निश्चितो मुक्तो बंधएवान्यथा भवेत २२

परब्रम्ह म्हणिजे उत्कृष्ट जाण ॥ ब्रम्ह म्हणिजे बृहत्थोरपण ॥ एवं परब्रम्ह हें अभिधान ॥ येणें अर्थे सार्थक ॥ ४५ ॥ सात्विक अंतःकरण जें ॥ त्यातें वासुदेव ऐसें बोलिजे ॥ तेणें वासुदेवें जाणिजे ॥ बोलिजे वासुदेव ॥ ४६ ॥ ना ना आपुलेनी वासनें तत्वतां ॥ विश्वची चराचर होय सविता ॥ यालागीं आलें बोलतां ॥ वासुदेव हें अभिधान ॥४७॥ ना ना आपुलेनी अंगिकप्रकाशें॥समस्तांचे हृदयीं वसे॥याकारणें वासुदेव ऐसें ॥ बोलतां आलें सुललित ॥४८॥ अनुभवें भोगितां अहर्निशीं॥ज्याचें प्रेम तृणावे चौपासी ॥ परी येऊं नेणें व्ययासी॥अतत्व अव्यय बोलिजे ४९.नाना लहरी तरंग बुद्बुदफेण ॥ विराल्लिया न विरे जीवन ॥ तैसें ज्याचें अव्ययपण ॥ नामरूपात्मक आकार अव्ययनाशी ॥ ५० ॥ एवं ऐसा मी पूर्णब्रह्म ॥ वासुदेव अव्यय सर्वोत्तम ॥ ऐसा ज्याचा निश्चय परम ॥ तोचि मुक्त यथार्थता ॥ ५१ ॥ आणि याहुनी अन्यथा कोणी ॥ ज्यासी ब्रह्मत्वाची शिराणी ॥ तो बद्ध होय येथें संदेह मनीं ॥ कार्मुकपाणि रघुवीरा ॥ ५२ ॥ या

लागीं होंचि निरुतें ॥ जें स्वयं ब्रह्मत्व बाणे तूतें ॥ तें वर्म कैसें ब्रह्मत्व बाणतें ॥ ह्मणसी तरी आतां सांगिजेल ॥ ५३ ॥

नेतिनेतीतिनेतीति शेषितं यत्परं पदं ॥
निराकर्तुमशक्यत्वात्तदस्मीति सुखी भव ॥ २३ ॥

जैसपर चाली स्पर्शेची ॥ तैसपरी याचा नेतिनेतीची ॥ कंठ्या शक्ति निराकरणाची ॥ तेंचि पावे उपरम ॥ ५४ ॥ एवं निराकरणाचेनि अशक्यभावें ॥ नेति त्रिगुण ल्यो पावे ॥ ल्यो पावोनि उरे स्वभावें ॥ परमपद जें अवशेष ॥ ५५ ॥ तें तं होऊनि स्वयें आपण ॥ राहें आस्तिकभावें संपूर्ण ॥ तेणें आस्तिकभावें करून ॥ सुखी होई सर्वदा ॥ ५६ ॥ ऐसा तं पूर्णानंदी पुतळा ॥ अज्ञान देव मानिसी आपणा वेगळा ॥ कासया गळा त्याविशीं असळा ॥ हेंचि पुढें निरूपण ॥ ५७ ॥

अहं ध्याता परं ध्येयमखंडं खंडमेककं ॥
आत्मानं सततं विद्धि सर्वमेकं निरंतरं ॥ २४ ॥

मी ध्याता असें अवर ॥ साध्य तें सजज्ञनि पर ॥ हे भावना परावर ॥ नव्हे भली सर्वात्मना ॥ ५८ ॥ हें असद्भावनेंकरून ॥ कासया अखंड करसी खंडपण ॥ खंडणें करसी बंधन ॥ ह्मणोनि जाण आत्मयातें ॥ ५९ ॥ तें आत्मस्वरूप कैसें ॥ जें एक निरंतर सर्वत्रीं असे ॥ तें तं असोनि स्वयंप्रकाशें ॥ ध्यान कोणाचें करितोसी ॥ ६० ॥ ध्येय तुझेंनि रूपस ॥ ध्यानासि तुझाचि अवकाश ॥ तो तं असमी निरा-

भाग ॥ ध्यान कोणाचें कुशील ॥ ६१ ॥ असो जें त्रिपुटीचें वसतिस्थान ॥ तें सर्वथा अधमध्यान ॥ आतां उत्तमध्यानाचें लक्षण ॥ करीं श्रवण रघुनाथा ॥ ६२ ॥

**सोऽहं चिन्मात्रमेवेदं चिंतनं ध्यानमुत्तमं ॥**
**ध्यानस्याविस्मृतिः सम्यक् समाधिरभिधीयते॥२५॥**

ज्याचेनि ध्येयध्यान वोसरे ॥ तो मी चिन्मात्रस्वरूपनिर्धारें ॥ ऐसें चिंतन तें खरें ॥ उत्तम ध्यान बोलिलें ॥ ६३ ॥ त्या ध्यानाचिये अविस्मृति ॥ अविस्मृति ह्मणिजे निदारु निश्चिती ॥ तेणें निदारें जे सम्यक स्थिति ॥ तिचें नाम समाधी ऐसी ॥ ६४ ॥ एवं अहं हें जेथें वोसरलें ॥ सोहंहि जाण विनुळलें ॥ अहंसोहं अतिताविवळलें ॥ तेंहि मावळलें जियेठाइं ॥ ६५ ॥ तेचि सम्यक् समाधी ॥ जाण श्रीरामा विशुद्धी ॥ करूं देसवडी संशयबुद्धी ॥ विश्वस्थ व्हावें तुवां तेथें ॥ ६६ ॥ मागुती नये समाधीचें लक्षण ॥ निरूपिजेल तें करीं श्रवण ॥ तेणें करणें तूं आपण ॥ समाधिस्वरूपीं लीनहो ॥ ६७ ॥

**ब्रह्माकारमनोवृत्तिप्रवाहोहंकृतिं विना ॥**
**संप्रज्ञातसमाधिः स्याद्ध्यानाभ्यासः प्रवर्त्तते ॥२६॥**

अहंसोहं हे अहंकृति ॥ निरासिलिया ग्रासे मनोवृत्ति ॥ मग उरे सहज ब्रह्मस्थिति ॥ मनोवृत्तिशून्यत्वें ॥ ६८ ॥ याचें तात्पर्य हेंचि जाण साचार ॥ जे मनोवृत्ति होय ब्रह्माकार ॥ मनोप्रवाह तो तदाकार ॥ कैसेनिपरि ह्मणावा ॥ ६९ ॥ त्या

ब्रह्माकारप्रवाहाचि व्यक्ति ॥ होचि जे नसे कदा अहंकृति ॥ शुष्कपर्ण वायुसंगति ॥ जयेपरि चळण पावे ॥ ७० ॥ एवं सर्वदर्शिपणें अहंकार बुडे ॥ परि संसारप्रवाह न मोडे ॥ न मोडोनि मोडे मार्गाति पडे ॥ अहंकारवियोगें ॥ ७१ ॥ तस्मात ब्रह्माकार होय मनोवृत्ति ॥ आणि प्रवाह चाले निरहंकृति ॥ तेचि समाधिगा सीतापति ॥ जे मनश्लोकीं निरोपिली ॥ ७२ ॥ संप्रज्ञातसमाधि हें अभिधान ॥ इयेचि ठाई बोल्ली सज्जन ॥ हे अतियुक्तिवर्त्तन ॥ अभ्यासध्यानाहूनि श्रेष्ठ ॥ ७३ ॥ गीतेमाजीं श्रीभगवंतें आपण ॥ अर्जुनाप्रति केलें निरूपण ॥ द्वादशाध्यायीं द्वाविंशश्लोकवचन ॥ उत्तमोत्तम ऐसें असे ॥ ७४ ॥

श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते॥
ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छांतिरनंतरं ॥२७॥

अभ्यासाहूनि श्रेष्ठ ज्ञान ॥ ज्ञानाहूनि विशेष ध्यान ॥ ध्यानाहूनि श्रेष्ठपण ॥ कर्मफलत्यागीं बोलिजे ॥ ७५ ॥ मी अमुक हें स्मरण ॥ उपजोन मी अर्जुनें करीन ॥ करूनि अर्थ पावेन ॥ हे जेथें नसे भावना ॥७६॥ तोचि त्याग कर्मफळाचा ॥ जो ध्यानाहूनि उत्कृष्ट साचा ॥ कर्मफळत्यागाहूनि शांतीचा ॥ अधिकार असे निर्धारें ॥ ७७ ॥ एवं अभ्यास आणि ज्ञानध्यान॥ त्याहूनि मुख्यत्वें वर्त्तमान ॥ तोचि शांति परम निर्वाण ॥ ऐसें वचन श्रीकृष्णाचें ॥ ७८ ॥ त्याउपरी टीकाकार ह्मणे ॥ एवंविध गीतावाक्यप्रमाणें ॥ जे शांति ते जाणणें ॥ संप्रज्ञातसमाधि

॥ ७९ ॥ याकारणें श्रीरामासी ॥ वसिष्ठ म्हणे गा परियेसी ॥
हे संप्रज्ञातसमाधि ऐसी ॥ अभ्यास याहुनि श्रेष्ठ ॥ ८० ॥
श्लोकीं निरूपिली समाधी इचाठाइं ॥ जो अखंडत्वें पाही ॥
त्या समाधिस्थाचेंही ॥ सांगिजेल लक्षण ॥ ८१ ॥

**कल्पांतवायवो यांतु यांतुचैकत्वमर्णवः ॥**
**तपंतु द्वादशादित्या नास्ति निर्मनसःक्षतिः ॥२८॥**

कल्पांतिचेनी अनिळें ॥ पिंडब्रह्मांड उडो बळें ॥ अथवा
क्षिति अब्धि हो एके मेळे ॥ एकत्र होताति सप्तसिंधु ॥ ८२ ॥
अथवा द्वादशादित्यांचिया किरणीं ॥ जळोनि जावो समस्त अवनी ॥
परंतु खंति कदा न मानी ॥ जो निर्मन समाधिस्थु ॥ ८३ ॥
मनें करावी खंति पाहीं ॥ तें मन नसे त्याचाठाईं ॥ म्हणोनि
आघातें करूनि कांहीं ॥ खंति न पावे समाधिस्थु ॥ ८४ ॥
अथवा अघात दिसे जरी ॥ तो जन देखे स्वस्थानीं ॥ म्हणोनि
आघातें करूनी ॥ खंति नपवे समाधिस्थु ॥ ८५ ॥ किंवा खंति
नपवे या कारणें ॥ न देखे जनरूप देखणें ॥ जन होय जाण
यणें ॥ तें देखणें देखतसे ॥ ८६ ॥

**या चितिः सर्वभूतानामुदयव्ययसाक्षिणी ॥**
**तां चितिं पश्यतावस्थां पूर्णानंदघनामृतं ॥२९॥**

सर्वभूतांचें उदयास्तमान ॥ त्याचें साक्षभूत जें अधिष्ठान ॥
तें सकळग्राम म्हणोन ॥ श्मशानस्थान बोलिलें ॥ ८७ ॥ इतर
जे चिताभूमी ॥ ते दृष्टिगोचर दृश्यग्रामीं ॥ तैसी नव्हे अंतर्यामीं ॥

अंतरस्थ म्हणूनी अदृश्य ॥ ८८ ॥ आणिक असे रघुपती ॥ इतरभूमी शोकदाती ॥ तैसी नव्हे गा निश्चिती ॥ पूर्णानंदघनामृत ॥ ८९ ॥ इतरचित्ताभूमिस मृत्य वसे ॥ हे अमृतमय अखंड असे ॥ एवं सदा सर्वत्र प्रकाशे ॥ ऐसी जे अधिष्ठानचिति ॥ ९० ॥ ते स्वयं होऊनी ठाके आपण ॥ मग सर्वत्र तेची पूर्ण ॥ म्हणोनी जीतचि पावला मरण ॥ तो संप्रज्ञातसमाधिस्थ ॥ ९१ ॥ कोणी मरोन पावे स्मशान ॥ हा जितची पावे समाधिस्थान ॥ साधनचतुष्टय हे चौघेजण ॥ आणि ते आले स्मशानी ॥ ९२ ॥ रचूनि कुसरी अग्निशरण ॥ प्रज्वळे अनुभवहुताशन ॥ अनुभवि जरे जीवपण ॥ अदृश्य होय मोक्ष ॥ ९३ ॥ ऐसा जगतचि मरणसोहळा ॥ धन्य तोचि समाधिस्थ देखे डोळा ॥ जो दृश्य ग्रासूनि असला ॥ असे हेचा पुढे सांगों ॥ ९४ ॥

**मनोदृश्यमिदं सर्वं यत्किंचित्सचराचरं ॥**
**मनोपि ह्यमनोभावाद्द्वैतं नैवोपपद्यते ॥ ३२ ॥**

जे कांहीसे चराचर सर्व ॥ ते भासे मनोमळभावे ॥ तो मनोमळ गेलिया स्वभावे ॥ होय अमळत्वे सोज्वळ ॥ ९५ ॥ जैसा चंद्रकांतीं जीव आला ॥ कां हिमनिशीरे वोसंडिला ॥ कीं क्षारसिंधु ओंग त्यागिला ॥ कीं ज्ञाते सांडिला दरिद्रं ॥ ९६ ॥ तैसे प्रकाशरूपी जे मन ॥ त्याचे अंगीचे दुरावले अज्ञान ॥ मग उरे स्वप्रकाशे परिपूर्ण ॥ तोची अमळभाव तयाचा ॥ ९७ ॥ असो मनाचिनी समळभावे पाहीं ॥ प्रपंचनन्यद्वैत न दिसे कांहीं ॥

जडाजड दृश्य जितुकें कांहीं ॥ तितुकें सर्वहि आत्मरूप ॥ १८ ॥
तो संप्रज्ञातसमाधिस्त भला ॥ ऐसिये आत्मस्थिति राहिला ॥
राहोनि भोगें भोगिल्या ॥ कैसा एके श्रीरामा ॥ १९ ॥

**यदा स्पंदशिवं शांतं तस्यांतर्जगतःस्थितिः ॥**
**स्पंदास्पंदविनाशात्मा पदं [illegible] चिदाकृतिः ॥३१॥**

जे स्पंद ह्मणजे स्फुरणातीत ॥ [illegible] निश्चयरूपदोदित ॥
शांत ह्मणजे विकाररहीत ॥ ज्यामाजी समस्त जग हें असे ॥२००॥
ऐसि आत्मस्थिति वस्तुता ॥ नवें केवळ वृत्तिशून्यता ॥ निराचा
पूर्ण निडार होतां ॥ स्थिति नव्हतां वाणे ऐसी ॥ २०१ ॥ तव्हां
चळण आणि अचळपण ॥ बोलणें आणि उगेपण ॥ नाटस्थ्य
आणि स्फुरण ॥ होय नाशन या द्वंद्वाचें ॥ २०२ ॥ चळण
आणि अचळपणेंसी ॥ बोलणें आणि उगेपणेंसी ॥ [illegible] आणि
स्फुरणेंसी ॥ उरे सर्वदर्शी केवळ ॥ २०३ ॥ जे द्वंद्वा ग्रासूनी
अद्वय ॥ जे चिदाचिद्भास विद्वय ॥ जें सुखदुःखाद्वय ॥ ह्मणो-
नेदी ऐसेंतसें ॥ ४ ॥ ऐसें आत्मस्थितिचें स्वल्पपण ॥ जो येणे
देहें होय आपण ॥ तोचि रामा समाधिस्थ पूर्ण ॥ मागतेन तो
एक कैसा ॥ ५ ॥

**दोषबुध्या भयातीते निषेधान्ननिवर्तते ॥**
**गुणबुध्या यद्विहितं न करोति यथार्भकः ॥३२॥**

स्वरूपीं न देखे आचरण ॥ ह्मणोनि न भासे अचरण ॥
अनाचार न दिसतां दर्शन ॥ दोषाचें कहीं नव्हे जाण तें ॥ ६ ॥

दोषदर्शनाची नास्तिकता ॥ ह्मणोनी भयाचा नेणे वार्त्ता ॥ एवं भयातीत होत्साता ॥ निष्कळपणें अखंड ॥ ७ ॥ तो दृष्टि देउनी दोषांकडे ॥ निषिद्धकर्मापासूनी मुरडे ॥ कां जे अद्वितीयस्थिति चोखडे ॥ असें वाणलें निर्भयत्वें ॥ ८ ॥ आणि दृष्टि देऊनी श्रेयावरी ॥ अविहित कर्म कदा न करीं ॥ कां जे द्वितीयस्थितिचें सुपरी ॥ वाणलेंसे निरपेक्षत्व ॥९॥ एवं दोष देखे जरी ॥ निषिद्धकर्माचा त्याग करी ॥ आणि विहितकर्मातें अंगिकारी ॥ श्रेयभाव न देखोनी ॥ १० ॥ करूं नये तें न करी ॥ करूं नये तेणेचि वर्त्ते व्यवहारीं ॥ परंतु करणें न करणें कुजरी ॥ त्याच्याठाई बोलोंनये ॥ ११ ॥ त्याचा सहजें बुडाल्या हेतु ॥ ह्मणोनि सहजप्रवाहें वर्त्तनु ॥ ये अर्थी एक असे दृष्टांतु ॥ तो अवधारीं रघुत्तमा ॥ १२ ॥ जेसें बाळक निर्हेतुकपणें ॥ कर्मकार्यकर्तृत्व नेणे ॥ कोणिएक आपुला प्रवाह तेणें ॥ इंद्रियद्वारा वर्तत असे ॥ ॥ १३ ॥ तसी सहजसमाधी बाणे जया ॥ जो उमजोनी आला उमजाच्या ठायां ॥ तो स्वप्रवाहें वर्ते परी तया ॥ कार्यकर्तृत्व न स्फुरे ॥ १४ ॥ एवं प्रवाह तरी नुमजाचा ॥ परी सत्कर्माचा स्वरूपभाव त्याचा ॥ येअर्थीं दृष्टांत गंगेचा ॥ बोलिजेल तें ऐकें कर्णीं ॥ १५ ॥ मी पुण्यरूपें माझे प्रवाहीं ॥ ऐसें गंगा नेणे कहीं परंतु सर्वथा नसे तिचे ठाईं ॥ पुण्याहूनी अन्यथा भाव ॥१६॥ तैसा सहजसमाधिस्त पुरुष साचा ॥ सत्कर्मरूप प्रवाह त्याचा ॥ असो मुख्यतात्पर्य हे त्रिवाचा ॥ तो जें वर्ते तेंची सत्कर्म ॥ १७॥ तो जें ऐके त्याची श्रुती ॥ तो जें बोले तीं उपनिषदें होती ॥ तो जे देखे त्या मूर्ती ॥ श्री भगवंताच्या पैं ॥ १८ ॥ तो जें

चाखे तोची ब्रम्हरसु ॥ तो जें स्पर्शे तोची ब्रम्होल्हासु ॥ तो जें जल्पे तोची महापुरुष ॥ तोची विलास ब्रम्हाचा ॥ १९ ॥ तो जे ठाईं ठेवी चरण ॥ तेंची निश्चीत वैकुंठभवन ॥ असो जें तस्मात त्याचें वर्त्तन ॥ तेंची भवन ब्रम्हाचें ॥ २० ॥ एवंविध स्वरूपानिष्ठ पूर्ण ॥ जो महाराज अगणितगुण ॥ तोची निरूपिला अंतु निर्वाण ॥ दो श्लोकीं बोलिजेला ॥ २१ ॥ हें शेवटील निरूपण पाहीं ॥ याउपरी बोलणें असे काहीं ॥ तरी तूं प्रवेशुनी माझा हृदईं ॥ ऐकणार होईं रामचंद्रा ॥ २२ ॥

**अनुत्कीर्ण यथा स्तंभे संस्थिता शालभंजिका ॥**
**तथा विश्वं स्थितं तत्र तेन शून्येन तत्पदं ॥२३॥**

जैसा स्तंभकाष्टाचा जो कांहीं ॥ न कोरितांही त्याच्या ठाईं ॥ असे पुतळिका पाहीं ॥ त्याचेनात्म स्वरूपें ॥ २३ ॥ तैसें ज्या निद्रिस्था माझारी ॥ जागृती असे विश्वाकारीं ॥ ते तो निद्रिस्त कोण अवसरीं ॥ बोलीजे नये सर्वथा ॥ २४ ॥ आतां विश्वाचेनी जागेपणें ॥ तोची जगी जागा ऐसें म्हणणें ॥ तरी विश्वातें न देखणें ॥ तेंची त्याचेनी जागी ॥ २५ ॥ विश्वातें न देखोनि जागे ॥ अनेक विश्व त्याचेनि जागे ॥ एवं निद्राजागृती त्यासी नलगे ॥ त्याचेनि असे म्हणोनी ॥ २६ ॥ निद्राअभावें प्रकाश वसे ॥ जागृतिभावें विश्व नसे ॥ तस्मात् विश्वशून्यत्वें जें कांहीं असे ॥ तेंचि बोलिजे निर्वाणपद ॥ २७ ॥ आणि येक श्लोकोक्ति ॥ सांगिजेल निर्वाणपदस्थिति ॥ तुवां तें विदेहत्वयशस्वी ॥ पुढिले श्लोकीं परिसावें ॥ २८ ॥

**सौम्यांभसि यथा वीचिः किन्न चास्ति सविश्रुतं॥**
**तथा ब्रह्मजगत्सौम्यं शून्यं शून्यपदं गतं ॥२४॥**

जैसें स्थीर जें जळ त्याचा ठाईं ॥ लहरी बोलोंचि नये कांहीं ॥ परंतु उदकास्तिकतें लहरी नाहीं ॥ ऐसें केंवि बोलावें ॥ ॥ २९ ॥ तरी उदकाचेनि अस्तिकगुणें ॥ लहरी अभावपणें असणें ॥ आणि लहरीचे अभावपणें ॥ निश्चळ जळ विराजे ॥ ॥ ३० ॥ तैसें निश्चळब्रह्म निर्विकार ॥ तथ नसे जगदाकार ॥ परंतु ब्रह्मभावेंकरूनि साचार ॥ ऐसेंहि केंवी बोलावें ॥ ३१ ॥ तरी ब्रह्मास्तिकेचेनि गुणें ॥ जगत् शून्याचेपरी असणें ॥ आणि जगाचेनि शून्यपणें ब्रह्मभाव विराजे ॥ ३२ ॥ एवं येणें परस्परभावें ॥ शून्य शून्यपदाप्रति पावे ॥ याउपरी सहजस्वभावें ॥ उरे तें पद निर्वाण ॥ ३३ ॥ तें पद निर्वाणगरिमा ॥ जियेचा निर्विशेष महिमा ॥ तें तुझा अंगीं वाणो श्रीरामा ॥ हाचि आमुचा अशिर्वाद ॥ ३४ ॥ येणें निहारलेनिभोगें जगीं ॥ तूं साम्राज्य स्वराज्य करीं ॥ हा अशिर्वाद निरंतरीं ॥ आमुचा असे तुझ्याठाईं ॥ ३५ ॥ या पदनिर्वाणप्रतिती ॥ निरसो तुझी अहंकृती ॥ हा अशिर्वाद निश्चिती ॥ आमुचा असे तुझ्याठाईं ॥ ३६ ॥ एवं दशमप्रकरणोक्त निरूपण ॥ हें तुज विशदप्रकारें केलें श्रवण ॥ या श्रवणाचें करूनि मनन ॥ होई पूर्ण निजध्यासद्वारा ॥ ३७॥ तुज परमात्मयाप्रती ॥ हेंहि अनुचित घडे युक्ति ॥ किं या दिनकरासी करावी आरती ॥ कोणी तेजें करूनी ॥ ३८ ॥ कीं जळ-

निधीसी अर्घ्य देणें ॥ कीं क्षीरसिंधूसी नैवेद्य समर्पणें ॥ तैसें तुज आत्मयाप्रती बोलणें ॥ जें हें उपदेशपर कांहीं ॥ ३९ ॥ असो तूं निमित्य करूनी रघुराजा ॥ हा बोलिला उपदेश वोजा ॥ जो आत्मस्थिति सहजा ॥ अतिसुगमु ॥ ४० ॥ येरवीं प्राप्तिचें प्राप्तिस्थान ॥ तुझी उत्कंठा वाहे ज्ञान ॥ तुजलागीं जाणे अपरोक्षज्ञान ॥ तुझे श्रीचरण समाधि वंदी ॥ ४१ ॥ तो तूं केंवी होसी उपदेशाधिकारी ॥ परंतु सत्यप्रतिज्ञ फसिली व्यवहारीं ॥ कां जे तुझे अवतार सुपरी ॥ धर्मसंस्थापनेचे कारणें ॥ ४२ ॥ ह्मणोनि रघुकुळभूषणा ॥ तुवां श्रवण केलिया निरूपणा ॥ तूं पुढें होसी एकणा ॥ ये निरूपणीं उत्तरोत्तर ॥ ४३ ॥ याचें तात्पर्य हेंचि जाण ॥ जो हा उपनिषदार्थ करी श्रवण ॥ तो रामरूप होय हें वचन ॥ निःसंदेह त्रिवाचा ॥ ४४ ॥ हा संवाद तुमचाअमुचा ॥ पुढें तोहि रामरूप साचा ॥ असो येथूनि उपरमली वाचा ॥ निरूपणाचा कळस झाला ॥ ४५ ॥ ऐसें वसिष्ठमहामुनी ॥ बोलोनि राहिला मौनीं ॥ सहजसुख बाणलें नयनीं ॥ तेणें झालें अर्धोन्मिलित ॥ ४६ ॥ तैसाची राम निजभाग्यश्रवणें ॥ तटस्थ झाला उपरमलेनी मनें ॥ अश्रुधारा श्रवती नयनें ॥ सद्गदित कंपायमान बाष्पकंठीं ॥ ४७ ॥ रोमांचित झालें शरीर सकळ ॥ गात्रें स्पंदायमान विव्हळ ॥ श्यामतनुवरी आलें स्वेदजळ ॥ जैसीं शोभती मुक्ताफळें ॥ ४८ ॥ ऐसी श्रीरामाची स्थिती ॥ देखोन वसिष्ठ महामती ॥ विचारिता झाला चित्तीं ॥ म्हणे राहिल अवतार कार्य ॥ ४९ ॥ मग थापटून तो अवसरीं ॥ श्रीरामासी सावध

करी ॥ करूनी म्हणे अवधारीं ॥ महाराज रघुपती ॥ ५० ॥ तुज सर्वात्मयाप्रती ॥ कायसी हे ताटस्थवृत्ती ॥ आतां राहोनी सहजस्थिती ॥ साम्राज्य पैं करावें ॥ ५१ ॥ ज्यालागीं तुझें अवतरण ॥ तें संपादावें कारण ॥ करूनी अधर्मउत्थापन ॥ धर्मसंरक्षण करावें ॥ ५२ ॥ असाधु दुष्ट निर्दाळावे ॥ साधुसज्जन सुखी करावे ॥ अमर संस्थानीं स्थापावे ॥ कमळासनादी करूनी ॥ ५३ ॥ नीतिमर्यादा प्रजापाळण ॥ करूनी पाववीं कल्याण ॥ सुखी करीं गोब्राम्हण ॥ समाधानें नांदवीं जग ५४॥ इत्यादि अवतारलीळा ॥ संपादितहोत्साता कृपाळा ॥ भोगिजे स्वात्मसोहळा ॥ हेंचि सांगों वारंवार ॥५५॥ ऐसें वशिष्ठ बोले तेक्षणीं ॥ श्रीराम माथा ठेवी चरणीं ॥ वरवें स्वामी गुरुशिरोमणी ॥ आज्ञा प्रमाण तुमची ॥ ५६ ॥ तुमचेनी वचनें कृतार्थ जालों ॥ तुमचेनी वचनें निर्भय ठेलों ॥ तुमचेनी वचनें आलों ॥ पावलों ब्रम्हपदा ॥ ५७ ॥ ऐसें बोलोनी वारंवार ॥ करिता होय नमस्कार ॥ जयजय जगद्गुरु जगदाधार ॥ इत्यादि बोले स्तुति वाक्यें ॥ ५८ ॥ स्तवनयुक्त वंदन ऐसें ॥ केलें वशिष्ठासी कौशल्येशें ॥ येणें निजस्थाना जाय सोल्हासें ॥ घेउनी आज्ञा रघुविराची ॥ ५९ ॥ इतुकियावरी टिकाकर्त्ता ॥ कर जोडुनी प्रार्थी संतां ॥ श्रीरामवसिष्ठसंवाद निरूता ॥ येथुनी जाहला संपूर्ण ॥ ६० ॥ म्यां यथा मती करूनी साचें ॥ केलें व्याख्यान दश प्रकरणाचें ॥ ना ना तुम्हींच बोलविलें वाचें ॥ म्यां केलें हेंही बोलों नये ॥ ६१ ॥ तरी येथुनी न्यूनपूर्णता ॥ तुमची तुम्हीं

जाणा वस्तुता ॥ मी कां प्रार्थना करूं आतां ॥ न्यून तें पूर्ण करावयाची ॥ ६२ ॥ माझें अत्यारूप बोलणें ॥ परंतु तुमच्या बोल्रविलेपणें ॥ लेवविलें चातुर्याचें लेणें ॥ म्हणोनी मानलें विचक्षणा ॥ ६३ ॥ असो बोलतां वाटे धीटपण ॥ आतां झालें येथून वागवसान ॥ समस्तां साधुं वंदन ॥ माझें साष्टांगीं यथोक्त ॥ ६४ ॥ यावरी ग्रंथाचेनी पूर्णपणें ॥ सकलें श्रोतयांप्रती बोलणें आतां ग्रंथसमाप्ती कालें करणें ॥ जाहला हें निरूपिजेल ॥ ६५ ॥ पंधराशतें आगळीं चतुर्दशें ॥ इतुकीं शालिवाहनशकाचीं वर्षें ॥ नंदन संवत्सर वर्त्तमान असे ॥ ग्रंथसमाप्त येणें समयें ॥ ६६ ॥ अयन तरी दक्षिणायन ॥ मास तरी पुण्यरूप आश्विन ॥ पक्ष तरी कृष्णाभिधान ॥ तिथि तरी अष्टमी सह नवमी ॥ ६७ ॥ ॥ ६७ ॥ वासर सोमसुताचा निश्चिती ॥ शुक्लयोगेंसी आश्लेषांची स्थिति ॥ असो येणेंकाळीं झाली समाप्ती ॥ या लघुवाशिष्ठटीकेची ॥ ६८ येणें आत्मबोध झाला प्रवर्त्तविता ॥ म्हणोनि मी झालों प्रवर्त्तता ॥ असो वराडदेशीं पंचग्राम निरुता ॥ तेथें असतां हें झालें ॥ ६९ ॥ हे टीका ऐके आणि जो पढे ॥ त्यासी अगणित सुकृत जोडे ॥ अर्थ प्रतीयमान जो त्यापुढें ॥ आंगीं जडे ब्रम्हत्व ॥ ॥७०॥ माधवदास नारायणाचा ॥ जो मुळिंचोनि कृष्णनामें साचा ॥ म्हणे हें सत्यसत्य त्रिवाचा ॥ सद्गुरुप्रसादें करूनी ॥२७१॥ इति श्रीयोगवासिष्ठसारे माधवदासकृतटीकायां ब्रम्हप्राप्तिप्रकरणं दशमं स० श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ श्लो० ॥ ३४ ॥ टी० ॥ २७१ ॥

इति प्राकृतयोगवासिष्ठ समाप्त.